# दोन शब्द

…ांवर हल्ला आला आहे अशी ओरड आज सर्वत्र ऐकूं येते. पाश्चात्य …तिही तीच स्थिति आहे. तरुण पिढीचा धर्मांवरील विश्वास उडाला आहे. …र्दीच नास्तिक नाहींत ते उदासीन आहेत. माझ्या मतें या परिस्थितीची …बदारी वयस्क पिढीवर येते. ज्या समाजांत स्वतःच्या धर्माचें, तत्त्वज्ञानाचें …स्कृतीचें ज्ञान करून न घेतांही ऑक्सफर्ड विद्यापीठाचे पदवीधर होऊन …सुसंस्कृत " म्हणून मिरवूं शकतात त्या समाजांतील तरुण पिढी यापूर्वीच …क्रांतीला कशी प्रवृत्त झाली नाहीं याचेंच आश्चर्य वाटतें! सारांश, आजच्या …ण पिढीला नांवें ठेवण्यापेक्षां त्या पिढीला स्वसंस्कृतीचें ज्ञान न देणाऱ्या …ढीलाच अधिक दोष दिला पाहिजे.

नास्तिकपणा येण्याला दुसरें कारण म्हणजे धर्माचाराचें व तदनुषंगिक …चें "निरर्थकत्व" हें होय. अर्थाचें ज्ञान आणि आचार व मंत्राचे मुळाशीं …केलेल्या विचाराची जाणीव नसली म्हणजे पहिल्या पिढींत तो आचार …र्थक होतो व दुसऱ्या पिढींत लोप पावतो. ही वस्तुस्थिति झाली आहे.

तरुण पिढीला स्वतःच्या संस्कृती अंगाचें ज्ञान देणें व निरर्थक क्रियेला …र्थकत्व आणणें या दोन्ही दृष्टींनीं श्री. कोलंगडे यांचा हा ग्रंथप्रकाशनाचा …र अभिनंदनीय आहे असें वाटतें. समाजांत होणाऱ्या स्थित्यंतराकडे …केवळ बोटें मोडीत बसण्यापेक्षां विधायक दृष्टीनें कार्य करणाऱ्या …बद्दल समाजाला आदर व कृतज्ञताच वाटेल.

…यांत आज देशीय व परदेशीय सर्व विभूतींचीं चरित्रें लिहिलीं जात … परंतु ज्यांच्या जीवनाचा, विचारांचा व क्रियेचा परिणाम अखिल …य समाजावर झालेला आहे अशा श्रीयाज्ञवल्क्यांसारख्यांचीं चरित्रें … आपल्या वाङ्मयांत नाहींत. त्याचें कारण हें लेखन एक श्रमाचें व

चिकाटीचें काम आहे. याज्ञवल्क्यप्रभृतींच्या उपनिषदांची व त्यांतील विचार-सौंदर्याची ओळखही आपणांस शोपेनहौरसारख्या पाश्चात्य रसिकामार्फत झाली. The Upanishads are a solace of my life and they will be a solace upto my death हे शोपेनहौरचे उद्गार जगप्रसिद्ध आहेत. भारतीय तत्त्वज्ञानांतील अद्वितीय तत्त्वसिद्धांत – अहं ब्रह्मास्मि – प्रतिपादून याज्ञवल्क्यांनीं जगांतील अलौकिक तत्त्वज्ञान्यांचे पंक्तींत अग्रेसरत्व मिळविलें. " योऽसावादित्ये पुरुषः सोऽसावहम् । " ( मणि ३११ ) हा आत्मविश्वासाचा मंत्र त्यांनीं भारताला दिला. तत्त्वज्ञानाचे क्षेत्रांत त्यांनीं क्रांति केली तशीच सामाजिक क्षेत्रांतही केली. याज्ञवल्क्य त्यांचे काळचे सुधारक व सामाजिक क्रांतिकारक होते. त्यांचें चरित्र अत्यंत बाणेदार व तेजस्वी आहे हें प्रस्तुत ग्रंथवाचनावरून समजेलच. तत्त्वज्ञानी याज्ञवल्क्य स्वतः भौतिक आणि आध्यात्मिक जीवनाची सांगड घालणारे होते, हें त्यांच्या चरित्रावरून दिसून येईल. ' अंधं तमः प्रविशन्ति येऽविद्यामुपासते । ततो भूय इव ते तमो य उ विद्यायां रताः ॥' (मणि ३५७ ) हें सामाजिक उत्कर्षाचें तत्त्व त्यांनी स्वतः आचरून दाखविलें.

पांच हजार वर्षांपूर्वी लोक कसे राहत, समाज कसा होता, समाजांतील तत्कालीन प्रश्न काय होते याची कल्पना प्रस्तुत चरित्रग्रंथावरून चांगली येते. चरित्र, गोष्टी, कादंबऱ्या व लघुकथा वाचणाऱ्यांना हें चरित्र मनोरंजक वाटेलच, पण समाजशास्त्रजिज्ञासूंना देखील तत्कालीन समाजाचें चित्र या दृष्टीनें या चरित्रग्रंथाचा चांगला उपयोग होईल. चरित्रनायकावरील उत्कट भक्तीमुळें लेखकानें हें पुस्तक भावनापूर्ण पद्धतीनें लिहिलें आहे. त्यामुळें वाचकांना आपल्यापुढें एकादा रसाळ वक्ता कांहीं सांगत आहे असा भास होतो. बालविधवा, सुशिक्षित सवत, टाकलेलीं अर्भकें, पंडितांचा हेवामत्सर, सुधारक पंथ इत्यादि आज समाजांत असणारे प्रश्न याज्ञवल्क्यांच्या कालींही होते. ग्रंथकारानें आपल्या कल्पनाशक्तीनें व अनेक ग्रंथांचे आधारानें या सर्व

प्रसंगांत जीव भरून याज्ञवल्क्यकालीन समाजाचें जिवंत चित्र उभें केलें आहे. आधुनिक सुधारणेच्या अतिरेकावर लेखकानें टीका केली असली तरी 'चरित्रबोध' या प्रकरणावरून असें स्पष्ट दिसतें कीं, धर्माचें वैशिष्ट्य कायम ठेवून सुधारणा करण्यास याज्ञवल्क्य अनुकूल होत व लेखकाचेंहि तसेंच मत आहे. प्रचलित हिंदुधर्मापेक्षां वैदिक धर्म श्रेष्ठ होता व आहे असा लेखकाचा अभिप्राय दिसतो. एकंदरींत चरित्र इतकें मनोरंजक झालें आहे व कथानकाचा ओघ इतका जोरदार आहे कीं बरवर चाळण्याकरितां पुस्तक घेतलें तरी तें सर्व वाचावेंसें वाटतें. एखाद-दुसरी गोष्ट सोडून दिल्यास बाकी सर्व चरित्र आबालवृद्ध स्त्री-पुरुषांना वाचनीय असें झालें आहे.

आपल्या हिंदूंचें वैशिष्ट्य हें वाटतें कीं वेदांचे ग्रंथ न पाहतां व त्यांतील कांहींएक न वाचतांच लोक वेदांचा अभिमान बाळगतात व त्यांवर प्रामाण्यबुद्धि ठेवतात! याचें एक कारण हें वाङ्मय अद्याप सामान्य जनांना सुलभ व सुबोध झालेलें नाहीं हें आहे. तसेंच समाजांत त्याविषयीं जिज्ञासाबुद्धिहि बेताचीच आहे हेंहि दुसरें कारण आहे. वेदांचीं भाषांतरें प्रकाशणारांचें भांडवलहि वसूल होण्यास पंचाईत पडते! श्री. कोल्हटकर यांनीं यजुर्मणिमाला-रूपानें वाचकांचा शुक्लयजुर्वेदाशीं परिचय करून दिलेला आहे. सविनियोग अनुक्रम व मंत्रविनियोगाची सूचि दिल्यानें या ग्रंथभागाची उपयुक्तता अधिक वाढली आहे. आचारनिष्ठ वाचकांना या ग्रंथामुळें आपला आचार "सार्थ" करण्याची संधि मिळालेली आहे. ज्ञाननिष्ठ वाचकांना या मणि-मालेनें यजुर्वेदाविषयीं जिज्ञासा उत्पन्न होण्याइतका परिचय करून दिलेला आहे. धर्मनिष्ठ आणि समाजशास्त्रजिज्ञासू नास्तिक अशा दोघांनाहि हा ग्रंथ उपयुक्त आहे.

शुक्लयजुर्मणिमाला वाचून ही आपल्या भारतीय समाजपुरुषाची मानसिक उत्क्रांति कसकशी झाली याची साधारण कल्पना वाचकांना येईल. भारतीयांची मनोवृत्ती क्रमाक्रमानें भौतिकवादी, नंतर अध्यात्मवादी, व अखेर भौतिक व अध्यात्माचा समन्वय घालणारी कशी झाली तें या ग्रंथावरून

विचारी व मार्मिक वाचकाला दिसून येईल सपिंड व समान बांधवाची संपत्ति आपणाकडे यावी अशी राजस मागणी करणारे आर्य (मणि १५४) पुढें विश्वामित्र होऊन मित्रदृष्टीनें सर्व जगाकडे पाहू लागतात (मणि ३३९) 'मित्र स्याह चक्षुषा सर्वाणि भूतानि समीक्षे। मित्रस्य चक्षुषा समीक्षामहे॥' जगात उद्भवणाऱ्या पुरोगामी तत्त्वज्ञानाची बीजें भारतीय तत्त्वज्ञानात सापडतात "मा गृध कस्यस्विद्धनम्।" असा वैदिक उपदेश ब्राम्हणानीं निर्भय अंत करणान श्रीमंताना आणि धनिकाना करण्याचा काळ आता प्राप्त झाला आहे तस त्यानीं केलें तरच ते खरे वैदिक ब्राह्मण भारतीय वाङ्मयाच्या अभ्यासानें असे नि स्पृह, तेजस्वी व समाजदृष्टीनें विचार करणारे ब्राह्मण वृत्तीचे पुरुष तयार झाले तर हिंदुस्थान आपले सामाजिक प्रश्न आपल्या स्वत च्या विचारपद्धतीन सोडवील यात संशय नाहीं

श्री कोलगडे याच्या या उपयुक्त उपक्रमास समाज प्रोत्साहन देईल असा भरवसा आहे

सेवकाश्रम, बलिप्रतिपदा
१७।१०।३६ १८५८

डॉ गजानन श्रीपत खैर,
M A Ph D

---

# प्रस्तावना

हिंदू—मग तो जातीनें कोणीहि असो—ज्याला हिंदूंचे धर्मग्रंथ समजत नाहींत तो हिंदू कसला ! आणि त्याला हिंदू म्हणविण्याचा अधिकार तरी काय ? वेदासारख्या प्राचीन, पवित्र व प्रभावी ग्रन्थाची ओळखही नसावी ही गोष्ट खऱ्या हिंदूस खरोखर अत्यंत लाजिरवाणी नव्हे काय ? वेद तोंडानें पाठ म्हणणारे फार तर कोठें सांपडतील; पण त्याचा अर्थ—खरें मर्म—जाणणारे मात्र कोठें व किती असतील हें तो जगदंबाच जाणे ! वेदाचें संरक्षण करणें हा आमचा पिढीजाद व जन्मसिद्ध हक्क आहे, असें जे मोठ्या आढ्यतेनें सांगत मिरवीत असतात त्या शाहण्या म्हणविणाऱ्या ब्राह्मणवर्गाची अर ही कथा तर इतरांविषयीं मग बोलावयास कशास पाहिजे ! आंधळ्याच्या हातीं रत्नहार देणें अगर बहिऱ्यापुढें गंधर्व बसविणें अशांतलीच आज हिंदूंच्या हातांतील वेदाची गोष्ट होय, असें कोणीं म्हटल्यास ती अतिशयोक्ति होईल काय ?

आतां खरेंच बोलावयाचें म्हणजे ज्याला वेद समजत नाहींत तो हिंदूच नव्हे ! *ज्याला त्या पवित्र व प्रभावी ग्रन्थाची ओळख पटली*, मर्म समजलें, सिद्धांत पटला तोच खरा हिंदू ! तोच खरा ब्राह्मण ! ! तोच खरा ऋषि ! ! ! मग तो जातीनें कोणीहि असो ! ' विद्ययाऽमृतमश्नुते ' हा श्रुतीचा परमश्रेष्ठ सिद्धांत विशिष्ट व्यक्तीला, जातीला, समाजाला अगर देशाला अनुलक्षून सांगितला नसून तो अखिल मानवजातीकरितां प्राचीन, सुज्ञ व उदार, आर्य ऋषींनीं निष्कर्षून ठेविला आहे. पण स्वार्थबुद्धीनें म्हणा, अगर अज्ञानानें म्हणा, अथवा इतर कोणत्याहि कारणामुळें म्हणा, तो मक्ता जो कोणी आपल्याकडेच बळकावूं पाहील, त्याचें निदान या विसाव्या शतकांत तरी हसें झाल्याशिवाय राहणार नाहीं ! जो वैदिक आर्यवंशांत जन्मला—मग तो कोणीहि असो, लहान असो वा थोर असो, उच्च असो वा नीच असो, गरीब असो वा श्रीमंत असो, स्त्री असो वा पुरुष असो, कोणीहि कसाहि असला तरी त्याला आत्मोद्धाराचा—आत्मज्ञानाचा जन्मसिद्ध हक्क आहेच आहे, ही गोष्ट कवषमातंग, गार्गी-मैत्रेयी, ध्रुव-प्रल्हाद, व्यास तुलाधार, जनक—

जनमेजय इत्यादि पुराणप्रसिद्ध ल्हानथोर उदाहरणांवरुन मागें अनेक वेळा सिद्ध झाली असून त्याविषयीं पुनः आतां भवति-न-भवति करीत बसणें यांत शहाणपणा व मुत्सद्दीपणा आहे, असें आम्हास बिलकूल वाटत नाहीं.

शिवाय आणखी असें की, या ज्ञानप्रधान स्वतंत्र विचाराच्या प्रभावी युगांत असा बालिश प्रश्न उपस्थित केल्यानें कांहीं जरी नसले तरी निदान हास्यास्पदपणा मात्र पदरीं पडण्याचा संभव आहे, ही गोष्ट आम्ही ओळखली नाहीं तर आमच्या बुद्धिसर्वस्वाचें सगळें दिवाळें निघालें आहे, असें मग कां म्हणूं नये? वेदावर ब्राह्मणेतरांची दृष्ट पडेल या भीतीनें त्याला धाबळींत गुंडाळून देव्हाऱ्यांत ठेवण्याचे दिवस आतां खात्रीनें राहिले नाहींत! शिवाय ज्या थोर ऋषींनीं ती दिव्य वेदरचना केली त्या महाभागांचा मानसही तसा क्षुद्र व संकुचित नव्हता, हें न समजण्याइतकें जग आज खास खुळें राहिलें नाहीं! मग दोजारणीनें कोंबडा झांकून ठेविला म्हणून उजडावयाचें कसें राहणार? कांहीं झालें तरी तो ज्ञानभास्कर अखेर उदयगिरीवर चमकणारच चमकणार! हें जर निश्चित तर या क्षुद्रपणाचें हे असलें हास्यास्पद प्रदर्शन मग करा तरी कशाला?

असो. मनुष्याला अभ्युदय व निःश्रेयस खात्रीनें प्राप्त करुन देणारे वैदिक आर्यांचे हे एकच वेदग्रंथ असल्यामुळें आत्मकल्याणेच्छु व राष्ट्रसंग्राहकेच्छु प्रत्येक हिंदूनें त्याचें ज्ञान अगत्य करून घेणें, हें सहजप्राप्तच आहे. नाहीं म्हणून आता चालावयाचें नाहीं. आज आम्ही सर्वस्वी नाडलों असून सर्व बाजूंनीं गांजले गेलों आहोत. राजकीय दृष्टीनें म्हणा, सांस्कृतिक दृष्टीनें म्हणा, धार्मिक दृष्टीनें म्हणा, अगर आर्थिक दृष्टीनें म्हणा, कोणत्याहि दृष्टीनें पाहिलें तरी हिंदूंचा हा अफाट समाज दिवसेंदिवस हमखास किडत व पोखरत चालला असून उत्तरोत्तर तो हतबल व हतप्रभ बनत चालला आहे, ही गोष्ट आज प्रत्यक्ष बोलूनच दाखविली पाहिजे असें नाहीं.

आणि या सर्व अरिष्टांचें मूळ जर कोठें रुजून राहिलें असेल तर तें एका गोष्टींत. आणि तें म्हणजे आमचें धार्मिक अज्ञान! सांस्कृतिक विस्मृति! आणि म्हणून परकीयांचें अंधानुकरण! नवनीतिवाद, समतावाद, सवगोल-कारवाद हे व असले विकारप्रधान वाद कशाचे द्योतक आहेत? कावीळ झालेल्या मनुष्यास सूर्य देखील पिवळा दिसतो आणि तापानें फणफणलेल्यास

साखरहि कडू लागते, तद्वत् पारतंत्र्यांत मुरत गातलेल्या आजच्या हिंदुसमाजास हिंदुधर्म व हिंदुसंस्कृति कडवट व तिखट वाटाची, यांत आश्चर्य तें काय? पण आम्हांस हा महारोग घालवावयाचा असेल तर श्रीवेदनारायणास सर्वात्मना शरण जाऊन त्याची मंगल कृपा व दिव्य प्रसाद प्राप्त करून घेतल्याशिवाय गत्यंतरच नाहीं. हिंदु समाजाचा उद्धार हिंदुसंघटनेनेंच व्हावयाचा आहे आणि तें प्रभावी ऐक्य व दिव्य सामर्थ्य वेदज्ञानाच्या पुनरुज्जीवनांत व पुनरुत्कर्षांत गर्भित आहे, हें विसरून आतां भागावयाचें नाहीं. वेद दुर्बोध म्हणून त्याची उपेक्षा करणें म्हणजे नारळाची कवटी कठीण म्हणून आंतील अमृताकडे पाठ वळविण्यासारखेंच वेडेपणाचें नव्हे काय?

वेदाचें ज्ञान म्हणजे सिंहिणीचें दूध! तें एकदां पोटांत उतरलें म्हणजे सर्व शारीरिक रोगांचा व मानसिक दौर्बल्याचा उपशम झालाच म्हणून समजावें. तें अंगाला एकदां लागलें म्हणजे तुम्ही सूर्यासारखे तेजस्वी व्हाल आणि सिंहासारखे निर्भय व पराक्रमी बनाल! म्हणून आम्हीं आतां त्या श्रुतिमाउलीच्या पवित्र चरणीं लोळण घेतली नाहीं तर घेणार तरी केव्हां? आणि आतां जर न घेऊं तर या 'बळी तो कान पिळी'च्या आडदांड युगांत आमचीं शंभर वर्षें भरावयास मग कितीसा अवकाश? परकीय शिक्षणानें बिघडत चाललेलें नवभारताचें दूषित रक्त 'नवमतवाद', 'समतावाद', 'सवगोलंकारवाद' अशा अनिष्ट वादांच्या रूपानें अंगावर फुटून तें दिवसेंदिवस चिघळत चाललें आहे याचें आम्हास कांहींच वाटू नये, हें आमचें खडतर दुर्दैवच म्हटलें पाहिजे, आणखी काय?

*ज्या प्रभावी संस्कृतीमुळें वैदिक आर्य प्रखर झाले व वैदिक राष्ट्र प्रबळ बनलें त्या दिव्य संस्कृतीचा नीट अभ्यास करून व त्या संस्कृतींत वाढलेल्या* व मुरलेल्या योगीश्वर याज्ञवल्क्यांसारख्या तेजस्वी ऋषिवर्यांचें दणदणीत चरित्र व खणखणीत बोल यांचें हृद्गत मनन करून त्याप्रमाणें हिंदूंनीं आपली प्रापंचिक, सामाजिक, राजकीय व पारमार्थिक नौका हाकण्याची तयारी दाखविण्याची ही आतां वेळ आली आहे आणि अशी सुवर्णसंधि जर आम्ही दुर्दैवानें दवडून बसूं तर आमच्यासारखे अभागी आमचे आम्हीच! घरांत कामधेनु असून बाहेर भिक्षा मागत वणवण फिरण्याचे हे भिकार चाळे आतां आम्ही अजून किती दिवस उराशीं बाळगून बसणार? सनातनी भारता,

ईशावास्याच्या उपासका, भगवद्गीतेच्या अभ्यासका, आतां जागा हो आणि आपली प्रभावी पूर्वपीठिका नीट न्याहाळून पाहा! प्राप्त परिस्थितीला मान लववून पाठ देण्याची स्त्रैण व दुबळी कल्पना झुगारून देऊन तिला नेटानें व धैर्यानें तोंड देऊन तिच्यांतून मुक्त होण्याची मर्दानी हांव आतां अंतःकरणांत जागृत कर! तरच तूं या आडमुठ्या जगांत टिकून राहशील आणि घरांत सुखानें नांदशील!

या बदललेल्या भीषण परिस्थितीकडे पाहून बावरलेल्या नवभारताची बावरट दृष्टि अंतर्मुख करून ती स्थिर व तेजस्वी करावयाची तर वैदिक धर्मांत ज्या कांहीं दिव्य विभूति चमकून गेल्या त्या श्रेष्ठ विभूतींच्या प्रभावी व प्रासादिक चरित्रांची व त्यांच्या दिव्य व स्फूर्तिप्रद शिकवणीची नीट ओळख करून देणें याशिवाय दुसरा कोणता मार्ग आहे? आणि योगीश्वर याज्ञवल्क्य म्हणजे अशांपैकीच एक दिव्य विभूति होय. हें आतां नव्यानेंच सांगावयास पाहिजे की काय? या दिव्य विभूतीचें चरित्र व तेजस्वी शिकवण आजमितीसहि आम्हांस कशी बोधप्रद व अनुकरणीय आहे, याविषयीं सोबत जोडलेल्या त्यांच्या चरित्रावरून वाचकांची सहज खात्री होईलच.

योगीश्वरांचें चरित्र साग्र, संपूर्ण व सुसंगत असें कोठेंच उपलब्ध होण्यासारखें नाहीं. तें निरनिराळ्या ग्रन्थांत निरनिराळ्या प्रसंगांनीं व निरनिराळ्या तऱ्हेनें तुटक तुटक असें इतस्ततः विखरून ठेवण्यांत आलें आहे. त्या सर्वांची सुसंगतवार जुळवाजुळव करून ती व्यवस्थितपणे मांडून दाखविणें हें प्रयासाचें व संशोधनाचें कार्य तर आहेच, पण तितकेंच तें पुढें चर्चेचा विषय होऊन बसण्याचा संभव आहे. तथापि आमच्या अल्पबुद्धीनें या प्रभावी चरित्राची जी काय थोडक्यांत क्रमवार मांडणी करून दाखविली आहे तिकडे वाचक उदार दृष्टीनें व समतोल मनानें पाहतील अशी आशा आहे.

हा चरित्रग्रन्थ तयार करतांना शुक्लयजुर्वेद, शतपथ ब्राह्मण, महाभारत, भागवत, विष्णुपुराण, स्कंधपुराण, वायुपुराण, मत्स्यपुराण, याज्ञवल्क्यस्मृति इत्यादि अनेक ग्रन्थांचें साहाय्य घेतलें असून शिवाय आधुनिक विद्वानांचे लेख, निबंध, संशोधनग्रन्थ यांचीहि बहुमोल मदत मिळविली आहे; व त्याबद्दल ग्रंथकर्ता त्या सर्व विद्वानांचा फार ऋणी आहे. चरित्रांतील ठळकठळक प्रश्नांवर

प्र. प्रसंगांवर आधारग्रन्थांचीं मूळ वचनें उद्धृत करून वाचकांचीं मनें तेथें तेथें सुप्रकाशित करण्याचा प्रयत्न केला आहे व तसेंच त्यांची अभिरुचि व जिज्ञासा वाढविण्यासाठीं म्हणून मधून मधून कल्पनेचे व तर्कांचे कांहीं रंगी-बेरंगी नाजूक कुंचले हळुवार फिरवून चरित्र होईल तितकें माधुर्यपूर्ण, मनो-रंजक व उद्बोधक करण्याचा प्रयत्न केला आहे. तशांत 'कात्यायनीचें अपूर्व दिव्य' हें प्रकरण जवळजवळ आमच्या पदरचें असून त्याला आधार म्हणजे मराठींतील 'मत्रेयी व कात्यायनी' हा ग्रन्थ वाचून सुचलेल्या कल्पनेशिवाय तसा विशेष म्हणण्यासारखा नाहीं. शेवटीं शेवटीं त्यांची प्रभावी शिकवण कशा स्वरूपाची होती व ती आज आम्हांस कशी बोधप्रद व मार्गदर्शक आहे हें तात्पर्यरूपानें थोडक्यांत दाखविण्यांत आलें आहे. एवंच निष्कर्ष काय तर योगीश्वर याज्ञवल्क्यजींचें चरित्र म्हणजे आज आम्हांस संजीवनीप्रमाणें उपकारक, उत्साहक व उद्धारक आहे असें म्हटल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं.

आतां 'यजुर्मणिमाले'विषयीं दोन शब्द सांगणें हें आतां क्रमानेंच प्राप्त झालें आहे. हा ग्रन्थ वाजसनेयांना तर अत्यंत पवित्र व सर्वथैव संग्राह्य असा आहेच आहे व प्रत्येक वाजसनेयानें त्याचें नित्य पठण व मनन करणें हें शिष्यधर्मास व सनातन परंपरेस धरूनच आहे. आतां समग्र यजुर्वेदाचेंच सार्थ प्रकाशन करावयाचें हें खरें, पण तें काम महत्प्रयासाचें व तशांत मोठ्या खर्चाचें असल्यामुळें तो नाद तूर्त बाजूस ठेवणें हें आम्हांस भाग आहे. तरी त्या प्रभावी व प्रासादिक ग्रन्थाची आज सामान्य जनसमूहास ओळखतीच कां होईना पण ओळख करून द्यावी या भावनेनें आम्ही त्या पवित्र ग्रन्थांतील कांहीं निवडक व तेजस्वी मंत्रांची ही 'यजुर्मणिमाला' गुंफून ती भाविक महाराष्ट्रास सप्रेम सादर करीत आहों. यांतील मंत्र असे निवडले आहेत कीं, ते त्या शाखीयांना तर नित्य उपयुक्त व उपकारक असे आहेतच इतकेंच नव्हे, तर सर्व हिंदु-मात्रांनाहि ते स्फूर्तिप्रद व प्रसादपर आहेत, हेंहि पण तितकेंच खरें आहे. यांत प्रसिद्ध पुरुषसूक्त, ईशावास्योपनिषत्, शिवसंकल्पोपनिषत्, सूर्यसूक्त, शांतिपाठ, प्रातःसूक्त, रात्रसूक्त, पितृसूक्त, रक्षोघ्नसूक्त, शिवाय नित्यपठणीय असे अनेक तेजस्वी मंत्र यांचा समावेश झाला असून, ही माला सामान्य जनतेसहि शक्य तितकी उपयुक्त व उपकारक करण्याचा अगदीं आटोकाट

प्रयत्न केला आहे. ही अल्प सेवा सुज्ञ महाराष्ट्र गोड मानून घेईल अशी आशा प्रदर्शित केल्यास ती अनाठायीं होईल काय ?

आतां आभार मानावयाचें तेवढें काम राहिलें. आणि तें उरकून ही लांबलेली प्रस्तावना आटपती घेतों. मूळ हस्तलिखित प्रत काळजीपूर्वक वाचून त्यांत योग्य त्या सुधारणा सुचविल्याबद्दल, प्रुफें तपासण्याचें क्लिष्ट काम आवडीनें व कसोशीनें केल्याबद्दल व पुस्तक छापून तयार होईतों वेळोवेळीं लागेल ती मदत करून आम्हांस सर्वस्वी उपकृत करून ठेविल्याबद्दल श्रीयुत दत्तात्रय गोपाळ जोशी, पुणें, यांचे आम्ही अंतःकरणपूर्वक आभार मानतों. तसेंच समर्थ भारत छापखान्याचे चालक श्रीयुत सदाशिवराव सरदेसाई यांनीं याज्ञवल्क्य-चरित्र व शेवटचीं 'अ' व 'ब' परिशिष्टें वेळेवर व उत्तम रीतीनें छापून दिलीं याबद्दल त्यांचेही आभार मानतों. त्याचप्रमाणें याज्ञवल्क्य-चरित्र छापून तयार झाल्यावर त्यास 'शुक्लयजुर्मणिमाला' जोडावयाचा बेत आयत्या वेळीं ठरल्यामुळें तें छापाईचें काम आर्यभूषण प्रेसचे मॅनेजर रा. रा. विठ्ठलराव बर्वे यांनी मनावर घेऊन अल्प मुदतींत फार सुन्दर रीतीनें करून दिल्यामुळें त्यांचे आभार मानावे तितके थोडेच आहेत. शिवाय ज्या सद्गृहस्थांनीं आम्हांस या कामी सहानुभूतिपूर्वक उदार मदत केली त्या सर्वांचेही आम्ही येथें मनःपूर्वक आभार मानतों.

आतां शेवटीं इतकेंच कीं, या सुंदर व सुमधुर पुष्पानें प्रत्येक महाराष्ट्रीयाचें घर सुशोभित व सुप्रसन्न होऊन तेथें शांति, शक्ति, सुख व समाधान यांचें उदंड साम्राज्य नांदो अशी त्या मंगलमय वेदोनारायणाजवळ मनोभावें प्रार्थना करून वाचकांची आम्ही सप्रेम रजा घेतों.

सदाशिव ७५३, पुणें,<br>
ता. १५-२-३६

ग्रंथकर्ता

---

# अनुक्रमणिका

ॐ

# श्रीमद्योगीश्वर याज्ञवल्क्य ब्रह्मर्षि

यांचें

## प्रभावी चरित्र

## पूर्वार्ध

### दिव्य तारा चमकला !

पुण्यश्लोक जनक राजाच्या प्रसिद्ध मिथिला नगरीमध्यें ब्रह्मरात नांवाचे महान् तपोनिष्ट मुनि राहत असत. यांस कोणी 'देवरात' असेंहि म्हणत. हे अन्नदान करण्यांत मोठे उदार असल्यामुळें त्यांस वाजसनि असेंहि म्हणण्याचा परिपाठ होता. हे वेदाध्ययनसंपन्न असून आचरणानें अत्यंत शुद्ध व पवित्र होते. यांना पापवासनेचा गंधहि नव्हता, मग लोभाचें नांव येणार तरी कोठून?

तो फाल्गुन शुद्ध पंचमीचा दिवस ! त्या दिवशीं ब्रह्मरातांचें घर आनंदोत्सवानें फुलून व खुलून गेलें होतें ! तेथें एक दिव्य तारा नुकताच चमकूं लागला होता ! अहाहा ! केवढा भाग्याचा दिवस ! ब्रह्मरातांचा आनंद म्हणजे आतां त्रिभुवनांत मावतां मावेना ! महर्षींना पुत्रदर्शन झालें ! आणि वैदिक ज्ञानभास्कराला जन्म देणारी मायमाउली धन्य झाली ! सनातन धर्माचा श्रेष्ट प्रवक्ता जन्मास आला ! आणि वैदिक धर्माचें प्रखर तेज शाश्वत झालें ! अशी ही दिव्य विभूति म्हणजे आमचे चरित्रनायक योगीश्वर याज्ञवल्क्य होत हें आतां उघड सांगावयास पाहिजे कीं काय ? (वि. पु. अं. ३, अ. ५, २.)

हे प्रख्यात वैशंपायन ऋषींचे भाचे आणि सहस्ररश्मि सूर्यनारायणाचे पट्टशिष्य; सरस्वतीचे कंठमणि, आणि शुक्लयजुर्वेदाचे मूळ द्रष्टे; वाजसनेय शाखेचे आद्य प्रवर्तक आणि वैदिक धर्माचे प्रमुख अध्वर्यु; तत्त्वज्ञानाचे श्रेष्ट उपदेशक आणि अद्वैतवादाचे लोकोत्तर प्रणेते. तेव्हां अशा अद्वितीय विभूतीचे

धन्यवाद गावे तरी किती? आणि गाइले म्हणून संपणार तरी कसे? तथापि या अलौकिक कर्मयोगाची आणि तेजस्वी ज्ञानभास्कराची ओझरतीच कां होईना पण ओळख करून द्यावी या उद्देशानें त्यांच्या चरित्रासंबंधीं चार ठळक गोष्टींचा येथें उल्लेख करून ठेवतों.

ब्रह्मरातांचें घराणें म्हणजे मोठें सुचिर्भूत व आचारसंपन्न घराणें. तशांत खुद्द ब्रह्मरात हे मोठे विद्यासंपन्न, आचरणशील, तपोधन व धर्मनिष्ठ असून शिवाय ते मनाचे उदार व हाताचे सढळ असे होते. तसेंच, जनक राजे झाले तरी विद्याभ्यासंगी व उदारचरित असल्यामुळें ते गुणी व विद्वान लोकांचे मोठे चाहते व आश्रयदाते होते. अशा विद्वान व उदार राजाच्या प्रेमादरास व कृपालोभास हे आमचे ब्रह्मरात सर्वस्वी पात्र झाले असून त्यांना राजाचा मोठा आधार व आश्रय होता. यामुळें त्यांची गृहस्थिति चांगली व संपन्न होती. ते जसे विद्यासंपन्न होते तसेच अन्नदान करण्यांतहि मोठे उदार असल्यामुळें, त्यांना वाजसनि म्हणजे अन्नदाता हें टोपण नांव प्राप्त झालें असून पुढें त्या नांवानेंच ते प्रसिद्धीस आले.

परमेश्वराची लीला अशी कांहीं अगाध व विचित्र आहे कीं राजा असो वा रंक असो, प्रत्येकामागें तो कांहींना कांहींतरी हुरहुर लावून ठेवीत असतो. आणि याला आमचे ब्रह्मरात तरी अपवाद कोठून असणार? त्यांना इतर सर्व गोष्टी अनुकूल होत्या; व योगक्षेमहि सुरळीत व सुयुक्त चालला होता. हें जरी खरें असलें तरी त्यांच्या सोन्यासारख्या सुंदर संसारांत एका गोष्टीची मात्र मोठी उणीव होती. घरांत कुलदीपक नव्हता! त्या काळच्या समजुतीप्रमाणें ही उणीव कांहीं लहान सान नव्हती. पुत्र म्हणजे त्या वेळीं एक मोठें भाग्य समजलें जात असे. वैदिक धर्मांत पुत्राचें महत्त्व मोठें असल्यामुळें निपुत्रिक असणें अगर मरणें हें वैदिकांस केव्हांहि चिंताजनक व तापदायक असतें हें आजच कांहीं नव्यानें सांगण्याचें कारण नाहीं. घरांत त्रैलोक्याचें वैभव जरी नटलेलें असलें तरी तेथें पुत्ररत्नाचा आल्हादजनक मधुर प्रकाश फुललेला नसला, तर तो कुबेराचा संसारहि स्मशानाची भयाण छाया धारण करीत असतो; निदान तसा निपुत्रिकांना भास तरी होत असतो, हें कांहीं खोटें नाहीं. ब्रह्मरातांचें घरहि आतां असेंच शुष्क व शून्य दिसत होतें.

महाराजांची सुशील पत्नी आली तरी आतां महाराजांप्रमाणेंच चिंतातुर व उदास दिसत होती. दुर्दैवी बिचारी ! करणार काय ? जिच्या नशिबीं पुत्र-सुख पाहण्याचें महद्भाग्य लिहिलेलें नाहीं त्या हतभागी स्त्रीसारखी दुःखी व उदास म्हणजे तिची तीच ! घरांत ईशकृपेनें बाकीचें सर्व कांहीं अनुकूल असून, ही एवढीच बाब तिला मोठी बोचक व चिंताजनक व्हावी, हें त्या माउलीचें केवढें दुर्दैव ! पण ईश्वरी संकेतापुढें कोण धांवला आहे ! 'ठेविलें अनंतें तैसेंचि रहावें' हो सतोक्ति डोळ्यापुढें ठेवून दिवस काढावयाचे नाहींत तर कोणाचें समाधान होणार आहे ? आणि या मंत्राचा जप करीतच ती बिचारी कशी बशी तरी दिवस कंठीत होती हें सांगण्याची आतां अवश्यकता राहिली नाहीं.

अरेरे ! बिचारी दुर्दैवीच खरी ! ती या नव्या मन्वंतरांत जन्म घेती तर काय मौजें झालें असतें ! संततिनियमनाचे आतां केवढे कोट कौतुक चाललें आहे हें त्या बिचारीला काय ठाऊक ! व्याख्यानें काय झडत आहेत, लेख काय चमकत आहेत, सभा काय भरत आहेत, चर्चा काय माजली आहे, हें तिला कसें कळावयाचें ? ही गंमत पाहून तिचा जीव थोडा तरी खालीं पडला असता ! पण त्या वेळची स्थिति म्हणजे अगदीं उलट. 'अष्टपुत्रा सौभाग्यवती भव' या मंगल आशीर्वादाचा तो चालता काळ होता ! आणि त्या शुभ आशीर्वादानेंच आर्य स्त्रियांच्या अंगावर चार बोटें मांस चढत असे ! पण आज मात्र आमच्या नवशिक्षित व नवनीतिप्रवण स्त्रियांना कसला आशीर्वाद द्यावयाचा हा वडील माणसांना खरोखर एक मोठा प्रश्नच होऊन बसला आहे ! 'संततिनियमन' व 'समाजस्वास्थ्य' इकडे ज्यांचें मन वेधलें आहे, त्या विलासप्रिय स्त्रियांना 'अष्टपुत्रा' आणि 'सौभाग्यवती' हे दोन्ही आशीर्वाद बावडे व भुजविणारे असेच आहेत, नव्हे काय ? वैदिक स्त्रियांना जो मंगल आशीर्वाद तोच आज त्यांच्याच मुलींना शापाप्रमाणें प्रखर व झोंबणारा वाटावा हा काळाचा केवढा विलक्षण महिमा ! तो संततिनियमनाचा पोवाडा गाणारा बुळबुळीत काळ नसल्यामुळें महाराज काय किंवा त्यांची पत्नी काय, कोणी झालें तरी दुःखी कष्टीच होते, हें आतां लपवून ठेवण्यांत कांहींच अर्थ नाहीं. संतति नसलेलें घर म्हणजे फूल नसलेली बाग अथवा चंद्र

नसलेली निशा असेच जग समजत आले आहे, आणि ते खर नव्हे असे कोणी व कसें म्हणाव ?

काहीं जरी असले तरी वैदिक लोकाचा एक गुण मोठा वाखाणण्यासारखा खरा ते कधींहि हताश होत नसत हा त्याचा गुण प्राचीन इतिहासात पदोपदी पाहावयास मिळतो त्याची चिकाटी भारी दांडगी आणि प्रयत्नाची शिकस्त म्हणजे काही पुसू नका जेव्हा लौकिक प्रयत्न निष्फल होतात असे वाटे, तेव्हा ते यज्ञेश्वराचा हटकून धावा करीतच करीत, आणि अशा दैवी उपायाने तरी ते आपली मनीषा शेवटीं तृप्त करून घेतच घेत

ब्रह्मरातानी आता हाच मार्ग स्वीकारला होता पुत्रप्राप्तीसाठी आता त्यानीं यज्ञनारायणाची एकनिष्ठपणें आराधना चालविली होती आणि चमत्कार हा कीं, पुढें काही दिवसानी या त्याच्या प्रयत्नास सुदर यशहि आले आणि त्याची स्त्री गरोदर झाली ! पुढें नवमास सपल्यावर, प्रारभी म्हटल्याप्रमाणे फाल्गुन शुद्ध पचमीस ब्रह्मराताना पुत्रदर्शन झालें ! मग त्याचा आनद काय सागावा ? प्रत्यक्ष ब्रह्मदेवच त्याच्या उदरीं जन्मास आले ( स्कद १ ६० ४२ )

## बालपण

मग आता विचारता काय ? फार दिवसानी आणि मोठ्या नवसानें झालेले मूल आणि त्यात याज्ञवल्क्यामारखे तेजस्वी रत्न ! कोण आनदानें नाचणार नाहीं ? त्या सुशील दापत्याच्या स्वर्गीय सुखास व आनदास येलेवर रेंगण झालें असल्यास नवल तें काय ? आनद, उत्साह, सभ्रम याचा तेथें एकच कल्लोळ उसळला होता आणि का नये उसळू ? आकाशातील शेकडो मैल वरच्या चद्राला पाहून पृथ्वीवरील रत्नाकर आनदानें उचबळत असतो, तर नवमास तपश्चर्या करून असह्य प्रसववेदना सहन करून प्रसादरूपाने प्राप्त करून घेतलेल्या गोजिरवाण्या राजहसाला मांडीवर घेऊन लडिवाळपणा मेळवितांना कोणती माउली आपलें भान विसरणार नाहीं ? आणि कोणती माउली त्या स्मितमुख चद्राकडे पाहून स्वर्गसुखालाहि लाथाडून देणार नाहीं ? ब्रह्मरातांचे घर म्हणजे आता प्रत्यक्ष स्वर्गातील इंद्रभुवन झाले होते !

त्या नूतन चंद्राला शुक्ल पक्ष लागला आणि तो दिवसेंदिवस फुलत व खुलत चालला. तें गोजिरवाणें बालक आतां हसूं लागलें, बोलूं लागलें, रांगूं लागलें, चालूं लागलें, नाचूं लागलें आणि बागडूं लागलें. ब्रह्मरातांच्या घरांत आतां केवढा आनंद! त्याला उचलून घेतां, चुंबितां, हासवितां, खेळवितां, बोलवितां, नाचवितां मातेच्या हृदयांत जो प्रेमाचा पूर लोटत असे तो कोण वर्णन करणार? तें पवित्र मातृपद प्राप्त करून घ्यावें तेव्हांच त्या दिव्य अमृताची मधुर गोडी अनुभवावी! इतरांना त्याचें काय?

खेळणाऱ्या व बागडणाऱ्या स्तनंधया याज्ञवल्क्याला पाहून ब्रह्मरातांचें हृदय आनंदानें उचंबळून येई. जातां येतां ते त्याला पटकन् उचलून त्याच्या धूलिधूसर मधुर गालाचा गोड पापा घेऊन, निमिषार्धच कां होईना, त्या अनिर्वचनीय ब्रह्मानंदांत अगदीं तल्लीन होत! केव्हां त्याच्याशीं बोबडें बोलत तर केव्हां त्याच्याशीं खेळ खेळत, केव्हां त्याला रडवून आपण हसत आणि केव्हां त्याला हसवून आपण रुसत, केव्हां त्याला खेळवून आपण रमत तर केव्हां त्याला रमवून आपण खेळत. केव्हां त्याला नाचवून आपण डुलत आणि केव्हां त्याला डुलवून आपण नाचत! याप्रमाणें त्या श्रेष्ठ प्रेमानंदाची मन मुराद लूट करून आपल्या मनाची हौस ते यथेच्छ पुरवून घेत. त्यांचा गृहस्थाश्रम आतां धन्य झाला होता आणि तीं उभयतां मातापितरेंहि खरोखर धन्य धन्य झालीं होतीं!

याप्रमाणें वाढतां वाढतां याज्ञवल्क्य आतां सात वर्षांचा झाले होते. त्याचा खेळ, ती आनंदी वृत्ति, तो मधुर चेहरा, ते सुंदर बोल, आणि तें मनोहर हास्य, पाहून कोणीहि त्याचें कौतुकच करी. शेजारीं पाजारीं दर्शील ती खेळकर वृत्ति व उमदा चेहरा पाहून सदा त्याच्या भजनीं लागलेले असत. मग आईबापाच्या कोडकौतुकांबद्दल कितीहि सांगितलें म्हणून काय व्हावयाचें आहे? पुत्रप्रेम असें कधीं मागून पुरवलें आहे काय? आणि हा अनुभव ज्या त्या आईबापास घरोघर असतोच असतो, मग निराळें वर्णन करून सांगा तरी कशाला अडवूं?

याप्रमाणें सातवें वर्षहि संपून गेलें आणि आठवें लागलें. ब्रह्मरातानें योग्य मुहूर्त पाहून त्याचा व्रतबंध केला आणि त्यास गायत्री-उपदेश दिला. आतां त्याची बालदशा संपून अध्ययनकाल लागला. त्याचे मातुल जे वैशंपायन

तेच यजुर्वेदाचे मुख्य अमल्यामुळें ब्रह्मरातांनीं त्यांस विद्याग्रहणार्थ म्हणून तेथें नेऊन ठेविलें.

याज्ञवल्क्यांचे मूळ नांव ब्रह्मराति असें होतें. ब्रह्मरातांचा पुत्र तो ब्रह्मराति. ब्रह्मरात यांस वाजसनि हें टोपण नांव होतें असें वर सांगितलेंच आहे. त्या वाजसनीचा पुत्र म्हणून त्यांस वाजसनेय असेंहि म्हणत असत. आणि त्यांचा जन्म यज्ञवल्क्यकुळांत झाला असल्यामुळें त्यांस याज्ञवल्क्य हें गोत्रनांवहि प्राप्त झालें. *या दृष्टीनें त्यांचें संपूर्ण नांव आजच्या पद्धतीनें सांगावयाचें म्हणजे* ब्रह्मराति वाजसनेय याज्ञवल्क्य असें सांगतां येईल. त्या वेळीं व्यक्ति ओळखावयाची म्हणजे मूळ नांवापुढें बापाचें नांव घालून ओळखीत असत. जसें उद्दालक आरुणि, राम दाशरथि, व्यास पाराशर्य, जनमेजय पारीक्षित, हिरण्यनाभ कौसल्य इत्यादि, इत्यादि.

याज्ञवल्क्य हें व्यक्तीचें नांव नसून कुळाचें अगर गोत्राचें असावें असें दिसतें. वैदिक वाङ्मयांत अनेक याज्ञवल्क्यांचा उल्लेख आढळून येतो. धर्मराजाच्या राजसूय यज्ञांत एक याज्ञवल्क्य अध्वर्यूंच्या कामावर होते. (भा. स. ३६-३४) पराशर-सत्यवती विवाहांत दुसरे एक याज्ञवल्क्य पुरोहितपदावर आरूढ झालेले होते. बाष्कलांच्या शिष्यगणांत एक याज्ञवल्क्य आढळतातच; आणि चौथे म्हणजे हे ब्रह्मराति याज्ञवल्क्य होत. म्हणजे वैदिक ग्रंथांत एकापेक्षां अधिक याज्ञवल्क्यांचा उल्लेख आढळतो. तरी याज्ञवल्क्य या नांवानें प्रसिद्ध असलेले म्हणजे हे आमचे चरित्रनायक ब्रह्मराति वाजसनेय याज्ञवल्क्य होत. आज लोकमान्य टिळक म्हणजे बाळ गंगाधर टिळक असा जसा बोध होतो तद्वत् योगीश्वर याज्ञवल्क्य म्हणजे ब्रह्मराति वाजसनेय याज्ञवल्क्यच असा अर्थ ध्वनित होतो. हे कौशिक गोत्री असून विश्वामित्रवंशज असावेत.

---

# विद्यासाधन

तें विसावें शतक नव्हे—तर विसाव्या शतकाच्या पलीकडलें, तिसावें शतक! मग त्या वेळेला शाळा कोठली, हायस्कूल कोठलें नि कॉलेज कोठलें! कशास काय, ठाव ना ठिकाण! तेव्हां पंतोजीहि नव्हते, मग प्रोफेसर कोठून येणार? त्या वेळेला कांहींच नव्हतें. परीक्षा नव्हती, पदवी नव्हती आणि पारितोषिक नव्हतें. असलें ढोंग त्या वेळीं मुळींच नव्हतें! तेव्हां पुस्तकें नव्हतीं कीं आणखी कांहीं नव्हतें. या दृष्टीनें आजच्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे तें अंधःकारयुग! पाश्चात्यांचें तें गरगरीत अंधःकारयुग! पण वाचकहो, वैदिक आर्यांचा—प्राचीन भारतीयांचा मात्र—तो देदीप्यमान प्रभावी काळ!! वैदिक ज्ञानभास्कर त्या वेळीं भरतखंडावर पूर्ण मध्यान्हींच्या प्रखर तेजानें चांगला तळपत होता. वैदिक ऋषि पवित्र ज्ञानाच्या कैलास-पर्वतावर आरोहण करुन नागाप्रमाणें आनंदांत डुलत होते. भारतीय राज्य-लक्ष्मीचा दिव्य मुकुट आकाशांतील पौर्णिमेच्या प्रफुल्ल चंद्राप्रमाणें वैदिक राजयशांत मोठ्या वैभवानें मिरवीत होता. आर्य क्षत्रियांचें प्रखर व प्रभावी सामर्थ्य पूर्ण कळसास पोंचून जगभर त्यांचा यशोदुन्दुभि दुमदुमून राहिला होता! असा तो भाग्यशाली भारतीयांचा ऐन भरभराटीचा वैभवकाळ होता!

अशा वैभवसंपन्न व विद्याप्रचुर प्रभावी काळाकडे आतां वाचकांस आमच्याबरोबर आलें पाहिजे. ज्या प्रभावी शिक्षणाच्या योगानें याज्ञवल्क्यां-सारखे प्रचंड ज्ञानमेरु निर्माण झाले तें ओजस्वी शिक्षण आणि तें देणारें तेजस्वी आचार्यमंडळ यांची तुम्हांस आज कल्पनाहि करवणार नाहीं. तेथें पुस्तक-पाटीचें म्हणाल तर बिलकूल नांव व काम नव्हतें. विद्यार्थ्यांचा मेंदू ही पाटी आणि आचार्यांची जिव्हा ही पेनसिल! एवढ्यावरच त्यांनीं जगावर अध्यात्मविद्येचें जें साम्राज्य स्थापन केलें आहे तें आतांपर्यंत कोणालाहि उलथून पाडण्याचें धैर्य व धाडस झालें नाहीं, हें जगांतील आठवें आश्चर्य म्हणूं नये तर काय? तेव्हां पाटी-पुस्तक, शाळा-कॉलेज, मास्तर-प्रोफेसर, नव्हते म्हणून ते लोक शिक्षणांत मागसलेले व विचारांत सुस्तलेले होते—आणि तुम्ही आज हें शाळा-कॉलेजचें उच्च व उदार शिक्षण घेऊन पुढारलेले व

सुधारलेले आहांत अशी जर तुम्ही समजूत करून घ्याल तर ती निवळ भ्रम- भोळा भाबे शुद्ध भ्रम-आहे असेंच आग्रही म्हणूं; आणि इतिहासाला कौल लावाल तर तोहि तुम्हांला तोच कौल देईल ! याज्ञवल्क्यांचा तो तेजस्वी काल म्हणजे तसाच कांहीं प्रभावी होता ! त्या वेळीं कडकडीत तपश्चर्या करून मोठ्या कौशल्यानें निर्माण केलेल्या पवित्र ज्ञानमंदिरांतील सुंदर शारदेची मनोहर मूर्ति पाहून आजचेंखील हें सुधारलेलें जग आश्चर्यानें तोंडांत बोट घालीत आहे ! मग त्यांना अज्ञानी व अशिक्षित कसें म्हणावयाचें ? त्या सरस्वतीभक्तांनीं एकनिष्ट उपासना करून त्या दिव्य शारदेची पवित्र मूर्ति नानालंकारांनीं नटवून सजवून इतकी रमणीय व शोभिवंत केली आहे कीं, तिच्या शृंगारभूषणात साजेसा एखादा नवा अलंकार तयार करण्याचें भाग्य आज जगांतील एकाहि पंडिताच्या नशिबीं नसावें ही केवढ्या दुःखाची गोष्ट ! मग या बिचाऱ्या शतकाला प्राचीन शिक्षणाची थट्टा व कुचेष्टा करण्याचा अधिकार तरी काय ?

वैशंपायनांचा तो आश्रम म्हणजे त्या वेळचें तें यजुर्वेदाचें मुख्य विद्यापीठच ! द्वैपायन व्यासांनीं एका वेदाच्या चार संहिता करून, त्यांपैकीं यजुर्वेद संहिता वैशंपायनांकडे दिली असल्यामुळें, यजुर्वेदाच्या मुख्य विद्यापीठाचा मान वैशंपायनांच्या आश्रमास मिळाला होता. त्यांच्या अध्यक्षतेखालीं व अधिकाराखालीं हें विद्यापीठ नवीनच अस्तित्वांत आलें होतें. त्याचप्रमाणें ऋग्वेदाचें मुख्य पीठ पैल ऋषींकडे, सामवेदाचें जैमिनींकडे, व अथर्ववेदाचें सुमंतुकडे सोंपवून बादरायणाचार्यांनी आपली लेखणी इतिहास-पुराणांकडे वळविली होती ( विष्णु पु. अं. ३. अ. ४, ७-८-९ ). याप्रमाणें आर्यावर्तांत चार वेदांचीं चार मुख्य विद्यापीठें नुकतींच स्थापन होऊन, तेथें नवीन तऱ्हेचा शिक्षणक्रम अमलांत आला होता. आणि या विद्यापीठांत त्या वेळच्या शिरस्त्याप्रमाणें शिक्षण घेण्यास शेंकडो विद्यार्थी एकत्र जमले होते. त्यांपैकीं वैशंपायनांच्या आश्रमांत विद्याग्रहणार्थ म्हणून याज्ञवल्क्य हे त्यांचें उपनयन होतांच येऊन दाखल झाले.

याज्ञवल्क्य म्हणजे कांहीं समान्य मूर्ति नव्हती. वय लहान पण मुद्रा केवढी गंभीर ! ते लकलकणारे पाणीदार डोळे आणि तो रेखीव व तेजस्वी चेहरा पाहिला म्हणजे कोणालाहि त्यांच्या अलौकिकपणाची सहज साक्ष

पडावी. त्यांच्या बोलण्यांत, त्यांच्या चालण्यांत, त्यांच्या पाहण्यांत व एकंदरींत त्यांच्या वर्तनांत व चर्येत अशी काहीं एक मोहिनी होती, कीं तिजमुळें जो तो त्यांच्यावर जीव कीं प्राण करी, व लोहचुंबकाप्रमाणें आकर्षिला जाई. त्या लहान वयांतच त्यांच्या कुशाग्र बुद्धीची तेजस्वी लकेर मधून मधून चमकूं लागली होती. स्मरणशक्ति काय, ग्रहणशक्ति काय, पठणशक्ति काय सगळेंच कांहीं अलौकिक! एकदां कानानें ऐकून, तोंडानें म्हटलें कीं तसलेंच जाऊन कायम बुद्धींत, आणि मनानें घेतलें कीं तडीलेंच तें करीत! त्यांचा निश्चयी स्वभाव व अध्ययननिष्ठा पाहून कोणीहि त्यांची वाहवा व कौतुकच करी.

हा ब्रह्मचर्याश्रम म्हणजे वैदिक धर्माचा मूळ व मुख्य पाया होय. मूळ पाया म्हटलें याचें कारण असें कीं सुख, संपत्ति, विद्या, बल, आयुष्य, आरोग्य हीं सर्व या आश्रमावरच सर्वस्वी अवलंबून आहेत. येथें पेरावें तसें पुढें उगवतें. म्हणून हा आश्रम सर्व पुरुषार्थाचा मूळ आधार असून, मनुष्याच्या आयुष्क्रमांतील अत्यंत महत्त्वाचा भाग आहे. याचा उद्देश हा कीं गुरुगृहीं राहून विद्या शिकावयाची आणि व्रतनिष्ठ राहून आयुरारोग्य कमवावयाचें. त्या वेळीं विद्या शिकावयाची म्हणजे कांहीं सोपें काम नव्हतें. गुरुदेवतेसन्निध बैठक घालून, गुरुमुखाकडे एकाग्र दृष्टि ठेवून, सावधान चित्तानें गुरुमुखांतून वाहणारी ज्ञानगंगा स्वमुखांतून अंतःकरणांत काळजीपूर्वक सांठवून ठेवावयाची. पण हें काम काय सोपें म्हणावयाचें? ऋग्वेदासारखे प्रचंड ग्रंथ तोंडानें घोकून बुद्धींत उमटविण्याची गोष्ट काय सामान्य कोटींतील म्हणतां? आज सुधारलेल्या पद्धतीनें उच्च शिक्षण घेणाऱ्या आमच्या प्रौढ विद्यार्थ्यांना—छे, विद्यार्थी कसले, हौशी फुलपांखरेंच कां म्हणाना!—घट शंभर ओळीतरी तोंडानें घडाघड पाठ म्हणतां येतील, अशी हमी कोणी खात्रीनें देऊं शकेल काय? आज विद्यार्थ्यांचें ज्ञान काय तें सगळें पुस्तकांत! परीक्षा होऊन तीं एकदाचीं हातानिराळीं झालीं म्हणजे त्यांचा मेंदूही पण पुनः पूर्वीप्रमाणें कोरा करकरीतच!! पण प्राचीन विद्यार्थ्यांची गोष्ट अशापैकीं नव्हती. तेव्हांचे विद्यार्थी पाहिले तर तोंडानें घोकून एकदां बुद्धींत सांठविलें म्हणजे तुम्ही त्यांना केव्हांहि मध्यरात्रीं झोंपेंतून उठवून म्हणावयास सांगा, कीं ग्रामोफोनप्रमाणें कैलीच त्यांनीं सुरवात. पुस्तकासाठीं कपाटाकडे धूम ठोकण्याची त्यांना गरजच लागत नसे. ही त्यांची जगती विद्या कोणीकडे

आणि हे आमचें चंचल पुस्तकी ज्ञान कोणीकडे! ऋग्वेदासारखे प्रचंड ग्रंथ जिव्हाग्रीं घेऊन, त्याला थयथय् नाचविणें ही काय लहानसहान गोष्ट झाली? एक ऋग्वेदच काय, तमले चारहि वेद जिभेवर घेऊन ते सहज लीलेनें खेळवीत असत. केवढी त्याची ही प्रचंड पठणशक्ति! केवढें त्यांचें हें विशाल ग्रहण-सामर्थ्य! काय त्यांची ही विलक्षण स्मरणशक्ति! केवढा त्याचा दीर्घ उद्योग आणि केवढी त्यांची ही खडतर तपश्चर्या!! आम्ही हें काहीं तरी लिहितो असें मात्र तुम्ही समजू नका. आमचे चरित्रनायकच प्रत्यक्ष साक्ष आहेत. चारही वेद त्यांनी आपल्या जिव्हाग्रीं घेतले होते. आणि हें तपानुष्ठान काय लहान आहे? 'दीर्घसत्रं वा एष उपैति । यो ब्रह्मचर्यमुपैति ॥'—जो ब्रह्मचर्य पाळतो तो महायज्ञाचच अनुष्ठान करतो—असें पुढे त्यानीं शतपथांत लिहून ठेवून तत्कालीन विद्यार्थ्यांचा मोठा गौरव केला आहे, तो काहीं उगीच नव्हे! प्राचीन वैदिक विद्यार्थ्यांचा दाखला आजपर्यंत पृथ्वीच्या पाठीवर इतरत्र कोठेंही पाहावयास मिळणार नाही, आणि म्हणूनच त्याच्या दीर्घ व दिव्य तपश्चर्येच करावें तितकें कौतुक थोडेंच आहे.

हा याज्ञवल्क्याचा काळ म्हणजे वैदिक वाङ्मयात अत्यंत धडामोडीचा व चळवळीचा असा तो जिवंत व प्रभावी काळ होता. प्रसिद्ध भारतीय युद्ध शांत होऊन पन्नास वर्षे झाली असतील नसतील. भगवान् श्रीकृष्णजी नुकतेच अंतर्धान पावलेले, पुण्यश्लोक धर्मराजाची आठवण अजून लोकांमध्ये ताजी टवटवीत असलेली, सम्राट् जनमेजयाच्या प्रसिद्ध सर्पसत्राचा आता कोठें समारोप झालेला, यज्ञसंस्थेला प्रौढ व श्रेष्ठ स्वरूप प्राप्त होऊन ती भव्य व विशाल दिसू लागलेली. अध्यात्मशास्त्राला खोल व सूक्ष्म विचाराचा दिव्य उजळा मिळून, विचारी लोकांची विवेकबुद्धि आस्ते आस्ते मोक्षप्रवण होत चाललेली असून अशा सुमारास आर्यावर्तात जिकडे तिकडे कर्म व ज्ञान याचा उत्कर्ष व विकास होऊन, भारतीयाचा तेजस्वी इतिहास जगभर सगळा दुमदुमून राहिला होता असें म्हटल, तर त्यात अतिशयोक्ति ती काय झाली?

अशा प्रभावसंपन्न काळात याज्ञवल्क्याच्या समकालीन असणारे अनेक थोर व विद्वान् ऋषि व कर्मवीर पुण्यश्लोक राजे आकाशातील तेजस्वी नक्षत्रा-प्रमाणें जेथें तेथें चमकू लागले होते. यजुर्वेद विद्यापीठाचे कुलगुरु व महाभारताचे प्रणेते वैशंपायन, अध्यात्मविद्येचे प्रमुख व प्रसिद्ध आचार्य उद्दालक

आरुणि, ऋग्वेदाचा पदपाठ लावणारे शाकल्यमुनि, योगशास्त्राचे महामहोपाध्याय हिरण्यनाभ, सांख्यशास्त्रप्रणेते कपिल मुनि, अध्यात्मज्ञानाचे श्रेष्ठ प्रवक्ते पिप्पलाद, सामवेदाचे आद्य प्रचारक लोकविख्यात जैमिनी, पातिव्रत्याचा पुरस्कार करून विवाहसंस्थेवर दिव्य संस्कार करणारे नीतिप्रवर्तक श्वेतकेतु, प्रत्यक्ष यमाच्या घरीं राहून स्वर्गीय अमर विद्या मृत्युलोकांत आणणारे ज्ञानवीर नाचिकेत, प्रसिद्ध तत्त्ववेत्ते व सत्यवक्ते सत्यकाम जाबाल, सम्राट् जनमेजय, पुण्यश्लोक विदेही जनक, अशीं एकापेक्षां एक दिव्य व सुंदर सुंदर भारतरत्नें त्या वेळीं जागजागीं विखुरलीं असून, त्यांच्या विविध व मनोहर प्रकाशानें ही पवित्र भूमि अधिकच स्पृहणीय व रमणीय दिसत होती ! अशा भाग्यशाली भारतभूचें वैभव काय वर्णन करावें !

अशा ज्ञानवैभवसंपन्न युगांत याज्ञवल्क्य कडकडीत ब्रह्मचर्य पाळून, शारदादेवीच्या पवित्र उपासनेंत अहोरात्र मग्न झाले होते. वैशंपायनांच्या आश्रमांत राहून यजुर्वेदाचें त्यांनीं यथासांग व शास्त्रशुद्ध अध्ययन केलें. पण येवढ्यावरच त्यांची तहान कमली भागायला ? त्यांना आणखी पुष्कळ शिकावयाचें होतें. त्यांना तत्कालीन विद्वन्मंडळांत मागेंपुढें अग्रपूजेचा मान पटकावयाचा होता. मग एका यजुर्वेदानें काय व्हावयाचें होतें ? म्हणून ते आतां आत्मज्ञानाचें शिक्षण घेण्यासाठीं आत्मज्ञानाचे प्रसिद्ध आचार्य उद्दालक आरुणि यांच्याजवळ येऊन राहिले.

हे उद्दालक आरुणि म्हणजे त्या वेळचे आत्मविद्येचे एकमेवाद्वितीय असे प्रमुख आचार्य होत. त्यांचें अध्यात्मशास्त्रावरचें प्रभुत्व मोठें प्रशंसनीय होतें; आणि मंत्रविद्येंतील गुह्य ज्ञानांत त्यांचा हातखंडा होता. यांना समाधियोग उत्तम साधला असून नेहमीं ते त्या सुखांत तल्लीन असत. मोठमोठे ज्ञाते लोकहि यांच्याकडे अध्यात्मविद्या शिकण्यासाठीं म्हणून येऊन राहिले होते. श्वेतकेतुला सांगितलेलें ' तत्त्वमसि 'चें तत्त्वज्ञान मोठें सुंदर व मननीय असून तें छांदोग्योपनिषदांत पाहावयास मिळेल. अशा श्रेष्ठ व तत्त्वज्ञाननिपुण गुरुजवळ राहून, याज्ञवल्क्यांनीं अध्यात्मविद्या साध्य करून घेतली आणि मंत्रसिद्धीचें गुह्यज्ञानहि संपादन केलें. ( श. ब्रा. १४-९-४-३३ )

याप्रमाणें उद्दालक आरुणींजवळ राहून, आत्मविद्या व मंत्रसिद्धि प्राप्त करून घेतल्यावर, पुढें ते इतर वेदांची मंथा घेण्यास शाकल्य मुनींजवळ

येऊन राहिले. हल्ली ऋग्वेदाची संहिता रूढ आहे ती या शाकल्यांनीच लाविलेली आहे. शिवाय ऋग्वेदाचा हल्लींचा जो पदपाठ आहे, तोही यांनींच केला आहे. आणि त्याचा तात्त्विक अर्थ लावणारेहि हेच आहेत. अशा श्रेष्ठ विभूतीजवळ आमचे चरित्रनायक विद्याध्ययन करीत राहिले होते. ( स्कंद ६-१२९ )

—

## एक अद्भुतरम्य प्रसंग

याज्ञवल्क्य हे शाकल्य ऋषींजवळ राहून वेदाभ्यास करीत असतांना एक अद्भुत प्रकार घडला. त्याचा येथे निर्देश करूनच पुढें जाणें हें आम्हास युक्त दिसते हे शाकल्य ऋषि म्हणजे मोठे प्रसिद्ध आचार्य होते, आणि त्याचा शिष्यपरिवारहि तसाच मोठा दांडगा. ते सुप्रिय राजाचे पुरोहित. अतएव नित्य राजवाड्यांत जाऊन ते दैनिक पौरोहित्य करीत आणि राजाच्या शांति-अभिषेकासाठीं म्हणून एक शिष्य मागें ठेवून, पुनः घरीं परतत. याप्रमाणें दररोज एकेक शिष्य या कामासाठीं क्रमाक्रमानें तेथें मागें राहून राजास शांति अभिषेक करून मग आश्रमाकडे परत येई. असें होतां होतां एक दिवस ही पाळी याज्ञवल्क्यांवर आली. नियमाप्रमाणें गुरुजी वाड्यांतील नित्यकर्म आटपून, शांति-अभिषेकार्थ याज्ञवल्क्यास तेथें सोडून वहिवाटीप्रमाणें ते घराकडे परतले आणि याज्ञवल्क्य तेवढेच मागें राहिले.

हा सुप्रिय राजा म्हणजे अशीच एक विदुरी व्यक्ति होती. परमेश्वरानें सगळी अक्कल व सारासार विचार याजला काढून ठेवूनच, त्याची मूर्ति ओतली होती कीं काय न कळे! तेव्हां काय, आतां काय, राजे लोकांची गोष्ट म्हणजे केव्हांहि अशीच कांहीं चमत्कारिक असते. ते शाहणे तर शाहणे आणि वेडे तर वेडे! उदार तर उदार आणि लोभी तर लोभी! रंगेल तर रंगेल आणि साधे तर साधे! सुप्रिय राजा म्हणजे अशांतलाच एक होता. स्वारी ऐन तारुण्यांत असून मोठी रंगेल होती! सदान् कदा ललना-विलासांत अखंड रमलेली! रात्र नाहीं, दिवस नाहीं, सकाळ नाहीं, संध्याकाळ नाहीं, पाहावें तेव्हां एकच ध्यान आणि एकच नाद! वेश्येला जवळ घेऊन ' त्वमेव मम दैवतम् ' म्हणून मारवी तिच्या भजनीं लागलेली! ' कामातुराणां न भयं न लज्जा ' ही सुभाषोक्ति त्याच्या बाबतींत सार्थ व सत्य म्हणतां येईल.

याज्ञवल्क्यांनीं नियमाप्रमाणें होम करून शांतीचा जप करून राजाच्या अभिषेकार्थ जपतीर्थ तयार केलें आणि त्या दिव्य तीर्थानें त्यास अभिषेक करावा म्हणून त्याच्या मंदिरांत आले. पण तेथें काय? भलताच विलक्षण प्रकार. जन्मांत कधीं न पाहिलेला असा हिडिस प्रकार! वेश्येच्या एकांतांत स्वारी अगदीं रंगून गेली होती! याज्ञवल्क्य मंदिरांत येऊन उभे राहिले तरी दाद ना फिर्याद! वेश्येच्या नादांतच पूर्ण दंग! याज्ञवल्क्यांना पाहूनहि राजा शुद्धीवर आला नाहीं आणि शिष्टाचार पाळला नाहीं! त्यानें कपडे आवरले नाहींत कीं अत्यीनें उठून त्यांचा सत्कार केला नाहीं! इतकेंच नव्हे, तर त्या शांतोदकानें अभिषेक करून घ्यावयाचें सोडून देऊन, अंथरुणावर पडूनच निर्लज्जपणें त्यांस म्हणाला कीं, " हे द्विजोत्तमा, हल्लीं मी एकांतांत असून शयनारूढ झालों आहें. सबब तें तुझें शांतोदक तेथेंच कोठेंतरी एखाद्या खांबा-बिंबावर शिंपडून चालता हो, मला तुझा तो अभिषेक नको!"

केवढा अपमान! आणि कोण अप्रतिष्ठा! दिव्योदकानें अभिषेक करावयास आलेल्या ब्राह्मणोत्तमाचा असा धिक्कार! आणि तो एका हलकट स्त्रीच्या समोर!! वेदोनारायणाचा केवढा अपमान आणि पुण्यपुरुषाची केवढी अप्रतिष्ठा!!! याज्ञवल्क्य-मानी याज्ञवल्क्य-तो निर्लज्ज प्रकार पाहून मनांत संतप्त झाले. पण करतात काय? राजाशीं प्रसंग! मूर्ख असला तरी तो राजाच! पाजी असला तरी तो राजाच! उद्धट असला तरी तो राजाच! दुष्ट असला तरी तो राजाच! आणि भ्रष्ट असला तरी तो राजाच! कसाहि असला तरी राजा तो राजाच!! तेथें शहाणपणाचा उपयोग काय? शिष्टाचाराची प्रतिष्ठा काय? नीतीचें महत्त्व काय? शहाणपण, शिष्टाचार, धर्मनीति, लाजलज्जा सर्व कोळून पिणाऱ्या कामांध व मदांध राजे लोकांना कशाचें काय? महाराज म्हणजे महामूर्ख असा जो आज उपरोधिक अर्थ मानण्यांत येतो त्याला कारण लहरी राजे लोकांच्या या विचित्र लीलाच होत!

सुप्रियानें तसें सांगितल्याबरोबर याज्ञवल्क्यांनीं त्याच्याकडून तोंड फिरवून, तें शेजारच्या एका खांबाकडे केलें आणि त्याला उद्देशून महात्म्याचें ध्यान करून, 'फलिनी ये' हा मंत्र जपून तें शांतोदक त्या खांबावर शिंपडलें. अहाहा! केवढा चमत्कार म्हणतां! वाळलेला खांब, तासून रंधून साफ गुळगुळीत केलेला शुष्क खांब, पण त्या दिव्य जपोदकाचा स्वर्गीय स्पर्श होतांच

त्या शुष्क खांबालाच क्षणार्धात सुंदर पालवी फुटली ! आणि हा हा म्हणता तो 'फलपुष्पानीं सुशोभित झाला ! ! ('तत स पतितें तोयैं स्तंभ' पल्लवशोभित । तत्क्षणादेव सजज्ञे फलपुष्पैर्विराजित ॥ ' स्क ६-१२९-२१ ) केवढा पुण्यप्रभाव आणि केवढी अद्भुत गोष्ट ! मंत्रसामर्थ्ये चैतन्य स्फुरलें ! अमावास्येची पौर्णिमा झाली ! लोखडाचें सुवर्ण बनलें ! आणि शुष्क काष्ठाचा सुंदर वृक्ष सजला ! ! विसाव्या शतकातील वाचकांना, तुम्हास ही गोष्ट म्हणजे कशीशीच दिसेल, नाहीं ? पण ती अपूर्व नवलाई घडली हें मात्र खास ! आपल्यातील मंत्रसामर्थ्य नष्ट झालें म्हणून अशा गोष्टी आज काल्पनिक वाटतात, हें युक्तच आहे पण रानात वाढलेल्या रानवटालाहि राजधानींतील सुंदर राजवाडा म्हणजे असाच काल्पनिक वाटत असतो, नव्हे काय ?

राजानें हा अपूर्व प्रकार डोळ्यानीं पाहिला मात्र, तो आश्चर्यानें दिपूनच गेला क्षणमात्र तो दिङ्मूढ झाला अननुभूत प्रकार पाहून मनातून तो एक प्रकारें दचकल्यासारखा झाला आणि थोडासा वरमलाहि ! शेवटीं तो पलगावरून उठला आणि आवढ ताड करून व हात जोडून त्या महाभागाची त्यानें क्षमा मागितली !

" द्विजोत्तमा," तो हात जोडून म्हणाला, " क्षमा कर माझी चूक झाली मला क्षमा कर माझ्यावर पुन तो मंगलाभिषेक कर ! तो प्रभावी मंत्र पुन म्हण आणि माझें मस्तक तुझ्या दिव्य अभिषेकानें एकवार पुनीत होऊ दे ! "

सत्पुरुषाचें अंत करण त ! एकदा कठोर झालें म्हणजे मग वज्रालाहि दाद देत नाहीं ! याज्ञवल्क्याचें अंत करण आता वज्रापेक्षाहि कठोर झालें होतें ! ! राजाचा उद्धटपणा व उन्मत्तपणा पाहून ते मनात फारच संतापले होते ब्राह्मणाचा अपमान आणि वेदोनारायणाची थट्टा ! ती कोण सहन करील ? " नाहीं, राजा, नाहीं आता ती गोष्ट पुन्हा होणार नाहीं जें झालें तें होऊन गेलें आता त्याचें नांवहि काढू नकोस. कर माझा रस्ता मोकळा, हा पाहा मी निघालों येथून ! " असें म्हणून ते तेथून जाऊ लागले

राजा मध्ये होऊन, त्याची वाट अडवून पुन नम्रतेनें म्हणाला, " हे पुण्यपुरुषा, असा रागावू नकोस मला क्षमा कर ! आणि माझा अपराध पोटात घे ! वरीलप्रमाणें तो सुंदर अभिषेक कर ! हे दिव्य पुरुषा, रोज माझ्यावर अभिषेक होत होता पण असा दिव्य प्रकार

माझ्या पाहण्यात आला नाही. तू पुण्यपुरुष आहेस तेव्हा माझ्यावर तो दिव्य अभिषेक होऊ दे ! हे सत्पुरुषा, तुला सुंदर वस्त्रें देतों, मोठे अलंकार देतों, उत्तम घोडे देतों, नाना वाहनें देतो, गजांत लक्ष्मी देतों, फार काय सांगू, तू मागशील ते देतों, पण मला तुझ्या पवित्र हातचा तो पुण्याभिषेक एकवार घडू दे ! "

"नाही", याज्ञवल्क्य उत्तरले, "नाही, ती गोष्ट आता कदापि शक्य नाही तें सुंदर भाग्य तुझ्या नशिबात नाही ! राजमदात तू ब्राह्मणाला अवमानिलेस आणि वेदोनारायणाला धिक्कारिलेंस ! आता तुझी इच्छा सफल होण्याची आशा नाहीं राजा, तू म्हणशील तेव्हा असे सुंदर दिव्योन्मुक चमत्कार तयार होत नसतें त्याला अग्निनारायणाचा प्रसाद लागतो त्याशिवाय मंत्र स्फुरत नाहीं तू राजा झालास म्हणून काय झालें ? वेदोनारायणाला धिक्कारणारा तू पापीच ! चल, सोड माझी वाट, उशीर झाला मला इतक्यात गेलं पाहिजे " असें म्हणून राजाचा मुलाजा न ठेविता स्वारी धाडधाड् निघून चालती झाली ! राजा स्तब्ध होऊन जेथल्या तेथेंच हा प्रकार पाहत समाज पुतळ्या-प्रमाणें उभा राहिला !

याज्ञवल्क्य अजून विद्यार्थिदशेतच होते, तरी त्यांची सत्त्वनिष्ठा व स्वाभिमान केवढा जाज्वल्य होता हे यावरून चांगलें व्यक्त होत मुलाच पाय पाळण्यात दिसतात म्हणतात ते काहीं खोटें नाहीं सुप्रिय म्हणजे काही लहानसहान व्यक्ति नव्हती बोलूनचालून प्रत्यक्ष देशाचा अधिपति आणि तशात शाकल्याचा उदार आश्रयदाता ! पण हे सर्व या शिष्याला काय होय ? जेथें सत्त्वाला जपत झाली तेथ त्रैलोक्याचं साम्राज्य मिळालें म्हणून काय झालें ? सत्त्वधीर लोक आपल्या सत्त्वापासून चळलें असें कोठें आले आहे काय ? पाहा, राजानें परोपरीनें विनवणी केली, हात जोडले, क्षमा मागितली, नाना तऱ्हेचें बक्षीस लावलें आणि हरतऱ्हेनें त्याचें मन वळवून पाहिलें पण सत्त्वनिष्ठ व करारी याज्ञवल्क्य कशालाही वितळले नाहींत ते ते राजवाड्यातून एकदाचे बाहेर पडले ते सरळ आश्रमाकडे वळले

याज्ञवल्क्य निघून गेल्यावर तिसरे प्रहरीं राजा शाकल्यमुनींकडे आला आणि हात जोडून म्हणाला कीं, "गुरुजी, आज जो शिष्य पाठविला होता तोच पुन उद्यांकडे पाठवावा " शाकल्यांना त्या दिवशीं मंदिरात घडलेल्या

अद्भुत प्रकाराची कल्पना नव्हती म्हणून त्यानीं राजास सहज 'होय' असें म्हटलें आणि राजा सतुष्ट होऊन राजवाड्याकडे निघून गेला

राजा निघून गेल्यावर गुरुनी याज्ञवल्क्यास हाक मारून म्हणाले की "मुला, पुन तुला उदईक शानि अभिषेकार्थ राजवाड्यात गेलें पाहिजे खुद राजाच येथें येऊन पुन तुलाच पाठविण्यासाठीं आग्रहानें मागून गेला आहे मग?"

याज्ञवल्क्य नम्रतेन म्हणाले, ' नाह तात गमिष्यामि शाल्यर्थं तस्य मंदिरे। अवलेपेन युक्तस्य शुद्धत्रा विरहितस्य च ॥" (स्क ६ १२९-३२) "नाहीं, गुरुजी, मी जाणार नाहीं, स्पष्ट सागतों मी तेथें जाणार नाहीं क्षमा करा मला तेथ पाठवू नका तो मोठा द्वाड आहे! भ्रष्ट आहे! नष्ट आहे! तेथ मला पाठवू नका त्यानें माझा अपमान केला मी मतरलेलें तीर्थोदक त्याच्या मस्तकावर शिंपडावयास गेलो तर निर्लज्जपण त्यानें माझा धिःकार केला अशा उर्मटाच्या घरीं पुन मी पाऊलहि ठेवणार नाहीं! गुरुजी, माफ करा आणखी कोणास तरी धाडा " ह वाक्य ते इतक्या निर्धारानें बोलले कीं शाकल्य थडच झाले!

गुरुजीला आता मोठा पचाईत पडली राजाचा शब्द मोडवना आणि शिष्याला जा म्हणवेना मनुष्य एकदा अन्नाचा मिधा झाला म्हणजे त्याचा विवेकहि बोथट होतो म्हणतात ते काहीं खोट नाहीं शाकल्याना शिष्याच म्हणण पटलें होतें पण राजाचा मोह आवरत नव्हता सुप्रियाचा उद्धट स्वभाव ते ओळखून होते, पण त्याचा भोग आश्रय असल्यामुळे त्याला नाराज करण्याच धैर्य त्याना होईना पुन पुन ते याज्ञवल्क्याचीच समजूत घालण्याच्या भरीस पडत पण शिष्य म्हणजे काय, खुद्द मेरूचा अवतार! ते बोलतील त चन्द्रलेखच! प्रत्यक्ष ब्रह्मदेव आला तरी फिरावयाचे नाहीं! गुरुनीं त्रिवार केली, राजाच भय घातल आणि आपली पुण्याई खर्च केली, पण सगळ पालथ्या घागरीवर पाणी! "मी जाणार नाहीं" हा त्याचा एकच हट्ट शेवटीं तो त्यानीं सगीसहि केला, फार काय सागाव, गुरुचा रोष सहन केला, आश्रमाला रामरामहि ठोकला, पण त्या दुष्टाच्या घरीं पुन त्यानीं पाऊल म्हणून ठेविलें नाहीं! सत्याग्रह म्हणतात तो हा! (स्कद ६ १२९-१ ते ५०)

याज्ञवल्क्यांना ही जी अलौकिक मंत्रसिद्धि प्राप्त झाली होती, ती त्यांनीं उद्दालक आरुणींकडून प्राप्त करून घेतली होती. ही मंत्रविद्या त्यांना उद्दालकांकडून मिळाली होती, याबद्दल बृहदारण्यकांत उपसद मनाचें निरूपण करतांना उल्लेख आढळतो तो असाः—'तं हैतमुद्दालक आरुणिर्वाजसनेयाय याज्ञवल्क्यायान्तेवासिन उक्त्वोवाचापि य एनं शुष्के स्थाणौ निषिञ्चेज्जायेरञ्छाखाः प्ररोहेयुः पलाशानीति।' (बृ. अ. ६-३-७.) तो हा मंत्र उद्दालक आरुणि यांनीं आपला शिष्य जो वाजसनेय याज्ञवल्क्य यास सांगून म्हटलें कीं, "हा मंत्र शुष्क खांबावर शिंपडला तर त्या खांबाला फांद्या फुटून त्याला पालवीहि फुटेल" आणि याची प्रचीति सुप्रिय राजाच्या मंदिरांत आली असें वर आतांच सांगण्यांत आलें आहे.

## वैशंपायनांच्या आश्रमांत

आधींच हिरा आणि तशांत त्यावर पाणीदार पैलू पाडलेले, मग आतां काय विचारावयाचें? मग तो हिरा नव्हे, प्रत्यक्ष नक्षत्रच! आणि आमचे याज्ञवल्क्य झाले तरी काय? तेहि आतां सुंदर पैलू पाडलेलें एक दिव्य रत्नच! जात्याच मोठे हुषार आणि तशांत विद्येचें व तपाचें घर प्रखर पाणी चढलेलें मग त्या अपूर्व तेजाचें वर्णन काय करावें? असो. सुप्रिय राजाच्या वाड्यांत शाकल्यांचा व यांचा खटका उडाल्यावर ते तेथून बाहेर पडले आणि तत्कालीन योगशास्त्राचे प्रसिद्ध आचार्य जे हिरण्यनाभ त्यांच्याजवळ राहून योगविद्या साध्य करून घेतली. (वि. पु. ४-४-४७) येवढें झाल्यावर ते पुनः वैशंपायनांच्या आश्रमांत येऊन राहिले आणि यजुर्वेदाचा विशेष अभ्यास जोरानें चालू केला.

वैशंपायनांचा आश्रम म्हणजे त्या वेळीं वेदविद्येचें प्रत्यक्ष माहेरघर! यज्ञसंस्था तेव्हां पूर्ण भरभराटींत असल्यामुळें, लोकांत यजुर्वेदाचें महत्त्व व अध्वर्यूंची प्रतिष्ठा शिगराम पोंचलेली. वाचकांना त्यांची आज कल्पनाच करून घ्यावयाची म्हणजे आजकाल आमच्या राजकीय पुढाऱ्यांना जो मान व दर्जा आहे तो त्या वेळीं अध्वर्यु लोकांना होता. राजमंडळांत गुरु वैशंपायनांचा मान व दर्जा कमालीचा वाढलेला होता आणि अद्वितीय व अलौकिक अध्वर्यु

म्हणून जगभर त्याची नौबत झडू लागली होती अशा प्रलोभनीय पदावर आरूढ होऊन तसेच आपणहि चमकावें व मिरवावें अशी महत्त्वाकांक्षा आमच्या तरुण व विद्यानिधी याज्ञवल्क्याच्या सहिर्मी मनात मुळी धरून राहिली असली तर त्यात येवढें दूषणीय ते काय ?

याज्ञवल्क्य आता भर ज्वानीत होते त्याचे ब्रह्मचर्यतेज मोठें प्रखर व विद्यावैभव मोठ स्पृहणीय होत योगशास्त्रात त्याची गति अप्रतिहत असून मंत्रसिद्धि तर तशी कोणाजवळहि नव्हती त्याचें बुद्धिसामर्थ्य, ज्ञानलालसा, सूक्ष्म दृष्टि, ग्रहणशक्ति, कर्तव्यनिष्ठा व शास्त्रचिकित्सा इतकी प्रखर होती की, कोणत्याहि विषयांत प्रवेश केला तरी त्याला यश प्राप्ति सहज ठेविलेली वेदविद्या, योगशास्त्र व आत्मज्ञान यात त्याचा हात धरणारा त्या वेळीं त्या उभ्या आश्रमात कोणीहि नव्हता इतकेंच नव्हे तर काहीं काहीं प्रसंगीं त्यानीं त्या त्या विषयांत गुरूवरहि ताण करून जगास थक्क करून सोडलें आहे, याच विवेचन पुढें प्रसंगानुसार येईलच ह स्वभावान सरळ व आचरणानें अत्यंत शुद्ध असून मनान मोठे उदार होते तात्पर्य काय तर याज्ञवल्क्य त्या आश्रमात आता सर्व शिष्यगणात प्रमुख व श्रेष्ठ असे शिष्यनायक होऊन बसले होते

गुरु वैशंपायन म्हणजे काहीं अशी तशी व्यक्ति नव्हती महर्षि व्यासाचे पट्टशिष्य आणि सम्राट् जनमेजयाचे मुख्य पुरोहित यजुर्विद्यापीठाचे कुलगुरु व यज्ञसंस्थेचे आधारस्तंभ मग अशा श्रेष्ठ व्यक्तीची थोरवी व मही ती काय वर्णन करावी ? त्याचा आश्रम म्हणजे आता विद्यार्थ्यांनी भरून व खुलून गेला होता तशात आमचे याज्ञवल्क्य म्हणजे तेज पुंज नक्षत्रमालेंतील प्रत्यक्ष शुक्राची पवित्र चांदणीच ! केवढें तेज आणि केवढें वैभव ! आश्रमातील कोणीहि मनुष्य त्याच्याकडे पाहून विस्मयादरानें सहज नम्रच होऊन जाई. वैशंपायनहि त्याच्यावर अत्यंत लोभ व प्रेम करीत असत त्याची अगाध विद्वत्ता व अपूर्व ब्रह्मतेज पाहून कोणीहि त्याचें कौतुकच करी थोडक्यात म्हणजे याज्ञवल्क्याचा बोलबाला आता सर्वत्र शुक्लपक्षातील चंद्राप्रमाणे दिवसदिवस वाढीस लागला होता आणि ते जिकडेतिकडे प्रेमादराचा एकच विषय होऊन बसले होते

# धर्म म्हणतां कर्म !

पुढें कांहीं दिवसांनीं असा एक प्रसंग आला कीं, त्या वेळीं सर्व ऋषींनीं मिळून मेरुपर्वतावर एकत्र जमण्याचें ठरवून जो कोणी उक्त समयीं तेथें येण्यास चुकेल त्यास ब्रह्महत्येचें पातक लागेल असा निर्बंध करुन ठेविला ( वायु. ६१-१४). नियमाप्रमाणें पुढें सर्व ऋषी ठराविक वेळीं त्या ठिकाणीं जमा झाले, पण वैशंपायन मात्र तेथें संकेताप्रमाणें हजर राहूं शकले नाहींत. अतएव नियमाप्रमाणें वाचिक ब्रह्महत्या त्यांच्या पदरीं येउन पडली. पुढें कर्मधर्मसंयोगानें त्यांना बालहत्येचाहि दोष लागला. तो प्रसंग म्हणजे असा कीं ते एके दिवशीं पहाटेस उठून स्नान करण्याकरितां म्हणून नदीवर जावयास निघाले होते. पण या गडबडींत, घरांत एका कोपऱ्यांत त्यांच्या बहिणीचें एक मूल निजलें होतें, याच्या अंगावर चुकून त्यांचा पाय पडला आणि कर्मधर्मसंयोगानें तें मूल गतप्राण झालें. ( स्वस्रीयं बालकं सोऽथ पदा स्पृष्टमघातयत। विष्णुपु. ३-५-५) आधीं ब्रह्महत्या लागलीच होती आणि तशांत ही नवीन बालहत्या! या जोड महापातकांतून मुक्त होण्याकरितां म्हणून त्यांना प्रायश्चित्त घेणें भागच असल्यामुळे, त्यांनीं आपल्या शिष्यवृंदास बोलावून आपल्यासाठीं प्रायश्चित्त घेण्यास आज्ञापिलें. त्या शिष्यगणांत आमचे चरित्रनायक हेही होते हें निराळें सांगावयास नकोच.

वैदिक काळीं प्रायश्चित्त घेणें म्हणजे बाहेर तीर्थयात्रा करीत देशसंचार करणें असा अर्थ असून त्याप्रमाणें दोषक्षालनार्थ वैदिक लोक प्रायश्चित्त म्हणून तीर्थयात्रेस जात असत. परशुराम कार्तवीर्यास ठार केल्यावर तद्दोषनिवारणार्थ म्हणून तीर्थयात्रा करीत हिंडत होते. अर्जुन हा धर्म-द्रौपदी-एकांत पाहून लागलेल्या दोषाच्या परिमार्जनार्थ तीर्थयात्रेस निघाला होता ही गोष्ट 'रचतों कां तीर्थयात्रा ' या सुभद्रेच्या पदानें महाराष्ट्राला विदित आहेच. बलदेवानें अज्ञानानें रोमहर्षण सूतास ठार मारलें, *म्हणून तत्पापक्षालनार्थ तो तीर्थ-यात्रा करीत हिंडत होता.* एवंच सांगावयाचें. तात्पर्य काय तर कोणत्याहि अपराधाबद्दल प्रायश्चित्त घ्यावयाचें तर ते तीर्थयात्रा हिंडूनच घेत असत

याज्ञवल्क्य या वेळीं भर ज्वानींत असून मोठे सशक्त व आचारसंपन्न असे होते. ते बुद्धीनें तीक्ष्ण, मनानें उदार व स्वभावानें सरळ होते. विद्या व धाडस यांमध्यें त्यांचा हात धरणारा तेथें दुसरा कोणीहि नव्हता. त्यांचा उत्साह म्हणजे भारी दांडगा आणि कामाची हौस म्हणजे तरी किती! कसलेंहि काम येऊन पडो, पुढें होऊन ते अगावर घेऊन पार पाडून दाखविण्याची त्यांची हौस व धमक मोठी वाखाणण्यासारखी होती. मग या उमद्या स्वभावाला तुम्ही गुण म्हणा अगर आणखी कांहीं म्हणा. पण ते तसे होते हें मात्र खरें. याज्ञवल्क्य आपणास वैशंपायनाचे मोठे आवडते शिष्य समजत असत हें सांगण्याची तर आतां गरजच नाहीं.

गुरुजींचें वरील भाषण ऐकून या त्यांच्या आवडत्या शिष्यानें चटकन् पुढें होऊन त्यास सहज म्हटलें कीं 'भगवन् अहमेकः करिष्यामि' (वायु-पु.) "मीच एकटा तें तुमचें प्रायश्चित्त घेऊन सोडतों म्हणजे झालें. उगीच इतरांना तरी मुवडी दगदग हवी कशाला? ('तिष्ठंतु मुनयस्त्विमे।' वायु.) हे सगळे लोक राहोत. मी एकटाच सगळें तुमचें प्रायश्चित्त घेऊन मोकळा होतों म्हणजे भागलें, तेवढी धमक माझ्यांत आहे. करूं ना मी हें पण?" असें म्हणून आज्ञा मिळविण्यासाठीं ते त्यांच्याकडे उल्हसित नेत्रांनीं पाहत उभे राहिले.

हें भाषण अगदीं सरळच होतें. पण दुर्दैवानें गुरुजींस तसें वाटलें नाहीं त्याचा अर्थ त्यांनीं भलताच केला. इतर शिष्यांना तुच्छ मानून याज्ञवल्क्य आपली नसती प्रौढी मिरवीत आहे, असा त्यांनीं ग्रह करून घेतला! आणि यामुळें या शिष्याचा तो प्रकार त्यांना वाहीमा उद्दामपणाचा वाटला!! आणि या त्याच्या विपरीत समजुतीमुळें त्यांना तो कसासाच दिसला आणि म्हणून बिलकूल मानवला नाहीं. याज्ञवल्क्यांचें दुर्दैव आतां उभें राहिलें! इतर शिष्यांचा उपमर्द करणारें हें आत्मप्रौढीप्रचुर भाषण आहे असा त्याचा ग्रह होऊन पित्त एकदम भडकलें. मग काय? सगळाच अनर्थ! भिवया वर चढल्या, डोळे गरगर फिरूं लागले. क्रोधानें हृदयाकाश दाटून गेलें! आणि इतक्यांत एकदम वीज कडाडली! "अरे गर्विष्ठा याज्ञवल्क्या, केवढा रे तूं उन्मत्त झालास! तुझ्या विद्येची व तुझ्या सामर्थ्याची तुला फार घमेंड दिसते. अरे, ज्या विद्येनें तूं एवढा चढेल झालास आणि ब्राह्मणांवर तुझे

लागलास, टाक ती माझी विद्या मला परत! ( 'यत्त्वयाधीतं सर्वं प्रत्यर्पयस्व मे।' वायुपु. ) आणि जा कोठें तरी एकदांचा काळें करुन!! पुनः तुझें मला दर्शनहि नको!!!"

झालें, बिचाऱ्या याज्ञवल्क्यांवर हा जणुं विद्युत्पातच झाला! शिव शिव! फुललेल्या अंतःकरणावर धगधगीत अग्निवृष्टि झाली! तीक्ष्ण वाग्बाणानें निष्पाप काळजाचा ठाव घेतला! नाचत्या उत्साहावर निराशेचें विरजण पडलें! अमानुष शिक्षेचा अगदीं कडेलोट झाला! याज्ञवल्क्यांचा तो हास्य-मधुर चेहरा खरकन् उतरला! आणि तोंड गोरें मोरें झालें! केवढा अनर्थ, केवढी शिक्षा, केवढा अपमान! धर्म म्हणतां कर्म उभें राहिलें! दैव फिरलें आणि अमृताचें विष झालें!!

---

## समजुतीचा घोटाळा

गोष्ट साधीच. पण केवढा गहबज! आणि परिणाम तरी किती विचित्र! हर हर! वैशंपायनांनीं काय केलें हें! कौतुक करावयाचें तेथें सूड, बक्षिस द्यावयाचें तेथें दंड, धन्यता मानावयाची तेथें संताप, आशीर्वाद द्यावयाचा तेथें शाप! भयंकर शाप! आणि तो तरी कोणाला? तर गुरुसेवेंत तत्पर असणाऱ्या धर्मज्ञ व प्रभावी शिष्याला! ( शिष्यः परधर्मज्ञो गुरुवृत्तिपरः सदा। विष्णु. अं० ३–५–३ ) आपल्या सच्छील व प्रेमळ भाच्याला! खुद्द बहिणीच्या प्रतापी छाव्याला! अरेरे, केवढा अनर्थ! सोन्याची सर्वस्वी माती झाली! सूर्याला ग्रहण लागलें!! कल्पवृक्षावर कुऱ्हाड पडली!!! गुरुमाउलीच्या पवित्र मांदाला हें शोभलें तरी काय? थोरामोठ्यांची बुद्धि केव्हां केव्हां चळते म्हणतात ती अशी! वास्तविक एवढें संतापण्यासारखें, आकाशपाताळ एक करण्यासारखें, हातपाय आपटण्यासारखें, चाचकट्टो, त्यांत काय वरें होतें? याज्ञवल्क्यांचें तें भाषण सरळच होतें. सरळ व भक्तियुक्त अंतःकरणांतून तें सहज बाहेर पडलें होतें. 'भक्त्यैतत्ते'मयोदितम्' "गुरुजी, भक्तीमुळें मी तसं बोलून गेलों." असं त्यांनीं तेथल्या तेथेंच बोलूनहि दाखविलें, ( विष्णुपु. अं० ३–५–१० ). पण व्यर्थ! त्याचा असा विपरीत परिणाम होऊन एकदम भडका उडेल हें त्यांच्या स्वप्नींहि नव्हतें. कोणाला

टोचावे अगर दुखवावे असा त्याचा मुळींच उद्देश नव्हता. अथवा गुरूंनी त्याचा असा भलताच अर्थ करतील ही कल्पनाही त्यांना दिसली देखील नव्हती. फार तर पुढे होऊन कोणतीहि गोष्ट वडाडीनें करण्याची हौस मात्र त्याची मोठी दांडगी. इतकें करीत गेले पण त्याला हें बक्षिस काय? खरें म्हटलें तर इतरांना टाकून बोलून आपली नसती प्रौढी मिरवावी असा त्याचा मुळींच उद्देश नव्हता. महत्त्व त्येमुळें म्हणा अगर आपण एकटेंच ते प्रायश्चित्त केल्यास इतरांचा त्रास वाचेल या थोर बुद्धीनें म्हणा अथवा गुरुभक्ति उचंबळून आली म्हणून म्हणा, ते गुरुजींजवळ सहज तशा प्रकारे बोलून चुकले. या पलीकडे कांहीं नाहीं. पण गुरूंनीचा ग्रह झाला ता भलताच आणि क्रोधाच्या आवेशात ते बोलून चुकले तेंहि पण भलतेच!

६

# सूर्य अस्तगत झाला!

मग आता काय विचारावें? याज्ञवल्क्य जाले तरी एका परीने मानीच होते. सत्याचा अपलाप न्यायदयतेचा अपमान, आणि सहृदयतेचा खून! हें कोण सहन करील? याज्ञवल्क्यास तें मुळींच खपले नाहीं. आपला कसलाच अपराध नसता अथवा असला तरी सुताचें भूत करून फर्मावलेली शिक्षा मूळ अपराधाच्या मानानें अत्यंत कडक व पूर्ण अन्यायाची झाली असे समजून, आणि कसे झालें तरी गुरूची आज्ञा शिरसावंद्य मानणें हें शिष्याचें परम कर्तव्य आहे हें लक्षात घेऊन, त्यानीं आपले डोळे मिटले आणि आपले सव योगसामर्थ्य एकवटून गुरुकडून जेवढी म्हणून विद्या ग्रहण केली होती, तेवढी सर्व अक्षरन् अक्षर भडाभड बाहेर ओकून टाकिली! आणि धडाधड पाय आपटीत ते तेथून हा हा म्हणता वाऱ्याप्रमाणें निघून गेले! (विष्णुपु ३-५-११) आश्रमावर स्मशान छाया पसरली!! सूर्याचा अस्त झाला!!

हा सर्व प्रकार पाहून तेथील सगळे लोक आश्चर्यानें थक्क झाले. शरिरातून प्राण जसा निघून जावा अथवा राजवाड्यातून राज्यलक्ष्मीनें जसा पाय काढावा त्याप्रमाणें आमचे चरित्रनायक त्या पुण्य आश्रमातून विजेप्रमाणे अदृश्य झाले! आणि वैशंपायन झाले तरी काय, रागाच्या भरात, त्रिकाराच्या

आवेशांत कांहीतरी बोलून गेले, इतकेंच. त्याचा असा विलक्षण व विपरीत परिणाम होईल हें त्यांच्यासुद्धां स्वप्नांत नव्हतें. पण आतां करतात काय ? झाली ती गोष्ट होऊन चुकली. याज्ञवल्क्य तेथून गेले ते गेलेच !

ती ओकून बाहेर टाकलेली विद्या मलिन झाल्यामुळें काळी पडली होती. गुरुजींनीं लागलीच तेथें जमलेल्या शिष्यांना चटकन् ती ग्रहण करण्यास सांगि-तल्यावरून त्यांपैकीं तित्तिरि स्वरूपाच्या शिष्यांनीं ती वमन केलेली विद्या पटापट गिळून टाकिली. ही भाषा आजच्या दृष्टीनें जरा चमत्कारिक असली तरी त्याचा घ्यावयाचा मथितार्थ इतकाच कीं याज्ञवल्क्यांनीं तो वेद एकवार तेथें टाकून दिल्यावर पुनः त्याचें नांव म्हणून घेतलें नाहीं ! बुद्धिमालिन्या-मुळें ती विद्या काळी झाली होती म्हणून तिला पुढें ' कृष्णयजुः ' अशी संज्ञा प्राप्त झाली व ती स्वीकारणाऱ्या शिष्यांना तैत्तिरीय हें नांव प्राप्त झालें. पुढें वैशंपायनांकरितां जे शिष्य प्रायश्चित्त घेण्यास तीर्थयात्रेस निघाले त्यांस चरकाध्वर्यु हें नांव प्राप्त झालें. म्हणून वैशंपायनांच्या शिष्यवर्गांत ' तैत्तिरीय ' व ' चरक ' असे दोन भेद झाले आहेत. ( विष्णुपु. अं० ३, अं० ५, १२-१३ )

---

# खग्रास ग्रहण

याप्रमाणें गुरूंची विद्या गुरूंना अर्पण करून याज्ञवल्क्य तेथून निघून गेले. पण आतां ते निर्विद्य झाल्यामुळें निस्तेज पडले होते ! त्यांच्या उच्च भावनांची राखरांगोळी झाली होती ! कोमल हृदयाच्या चिंधड्या चिंधड्या उडाल्या असून सर्व जीविताचा खेळखंडोबा झाला होता ! घरीं बसून चैन पडेना. बाहेर जाऊन तोंड दाखवितां येईना. मारखी कुचंबणा होऊन राहिली. त्यांच्या दुःखाला व मनस्तापाला आतां सीमा राहिली नाहीं. पंख तोडलेला पक्षी जसा जागच्या जागीं उगीच तडफडत बसतो, मातृहीन झालेलें बालक जसें मनांतल्या मनांत झुरत जातें, तशीच दैन्यावस्था या आश्रया चरित्र-नायकाची झाली असल्यास नवल तें काय ? त्यांच्या सर्व आशा, आकांक्षा,

भावना पार होरपळून जाऊन, भविष्यकाळ निराशेच्या अंधकारात गडप झाला होता

साहजिकच आहे की प्रकाश सोडून गेल्यावर मग सूर्याला जगण्यात तरी काय अर्थ आहे ? अशा निर्विद्य स्थितीत राहून कुम्भाजराप्रमाणे नीरस आयुष्य कंठणे हे अर्थातच त्याच्या जिवावर आले पण करतात काय ?

जावे कोठे आणि करावे काय याचा आता त्याना सारखा हृद्रोग लागून राहिला ती यजुर्विद्या, ती कामधेनु आता पुन कधीं तरी दृष्टीस पडेल काय? रात्रंदिवस हीच विवंचना कोण गुरु आता आपणास फिरून भेटेल ही एकच विवंचना, एकच ध्यास ! अध्वर्यु म्हणवून घेण्याची त्याची केवढी होस ! पण ती आशा आता राहिली हाती काय ? भविष्यकाळ आता त्याच्या डोळ्यापुढून जवळजवळ पुसल्यासारखाच झाला होता अरेरे ! बिचारे याज्ञवल्क्य, आता ते कोणीकडच्या कोणीकडेच जाऊन पडले होते ! !

मात्र एवढा त्यांनी निर्धार केला होता तो हा कीं आता पुन गुरु करावयाचा तो सहसा मानवी म्हणून करावयाचा नाहीं एक वेळ निर्विद्य राहिलेलें पुरवले पण चचल मानवी गुरु नको ! न जाणो, मानवी गुरु केला, विद्या सगळी संपादन केली आणि गुरुपणाचा हक्क गाजवून पुन त्याने वैशंपायनाप्रमाणेंच केले तर ! पुन हीच रड होणार ना ? दान परत घेऊ नये हे शास्त्र खरे, पण वैशंपायनानीं ते पाळलें काय ? विकाराच्या वावटळींत सापडलेली मानवी बुद्धि—ती कितीहि सुसस्कृत व विचारवत असो—केव्हां कशी चळेल आणि कशी झुकांडी मारील याचा काहींच नेम नसल्यामुळे त्याचा आता चचल मानवी गुरूवरील विश्वास अजिबात उडाला होता 'सत्य देवा अनृत मनुष्या ' असे जे त्याच्या तोंडून पुढ शतपथात उद्गार निघाले आहेत, त्याच्या बुडाशीं हा मानवी चचलपणाच असावा अशी आमची समजूत आहे असो

याज्ञवल्क्य आता मोठ्या सकटांत पडले. गावात राहून लोकाना तोंड दाखविण्यापेक्षा पटकन् मरण आले तर फार बरें असे त्याच्या मनात आता राहून राहून विचार उसळू लागले रात्रंदिवस चैन ना ओप ते सारखे तळमळू लागले काहीं सुचेना, कीं धड समजेना ! वेड्याप्रमाणे त्याची अवस्था झाली मूल हरवलेले पाहून मातेचे अंत करण जसे रात्रंदिवस हुरहुरत असते,

हातांतील पैसा गेला म्हणजे कवडीचुंबक जसा चरफडत असतो, प्रेमळ पतीच्या दुःसह वियोगानें पतिव्रता जशी झुरणीस लागते, तद्वत् हें यजुर्विद्याधन हरवून गेल्यामुळें आणि चारचौघांत अप्रतिष्ठा पावल्यामुळें याज्ञवल्क्यांची अवस्था झाली होती!

---

## आशेचा किरण

पण सुदैवानें ही स्थिति फार दिवस टिकली नाहीं. कांहीं झालें तरी सिंह तो सिंहच! मरणास टेकला तरी तो गवत खाईल, असें थोडेंच झालें आहे? आमचे याज्ञवल्क्य म्हणजे प्रतिसिंहच! जात्याच ते मोठे हुषार आणि मोठे धैर्यशाली! हा निराशेचा कुरवा त्यांनीं पुढें लवकरच झुगारून दिला आणि घरादाराला रामराम ठोकून तपश्चर्येसाठीं अरण्याची वाट धरली. पूर्वीप्रमाणें सुविद्य व सुबुद्ध झाल्याशिवाय आणि वैशंपायनांच्या यजुर्वेदाला सवता सुभा निर्माण केल्याशिवाय आतां पुनः गुरुजींचें तोंड म्हणून पाहावयाचें नाहीं असा निश्चय—नव्हे प्रतिज्ञा—करूनच त्यांनीं आतां घरांतून बाहेर पाय काढला होता.

नवीन वेद मिळवूं तरच घराचें नांव घेऊं असा मनाचा निर्धार करून ते बाहेर पडले आणि तडक अरण्यांत येऊन दाखल झाले. पण पुनः त्यांना हा प्रश्न येऊन पडला कीं, कोणाला शरण जावें आणि कोणाची उपासना करावी? असा कोण देव आहे कीं जो आपले मनोरथ खात्रीनें पुरवील? या विचारांत पडून पुनः ते हतबुद्ध झाल्यासारखे झाले. त्यांची मति कुंठित झाली. मन भ्रमाच्छादित झालें आणि जिकडे तिकडे उदासीनतेचा दाट अंधःकार पसरला! मनुष्य एकदां घाबरलें, भांबावलें, संशयग्रस्त झालें म्हणजे त्याची असी दीनवाणी स्थिति व्हावयाचीच! आणि अशा किंकर्तव्यमूढ स्थितींतच ते वेड्याप्रमाणें कांहीं वेळ सुन्न होऊन उभे राहिले. क्षणभर ते देहभानच विसरले होते असेंच को म्हणाना.

*अशा विमूढ स्थितींत इकडे तिकडे, खालींवर पाहत असतां त्यांच्या सुदै-*वानें वर नभोमंडलांत अद्वितीय तेजानें आणि अगाध ज्ञानवैभवानें झळकत असलेले भगवान् श्रीसूर्यनारायण सहज त्यांच्या दृष्टीस पडले! अहाहा!

मग काय विचारतां? जिकडे तिकडे आनंदच आनंद! एकच आनंद! परमानंद!! चुकलेल्या पाडसाला धेनूचें दर्शन झालें! मृत्यूच्या द्वारांत कण्हणाऱ्या रोग्याला संजीवनी लाभली! तहानेनें तळमळणाऱ्या चातकावर मधुर अमृतवृष्टि झाली! निर्धनाला कामधेनु भेटली! याज्ञवल्क्यांचें पारणें फिटलें आणि त्यांचा आत्मा धन्य झाला!!

---

## तपश्चर्या

भगवान् श्रीसूर्यनारायण म्हणजे इहलोकींचें प्रत्यक्ष दैवत! इंद्र, रुद्र, वरुण, विष्णु हे सगळे देव खरे, पण ते कोणाला इंद्रियप्रत्यक्ष नाहीत या भूमंडळावर या सूर्यनारायणाचे जसे अनंत व अगाध उपकार आहेत, तसे इतरांचे दिसून येत नाहींत. पाहा, या विश्वकोशाला जी उष्णता व चैतन्य लाभलें आहे ते या सूर्यदेवाची प्रत्यक्ष कृपा म्हणूनच नव्हे काय? सूर्यनारायण आहे म्हणून आज जगाचे हे सगळे व्यवहार सुरळीत व सुसूत्र चालले आहेत. ही प्राणिसृष्टि हसत व डुलत आहे. उद्या तो नाहींसा होऊं द्या, म्हणजे चोवीस तासांतच ही सुंदर पृथ्वी गार गारठून जाऊन, अखिल जीवसृष्टि जेथल्या तेथेंच कुडकुडून आखडून जाईल! नांवाला म्हणून एकहि प्राणी जिवंत असा सापडावयाचा नाही! तुम्ही आम्ही हिंदु तर राहोच पण आज जगांतील अस्सल नास्तिकांतील नास्तिक म्हणून मिरविणाऱ्या हेक्सलसारख्या पाश्चात्य शास्त्रज्ञाला देखील आधिभौतिक दृष्टीनेंच कां होईना या अखिलकोटिब्रह्मांडनायकाचें देवत्व मान्य करणें अखेर भाग पडलें आहे! सूर्यदेवाचें हे अमोघ वैभव पाहूनच आमच्या सुज्ञ व भाविक ऋषींनीं त्याला 'त्वमेव प्रत्यक्षं विष्णुरसि।' 'त्वमेव प्रत्यक्ष ब्रह्मासि।' 'त्वमेव' प्रत्यक्षं रुद्रोऽसि।' अशा अर्थपूर्ण सुंदर स्तोत्रांनी भक्तिपूर्वक आळविलें आहे. तें अक्षरशः सत्य व शास्त्रतः शुद्ध नाहीं असें कोण म्हणेल?

भगवान् सूर्यनारायणाचें दर्शन होताच याज्ञवल्क्य हर्षरोमांचित झाले. त्याचा आनंदसागर उचंबळून आला, आशेला पालवी फुटली, शरिरांत नवचैतन्य स्फुरूं लागलें! देवांस त्यांनीं साष्टांग नमस्कार घातला आणि हात जोडून त्यांकडे पारात करुणा भाकिली कीं, "हे भगवन् श्रीसूर्यनारायणा!

देवा ! तुला नमस्कार असो ! दीनोद्धारा ! मज दीनावर–तुझ्या घर–दया कर ! हे ज्ञानमूर्ते ! हे सद्गुरो ! मी तुला अनन्यभावें शरण तें आहें ! मला अपूर्व असें ज्ञानतेज दे ! हा दीन शिष्य–तुझा नम्र भक्त–जवळ विद्याधनाची प्रार्थना करीत आहे, तर हे करुणानिधे ! ' यजुषि-ने मे देहि यानि संति न मे गुरौ '–माझ्या गुरुजवळ नाहीं असा यजुर्वेद गा दे ! देवा ! तूंच एक शरणागत वत्सल आहेस ! तुझ्याशिवाय मला तो दुसरा आश्रय नाहीं ! हे ब्रह्मांडनायका ! काय तुझा महिमा ! केवढा रा थोरपणा ! आणि कोण तुझी भक्तवत्सलता ! देवा ! तूंच आतां माझा क ! तूंच माझा पिता ! तूंच माझी माता ! माझी माता, पिता, गुरु, र्वा सर्व कांहीं तूंच ! तुला नमस्कार असो ! हे शरणागतवत्सला ! मला दुसंत घे आणि माझा उद्धार कर !'' अशी प्रार्थना करून त्यांनीं सूर्यनारा-णास साष्टांग नमस्कार घातला आणि त्या देवश्रेष्ठाला गुरुस्थानीं घेऊन ाची तपश्चर्या चालविली.

सूर्यदेव म्हणजे प्रत्यक्ष ज्ञानदेव. सर्व ज्ञानाचा सांठा त्याच्या जवळ असून, त्याला तो ज्ञानधन देतो अशी वैदिक ऋषींची ठाम समजूत आणि म्हणून ा नेहमीं त्याच्याजवळ ज्ञानभिक्षा मागत असलेले दिसून येतात. आपणांस ज्ञान देण्याविषयीं विश्वामित्रानें सूर्यदेवाची मोठ्या कळकळीनें प्रार्थना केली आहे. आणि ज्या मंत्रानें ती केली तो आज गायत्री मंत्र म्हणून प्रसिद्ध आहे. त्या मंत्रानेंच आम्ही सर्व वैदिक लोक आज देखील सूर्यनारायणाची ज्ञान-प्राप्त्यर्थ नित्य प्रार्थना करीत असतों. सर्व प्राणिमात्रांना प्रेरणा करणारा म्हणून सूर्याला सविता हें नांव प्राप्त झालें आहे. प्रेरणा या शब्दांत ' गति ' हा अर्थ गर्भित असून ' सर्वे गत्यर्था ज्ञानार्थाः ' या न्यायानें गतिवाचक शब्द हे ज्ञानाचे अर्थबोधक आहेत असें समजण्यांत येतें. अतएव सूर्यदेवता ही वैदिकांची ज्ञानदेवता आहे असें गायत्री मंत्रावरून स्पष्ट अनुमान करतां येण्यासारखें आहे. याज्ञवल्क्यांची देखील हीच भावना होती; आणि म्हणून त्यांनीं त्यांची उपासना चालविली आणि त्यांच्या जवळ ज्ञानभिक्षा मागितली.

वैदिक लोकांची तपश्चर्येवर मोठी विलक्षण श्रद्धा असलेली दिसून येते. आज श्रद्धेचें युग नसल्यामुळें लोक तिकडे उदासीन आहेत ही गोष्ट वेगळी,

पण पूर्वीच्या काळीं ज्ञानी लोक देखील मोठे श्रद्धावान् होते. छे, पण याच्या उलट म्हणजे ते श्रद्धावान् होते म्हणून ज्ञानी झाले ! त्या वेळीं कांहीं अडलें नाडलें कीं बसलेच मांडी घालून तपश्चर्येला ! आपले मनोरथ करून घ्यावयाचे तर निघालेच तडक अरण्यांत आणि बसलेच आसन घालून मग तेथें तहान नाहीं–भूक नाहीं, ऊन नाहीं–वारा नाहीं, थंडी नाहीं नाहीं, रात्र नाहीं कीं दिवस नाहीं ! एकच ध्यान आणि एकच व्रत ! खरें पाहूं जातां तसें तपश्चर्येशिवाय काय आहे ? खुद्द देवांनीं देखील इष्ट साध्य साधण्यास तपश्चर्या केलीच कीं नाहीं ? तपश्चर्या करूनच प्रजापतीनें ही सृष्टि निर्माण केली, तपश्चर्या करूनच देवांनीं स्वर्ग मिळविला तपश्चर्या करूनच विश्वामित्र ब्रह्मर्षि झाले ! आणि ही तपश्चर्या करून कोण काय झाले नाहींत ? ' श्रमेण ह वै तद्देवा जयन्ति यदेषां जय्यमास ' (श. प.) ' श्रम करूनच देवांनीं आपणांस काय मिळवावयाचें तें मिळवून घेतलें आहे '–असें याज्ञवल्क्यांनीं आपल्या अनुभवाच्या जोरावर पुढें शतपथांत चकचकीत म्हणून हाणविलें आहे. त्यांतील मर्म झालें तरी हेंच आहे. तपश्चर्या म्हणजे वैदिकांची कामधेनु ! प्रत्यक्ष इहलोकींचा कल्पवृक्ष !

—

## ग्रहण सुटलें !

याज्ञवल्क्य आतां सूर्यनारायणाचे कट्टे उपासक बनले. अहर्निश ते त्याच्या अनुष्ठानांत निमग्न असत. याप्रमाणें कांहीं काळ लोटल्यावर त्यांची ती दीर्घ तपश्चर्या व अनन्य भक्ति पाहून देवांनाही शेवटीं त्यांची दया आली आणि त्यांची कडकडीत निष्ठा व निर्मळ वृत्ति पाहून ते परम आनंदित झाले. ते पवित्र गंगेच्या निर्मळ उदकाप्रमाणें केवळ निर्दोषी असून कृपाकटाक्षास सर्वस्वी पात्र आहेत असा विचार करून भगवंतांनीं वाजीचें म्हणजे घोड्याचें सुंदर रूप धारण करून त्यांजवर अनुग्रह केला ! आणि भक्ताच्या इच्छेप्रमाणें पूर्वी कोणाजवळही नव्हता असा नवीन व प्रभावी यजुर्वेद त्यांस पढविला. (वायुपु. ६१, २१–२२) हा वेद साक्षात् देवाधिदेव सूर्यनारायणाकडून प्राप्त झाला असल्यामुळें व तो मानव बुद्धीनें दूषित झाला नसल्यामुळें शुद्ध-

रूप होता आणि म्हणूनच त्याला पुढें शुक्ल (म्हणजे शुद्ध) यजुर्वेद असें नांव लें. त्याचप्रमाणें त्यांनीं सरस्वतीदेवीचीही उपासना करून तिची पूर्ण कृपा मंगल प्रसाद प्राप्त करून घेतला आणि सर्व विद्येंत ते अत्यंत तरबेज झाले. शा. प. अ. ३२३, १३-१४) ते तिम्हांच काय पण आजपर्यंत मानव तींत कोणीही झाले नाहींत असे एकमेवाद्वितीय श्रेष्ठ तत्ववेत्ते होऊन, पल्या अपूर्व व अपरिमित ज्ञानतेजानें आजमितीसही सर्व जगाचे जगद्गुरु ऊन राहिले आहेत असें म्हटल्यास अतिशयोक्ति होईल असें आम्हांस कींच वाटत नाहीं.

## सव्रता सुभा

आपल्या तपःसामर्थ्यानें सर्व विद्या यथाविधि प्राप्त करून घेतल्यावर ज्ञवल्क्य पुनः सूर्यदेवाप्रमाणें ज्ञानतेजानें झळकूं लागले! ते कृतविद्य व मेंप्रज्ञ होऊन अरण्यवासाला रजा देऊन घराकडे परत फिरले. त्यांची प्रतिज्ञा त्य ठरली! तोंडाला लागलेला अविद्येचा काळा डाग पुसला जाऊन त्याला द्य उजळा मिळाला! डोळ्यांत नवीन पाणी चमकूं लागलें! आणि शरी- त सर्वत्र नवचैतन्याचा संचार झाला! घरीं आल्याबरोबर कोणाचीहि भीड- वेत न ठेवितां त्यांनीं आपली नवीन व स्वतंत्र शाखा स्थापन करून नवीन ष्यमंडळी तयार केली. या सर्व शिष्यांना आपण नवीन शिकलेल्या वेदाचें हणजे शुक्ल यजुर्वेदाचें अध्ययन देऊन यज्ञकृत्यांत त्यांना अत्यंत निष्णात लें, "आपणांस कोणीं नांव ठेवूं नये व शुक्ल यजुर्वेदाविषयीं शंकाहि घेऊं नये हणून ही नवीन व शुद्ध यजुर्वेद विद्या प्रत्यक्ष सूर्यदेवाकडून प्राप्त करून ऊन ती मी जगास जाहीर करीत आहें."—'आदित्यनीमानि शुद्धानि जूंषि वाजसनेयेन याज्ञवल्क्येनाख्यायन्ते' — असा जिकडे तिकडे डांगोरा टविला आणि नवीन कार्यास जोरानें चालना दिली. (बृ. अ. ८. ५. ३)

याज्ञवल्क्यांचें तें तेज, ती धडाडी, तो उत्साह पाहून, साखरेवर जशा ाशा जमतात तद्वत् त्यांच्या सभोंवतीं उत्तमोत्तम शिष्यांचा जमाव झाला. देवसेंदिवस त्यांच्या छायाखालीं चांगली चांगली मंडळी येऊन जमूं लागली.

या शिष्यवृंदात मध्यंदिन, कण्व, जाबाल, बौधेय, वत्स, पराशर असे अनेक विद्वत्रत्ने चमकत होतीं शुक्ल यजुर्वेदाचे सुंदर रोपटें जमिनींत मूळ धरून हळुहळू विस्तार पावू लागलें आणि जनताहि जिकडे मोठ्या कौतुकानें व महानुभूतीनें पाहू लागली पुढें त्या रोपट्याचा सुंदर वृक्ष होऊन, त्याला पधरा शाखा फुटल्या आणि शुक्लयजुर्वेदाचा कल्पवृक्ष भरतभूमींत चांगला फोफावून बसला! (भागवत, स्क १२, अ ६)

वरील शिष्यगणापैकीं मध्यंदिन महर्षीनीं शुक्लयजुर्वेद पठण करण्याची जी प्रथा घालून दिली त्याप्रमाणें जे लोक परंपरेनें या यजुर्वेदाचें अध्ययन करू लागले त्याना 'शुक्लयजुर्वेदीय माध्यंदिन वाजसनेय' असें म्हणण्याचा परिपाठ पडला शुक्लयजुर्वेदाच्या एकंदर पधरा शाखा वाढून जवळजवळ तितके निरनिराळे पाठभेद झाले आहेत कण्व महर्षीनीं जो पाठ घालून दिला त्याप्रमाणें पठण करणारे ते काण्व झाले तसेच प्रत्येक शाखेचेहि आहे असो

## शुक्ल यजुर्वेदाची रूपरेखा

या शुक्लयजुर्वेदाचे एकंदर चाळीस अध्याय असून त्यात तीनशें तीन अनुवाक् व एकोणीसशं पचाहत्तर मंत्र आहेत पहिल्या दोन अध्यायात दर्शपौर्णिमासेष्टि मंत्र असून, दुसऱ्या अध्यायाच्या शेवटीं पिंडपितृयज्ञ सांगितला आहे तिसऱ्यात अग्निकर्म, अग्निप्रतिष्ठा, अग्निहोत्र व चातुर्मास्य एतद्विषयक मंत्र दिले आहेत ४ ते ८ अध्याय सोमयज्ञपर म्हणजे अग्निष्टोमसबंधक आहेत नऊ व दहा हे अध्याय वाजपेय व राजसूय यज्ञविषयक असून अकरा ते अठरा अध्यायांपर्यंत चयनकर्म सांगितलें आहे यातच म्हणजे सोळाव्या अध्यायात प्रसिद्ध रुद्र मंत्र असून अठराव्यात वसोर्धारा मंत्र दिले आहेत एकोणीसपासून एकविसाव्या अध्यायापर्यंत सौत्रामणि यागाचे मंत्र असून पुढे पचवीस अध्यायापर्यंत अश्वमेधयज्ञ सांगितला आहे हा व राजसूय यज्ञ फक्त क्षत्रियानींच करावयाचे असून पैकीं पहिला म्हणजे अश्वमेध हा सर्व यज्ञात प्रमुख आहे हा यज्ञ राजा जेव्हा पृथ्वीपति होईल, अगर महत्त्वाकांक्षा अगर लोकविजयी असेल तेव्हा करावयाचा असतो येथें याज्ञिक भाग सपून

पुढें सव्विसाव्या अध्यायापासून पसतिसाव्या अध्यायापर्यंत खिलसंज्ञ मंत्र आहेत. पैकीं सत्ताविसाव्यांत पंचचितिक मंत्र, अठ्ठाविसाव्यांत सौत्रामणि-विषयक कांहीं मंत्र, एकोणतिसाव्यांत अश्वमेधांतर्गत अवशिष्ट मंत्र, तिसाव्यांत पुरुषमेध मंत्र, एकतिसाव्यांत प्रसिद्ध पुरुषसूक्त, बत्तिसाव्यांत सर्वमेधमंत्र, तेहतिसाव्यांत पुरोरुङ् मंत्र, चौतिसाव्यांत प्रसिद्ध शिवसंकल्पोपनिषद् व इतर मंत्र, पसतिसाव्यांत पितृमेध म्हणजे मृतोत्तर क्रियामंत्र आहेत. पुढें छत्तिसाव्यांत शांतिपाठ, सदतीस व अडतिसाव्यांत महावीर मंत्र, एकोणचाळिसाव्यांत प्रवर्ग्य आणि चाळिसाव्या म्हणजे शेवटच्या अध्यायांत प्रसिद्ध ईशावास्योपनिषद् सांगितलें आहे. अशी ही संक्षेपतः या शुक्लयजुर्वेदाची मांडणी आहे ( यजुःसंहिता ).

यज्ञसंस्था सांप्रत नामशेष झाली असली तरी तींतील अनेक मंत्रांचा हल्ली सुद्धां नित्यनैमित्तिक कर्मांत व संस्कारकृत्यांत पदोपदीं उपयोग केला जातो. या 'यजुर्मणिमाले'स अशा मंत्रांपैकींच महत्त्वाचे, नित्य उपयोगी, ज्ञानपर व तेजस्वी असे मंत्र निवडून त्यांची ही माला गुंफिली आहे व ते मंत्र सांप्रत कोणत्या प्रसंगीं व कोठें उपयोगिले जातात यासंबंधीं वाचकांस माहिती व्हावी एतदर्थ अनुक्रमणिकेंतच मंत्रविनियोगसूचीहि दिली आहे, तिचा वाचकांस होईल अशी आशा दर्शवून पुढें सुरू करतों.

---

# गृहस्थाश्रमाचा स्वर्ग

याज्ञवल्क्य तपश्चर्या करून, सूर्यदेवाला प्रसन्न करून घेऊन, नवीन वेद मिळविल्यावर, परत घरीं येऊन, ब्रह्मचर्याश्रमाचा समारोप करून गृहस्थाश्रमी झाले होते. त्यांची सुशील पत्नी कात्यायनी म्हणजे खरोखर एक गृहदेवताच म्हटली तरी चालेल. ती सुंदरतर होतीच, पण तिच्या मधुर सौंदर्यांत आणखी भर म्हणूनच कीं काय ती अत्यंत सुशील व सद्गुणी होती. ती स्वभावानें फार प्रेमळ आणि मनाची मोठी कोमल असे. पतीला तर ती देवाप्रमाणें मानीत असे. याज्ञवल्क्य तिच्या सहवासांत मोठे सुखी व आनंदी दिसत होते. त्या तरुण, सुंदर व प्रेमळ जोडप्याचा आनंद व उल्हास काय

जनक मोठ्या काळजींत पडले वैशंपायनही हतबुद्ध झाल्यासारखे दिसत होते पर्जितीची वेळ येऊन ठेपली ! आता पुढें कसे करावें हे कोणास समजेना! वेळ मोठी आणिबाणीची आली !

याप्रमाणे सर्व चिंताग्रस्त असता कर्मधर्मसंयोगानें जनकाची दृष्टि अकस्मात् याज्ञवल्क्यावर पडली वैशंपायनासही आता त्याची आठवण झाली याज्ञवल्क्याचे कौशल्य, ज्ञान व सामर्थ्य यांची त्यास पूर्ण जाणीव होती तडक ते त्याच्याकडे निघाले जनकहि मागोमाग आले व तेथें आल्यावर दोघांनी मिळून यज्ञ साफल्य करण्याबद्दल त्याची विनवणी केली राजे हात जोडून उभे राहिले आणि गुरु वैशंपायन गयावया करून त्याजकडे पाहू लागले याज्ञवल्क्यास गुरूची ही दैन्यावस्था पाहून दया आली मागचे सर्व विसरून ते चरकन् तेथून उठले आणि आपल्या शुक्लयजुर्वेदातील पद्धतीप्रमाणें प्रायश्चित्तविधि यथाशास्त्र करून दाखविला मोठा चमत्कार झाला ! हा विधि उरकल्याबरोबर तो यज्ञ सफल झाला ! जनक आनंदित झाले ! प्रेक्षकात एकच जयजयकार उसळला ! जनकानीं या प्रसंगी ऋत्विजास चांगली दक्षिणा दिली ( शा प अ ३१३–१८ )

---

## मामा-भाच्यांचें भांडण

जनकानीं दक्षिणा दिली हें खरें, पण तिच्याबद्दल आता मामा भाच्यात वाद उत्पन्न झाला वैशंपायन याज्ञवल्क्यास अजीबात वगळू पाहत होते याज्ञवल्क्य आपणास त्यापैकीं काहीं तरी हिस्सा मिळाला पाहिजे असे आग्रहीत होते. अध्वर्यूला जी दक्षिणा मिळावयाची तिच्यावर आपण अध्वर्यूचे काम केल्यामुळें, आपलाच पूर्ण अधिकार आहे असा वैशंपायनाचा आग्रह यज्ञ सफल झाला तो अध्वर्यूच्या कर्तबगारीनें नसून आपल्या कौशल्यामुळें झाला, सबब आपणही त्यात वाटेकरी आहों असें याज्ञवल्क्याचे म्हणणें जनक तेथें उभे होते, पण करतात काय ? त्याना काहींच करता येईना कीं बोलतां येईना प्रकरण मोठें हातघाईवर आलें आता हें मिटवावयाचें कसें व कोणीं ?

वैशंपायन म्हणजे काहीं कमी व्यक्ति नव्हती प्रत्यक्ष अध्वर्यूच ! इकडे याज्ञवल्क्याकडे पाहावें तर तिकडे तरी काय ? तेथहि बोलण्याची सोय नव्हती.

आणि त्यांना तरी कसें बोलावयाचें? यज्ञ सफल झाला तो त्यांच्या कौशल्या-मुळें. मग तेथें तरी काय बोलावें? पण वैशंपायनांनीं तरी हें विसरावें काय? फजितीची वेळ आली असतां भाच्यांनीं मागचें सर्व विसरून, थोर मन करून वेळेवर अब्रू बचावून नेली याचें त्यांना कांहींच कां नसावें? हा वैशंपायनांचा आग्रह तरी कोणत्या गांवचा? आणि तो कोण चालूं देईल? प्रकरण पेटण्याच्या रंगांत आलें. पण मोठें धैर्य करून देवलऋषी या वादांत पडले आणि मध्यस्थी करून मामास अर्धी व भाच्यास अर्धी दक्षिणा अशी तडजोड करून हें प्रकरण त्यांनीं शेवटीं कसेंबसें मिटवलें. पण हेंच वैशंपायनांनी केलें असतें तर! हा याज्ञवल्क्यांचा पहिला विजय होय! ( भारत शां. प. ३२३-१९ व आन्हिकचंद्रिका ३५५ )

---

# मुळी धरली

या अपूर्व विजयामुळें याज्ञवल्क्यांचा जिकडे तिकडे बोलबाला झाला. जनकराजांची तर या नूतन विजयामुळें त्यांचेवर भक्ति व श्रद्धा जडली. नेहमीं ते आतां त्यांच्या भेटीस जाऊं येऊं लागले. योगीश्वरांची अगाध विद्वत्ता, विलक्षण कल्पकता व अलौकिक कर्मकौशल्य पाहून ते मनांत आश्चर्यानें दंग झाले होते. जनक म्हणजे कांहीं आजच्यासारखे चैनी व हौशी राजेरज-वाड्यांच्या कोटींतले विलासी पुरुष नव्हते. ते मोठे कर्मठ व विद्याव्यासंगी असून तत्वज्ञानांत तर त्यांचा मोठा नांवलौकिक होता. तेव्हां अशा राज-पुरुषानें याज्ञवल्क्यांचें कौतुक करावें म्हणजे त्यांची योग्यता केवढी असली पाहिजे हें निराळें सांगणें नकोच.

पुढें कांहीं दिवसांनीं जनकांनीं गंगातीरीं एक मोठा अश्वमेध यज्ञ आरंभिला. त्यांत अध्वर्यूंचा मान प्रत्यक्ष याज्ञवल्क्यांनाच मिळाला. हा महायज्ञ अथपासून इतिपर्यंत यथासांग व निर्विघ्नपणें पार पडला. ( आन्हिक चंद्रिका पृ. ३५५ ) यामुळें योगीश्वरांची कीर्ति सर्वतोमुखीं झाली. हा त्यांचा दुसरा विजय होय. जनकराजे आतां शुक्लयजुर्वेदाची दीक्षा घेऊन याज्ञ-वल्क्यांचे परम स्नेही व चाहते बनले.

यानंतर त्याना यज्ञांत अध्वर्यूंचें काम करण्याकरिता मोठमोठ्यांचीं आम मणांमागें आमंत्रणें येऊं लागलीं. पुढे गोदावरीतीरावरील पुण्यस्तंभ (पुणतांबें) क्षेत्रांत एक मोठा यज्ञ झाला. त्यात याज्ञवल्क्यच प्रमुख अध्वर्यु होते. पुनः नर्मदातीरावर मित्रविंद गांवांत त्यांनीं एक मोठा यज्ञ यशस्वी करून दाखविला. पुढे श्रीकाची क्षेत्रांत एक मोठा अश्वमेध यज्ञ शुद्ध त्यांच्या अध्यक्षतेखालींच मोठ्या उत्साहानें व समारंभानें थाटण्यांत येऊन तोही पूर्ण व यशस्वी झाला. (आन्हिकचंद्रिका, पृ. ३८५) याप्रमाणें त्यांनीं अनेक ठिकाणीं अनेक राजांचे अनेक लहान मोठे यज्ञ यशस्वी व प्रभावी करून दाखविले. अद्वितीय अध्वर्यु अशी त्यांची जगभर कीर्ति पसरली आणि जो तो शुक्लयजुर्वेदाची महति व कौतुक वर्णन करूं लागला याज्ञवल्क्यांची ही मोठी विजयपरंपरा होय.

---

## वैदिक राष्ट्राचें स्पृहणीय चित्र

योगीश्वरांची पौरुषपूर्ण व ज्ञानगर्भ अशी सुंदर शिकवण मानवमात्राला—विशेषत आम्हा भारतीयांना—आजही कशी बोधप्रद व हितप्रद आहे आणि ती कोणत्या विचारसरणीत गोंवून दाखविली आहे याविषयीं अधिक माहिती आम्हीं 'शतपथ पुष्पांजलि' या ग्रंथांत सविस्तर देण्याचें ठरविलें असून तो योग भवानीकृपेनें लवकरच येईल अशी वाचकांस सूचना देऊन प्रस्तुत विषयाकडे वळतों

याज्ञवल्क्याच्या शिकवणीचा एक लहानसा मासला म्हणून शुक्लयजुर्वेदात त्यांनीं आपली राष्ट्रीय भावना कशी व्यक्त करून दाखविली आहे याची थोडक्यांत कल्पना देऊन ठेवतों वैदिक राष्ट्र कसें असावें अगर असलें पाहिजे याविषयीं अश्वमेधांत एक सुंदर मंत्र घालून ठेविला आहे. दुर्दैवानें अश्वमेध, आपल्यांतून अदृश्य झाल्यामुळें या मंत्राचें आज आम्हांस विस्मरण झालें आहे हें खरें. पण तो मंत्र इतका तेजस्वी व राष्ट्रसंग्राहक आहे कीं त्याचीं आजमितीसही पारायणांवर पारायणें करणें हें अत्यंत अवश्यक आहे अशी आमची नम्र समजूत आहे.

तो दिव्य व प्रसिद्ध मंत्र म्हणजे हा:- 'आ ब्रह्मन्ब्राह्मणो ब्रह्मवर्चसी जायतमा राष्ट्रे राजन्यः शूर इषव्योतिव्याधी महारथो जायतां दोग्ध्री धेनुर्वो- ढानड्वानाशुः सप्तिः पुरन्धिर्योषा जिष्णू रथेष्ठाः सभेयो युवाऽस्य यजमानस्य वीरो जायतां निकामे निकामे नः पर्जन्यो वर्षतु फलवत्यो न ओषधयः पच्यन्तां योगक्षेमो नः कल्पताम् ॥ अ. २२ मं. २२ ॥ भावार्थः-' हे ब्रह्मन्, आमच्या राष्ट्रांत वेदाध्ययनसंपन्न असे तेजस्वी ब्राह्मण निपजोत! आमच्या देशांत पराक्रमी, धनुर्धारी, व महारथी असे शूर क्षत्रिय वीर निपजोत! आमच्या देशांत धष्टपुष्ट अशा चांगल्या दुभत्या गाई निपजोत! अत्यंत चपल व उमदे असे घोडे निपजोत! सर्वांगरमणीय व सद्गुणमंडित अशा सुंदर स्त्रिया निपजोत! अखंड विजयशाली असे अतिरथी, महारथी व वीरश्रेष्ठ निपजोत! आमच्या राजाला सर्वसमर्थ, सभापंडित व पराक्रमी असा युवराज प्राप्त होवो! आमच्या प्रार्थनेप्रमाणें मेघराज आमच्या राष्ट्रावर वेळच्या वेळीं जलवृष्टि करो! आणि आम्हां प्रजाजनांचा योगक्षेम सुरळीत चालो!!' अहाहा, केवढी सुंदर प्रार्थना ही! किती तेजस्वी, किती व्यापक आणि किती भावना- मधुर! ही तेव्हांच काय पण आजदेखील राष्ट्रीय प्रार्थना होण्यास सर्वस्वीं योग्य अशीच नाहीं काय? आज आम्ही राष्ट्रीय प्रार्थना म्हणून कसलीं तरी गबाळ व निर्माल्यवत् पद्यें वरळत असतों; पण पाचकहो, वरील प्रार्थना किती अर्थपूर्ण व भावनामधुर आहे बरें! या हतभागी भरतभूमीच्या वर्त- मानकालीन दुर्धर प्रसंगीं अखिल हिंदूंच्या मनांत ऐक्य, प्रेम व स्फूर्ति उत्पन्न करण्याचा दिव्य प्रभाव या महामंत्रांत तुम्हांस आढळून येत नसला तर इतर रमम्या व शिळ्या प्रार्थनांनीं काय व्हावयाचें आहे? महाराष्ट्रांतील ब्राह्मण- क्षत्रियांनो, तुम्ही इकडे नीट लक्ष घाल तर केवढी बरें मौज होईल! असो. राष्ट्र कसें असावें याचें एक सुंदर दृश्य योगीश्वरांनीं वरील मंत्रांत आज पांच हजार वर्षांपूर्वींच रंगवून ठेविलें आहे तें आज जगांतील कोणत्याहि राष्ट्राला शिरोधारणीय नाहीं असें कोण म्हणेल?

---

## वृक्ष फोफावला

याज्ञवल्क्याच्या विद्वत्तेची व प्रभावी शुक्ल यजुर्वेदाची विशाल कीर्ति जाता जाता सार्वभौम पुण्यश्लोक जनमेजय राजाच्या कानापर्यंत गेली इतकेच नव्हे, तर त्याची कर्तबगारी, कर्मकौशल्य, अलौकिक ज्ञानभांडार पाहून राजे मनात थक्क झाले सम्राटाच्या मनात आता त्याच्याविषयी आदर व पूज्य भाव उत्पन्न झाला आणि त्यास जवळ ठेवून घेऊन ते त्याचे अनुयायी व कैवारी बनले आपल्या मुलाला म्हणजे शतानीकाला त्यांनी शुक्लयजुर्वेद पढविला या थोर व उदार राजर्षिमुळच वाजसनेयाचा राजवाड्यात व राज दरबारात प्रवेश होऊन जगात सर्वत्र मान्यता व प्रतिष्ठा मिळाली व मिळू लागली हे जनमेजय राजे म्हणजे फार विद्वान, मोठे धर्मज्ञ व अत्यंत सदा चरणी होते ते जसे विद्वान व धर्मशील होते तसेच मोठे पराक्रमी व शूरही होते आपल्या पित्याला मारणाऱ्या तक्षकाचा सूड घेण्यासाठीं व सर्पजातीचा निर्वंश करण्यासाठी म्हणून सर्पसत्र आरंभून त्यात त्यांनी सर्पजातीचा धुव्वा उडवून दिला होता व सर्व राजावर आपला दरारा बसवून त्याना आपले मांडलिक केले होते, आणि आता राजराजेश्वर सार्वभौम जनमेजय झाले होते

असे शूर व पराक्रमशाली राजेश्वर याज्ञवल्क्याचे अर्थात् आपल्या शिष्याचे अनुयायी व कैवारी झाले ही गोष्ट वैशंपायन मुनींस मुळींच आवडली नाहीं या बाबतीत त्यांनीं जनमेजय राजाची अधूनमधून एकदोन वेळा कानउघाडणी केली आणि याज्ञवल्क्याचा संबंध तोडण्याविषयीं परोपरीने सांगून पाहिले- पण जनमेजय राजे ते ' ते काय अशा भिक्षुकी धाकाला थोडेच भीक घालणार' ते गुणाचे चाहते होते, व्यक्तीचे अभिमानी नव्हते वैशंपायनाच्या या मायावी उपदेशाला ते बळी पडले नाहीत इतकेच नव्हे, तर वैशंपायनांना न बोलाव ताच त्यांनीं एक पौर्णिमास यज्ञ आरंभिला ही वार्ता वैशंपायनास समजताच रागानें लाल होऊन पाय आपटीत आपटीतच ते यज्ञमंडपात आले आणि राजास व याज्ञवल्क्यास अद्वातद्वा बोलून व शिव्याशाप देऊन स्वारी तशीच तणतणत निघून गेली ! ( मत्स्य अ ५० )

वैशंपायनांचें हें कृत्य जनमेजयांस कसेंसेंच दिसून, त्यांनीं पुढें या गुरूंचा नाद अजिबात सोडून दिला. या राजपुरोहिताचा हा तामसी व मत्सरी स्वभाव त्यांना बिलकूल आवडला नाहीं. याज्ञवल्क्यांचा तो आनंदी व उमदा स्वभाव कोणीकडे आणि वैशंपायनांचे हे आसुरी व अश्लील चाळे कोणीकडे ! न बोलावतां या यज्ञांत येऊन गोंधळ घालणें म्हणजे काय ? याला शिष्टाचार म्हणतात कीं काय ? जनमेजयांना तर या गोष्टीची मोठी चीड आली आणि यामुळें त्यांनीं या गुरूंकडे जी एकदां पाठ वळविली ती वळविलीच. पुनः त्यांनीं त्यांचें नांवही घेतलें नाहीं !

त्यांनीं आतां शुक्लयजुर्वेदाचा पुढाकार घेतला. अद्यापपर्यंत या नववेदाला थोर थोर आचार्यांकडून व राजेलोकांकडून मिळावी तशी प्रतिष्ठा मिळालेली नव्हती ती या महाभाग राजानें मिळवून दिली. वैशंपायनांनीं या वेदासंबंधीं कुत्सित बुद्धीनें नाहीं नाहीं तीं किटाळें उपस्थित करून आकाश पाताळ एक केलें. पण दुर्दैवानें तीं सगळीं फसलीं आऊन अखेर योगीश्वरांचा यजुर्वेद राजमान्य व लोकमान्य झाला तो झालाच !

राजे लोकांच्या भव्य यज्ञमंडपांत याज्ञवल्क्यांचा शुक्ल यजुर्वेद आपल्या दिव्य प्रभावानें आकाशांतील सूर्यनारायणाप्रमाणें सर्वत्र सारखा चमकूं लागला ! प्रत्यक्ष जनमेजयांसारख्या थोर थोर राजपुरुषांनीं त्याचा पुरस्कार केल्यावर मग बढाला काय कमी ? जिकडे तिकडे राजवाड्यांत व राजदरबारांत वाजसनेयांचा प्रवेश होऊन, दिवसेंदिवस त्यांचा जयजयकार होऊं लागला आणि त्यांचें महत्त्व व प्राबल्य वाढत चाललें. गुरुजींच्या कृष्णयजुर्वेदाला कृष्णपक्षाची भावना झाली आणि शिष्याच्या शुक्लयजुर्वेदाला शुक्लपक्षाची कांति चढली ! यज्ञमंडपाचे दरवाजे गुरुजींना बंद पडत चालले आणि तेथें शिष्याचे स्वागतसमारंभ थाटानें होऊं लागले! वैशंपायनांचे ग्रह ग्रह सगळे बदलले आणि याज्ञवल्क्यांवर चवऱ्या ढळूं लागल्या! चंद्र निस्तेज पडत चालला आणि सूर्य झळकूं लागला ! कालाय तस्मै नमः ! !

# सम्राट जनमेजयांचा अश्वमेध यज्ञ

याप्रमाणें योगीश्वराचा जिकडे तिकडे गौरव व जयजयकार चालला असताना जनमेजय सम्राटांनी एक मोठा अश्वमेध यज्ञ करण्याचे सकल्पून त्याप्रमाणे कामास सुरवातहि केली अर्थात् ही सर्व तयारी प्रत्यक्ष याज्ञवल्क्याच्या सल्ल्यानें व खुद्द त्याच्याच देखरेखीखाली करण्यात आली हें निराळें सागावयास नकोच हे कार्य त्याच्या नेतृत्वाखाली जोरानें व नेटानें चालून पुढ थोड्याच अवधीत सर्व सिद्धता झाली आणि अश्वमेध जाहीर करण्यात आला या खेपेस गुरु वैशपायनास अजीबात वगळण्यात आलें होतें ही मुद्याची गोष्ट ध्यानात ठेवण्यासारखी आहे

अश्वमेध यज्ञ म्हणजे काही लहानसान प्रकरण नव्हे तो फक्त सार्वभौम राजानेंच करावयाचा असतो इतराना तो उक्त व शक्य नाही राजा जेव्हा पृथ्वीपति असेल अथवा जेव्हा तो महाबलाढ्य असून मोठा विजय सपादन करील, अशा वेळीच हा समारभ थाटावयाचा अशी वैदिक परपरा आहे हा उत्सव म्हणजे वैदिक लोकाची एक अपूर्व महापर्वणीच ! देशातील सर्व लहान मोठे राजेरजवाडे, सरदार, जहागिरदार, दोटसावकार, शास्त्री, पंडित वगैरे सर्व प्रसिद्ध लोक या समारभात हटकून उपस्थित असावयाचे शिवाय चागले चागले कलावत, गुणीजन, जादूगार, कारागीर अशा लोकाची एकच गर्दी उडावयाची मग प्रेक्षकाचा समुद्र केवढा प्रचड लोटत असेल याची वाचकानींच कल्पना करावी !

दुर्दैवानें हा महायज्ञ आज आपल्यातून अदृश्य झाल्यामुळे त्याच्या भेथ यांची व समारभाची वाचकास यावी तशी कल्पना येण शक्य नाही म्हणून प्रत्यक्ष जरी नसली, तरी निदान शब्दचित्र रेखाटून त्याची अशत ओळख करून द्यावी या उद्देशान आम्ही त्याची थोडक्यात माहिती करून देत आहो तीं वाचून त्या श्रेष्ठ यज्ञाची वाचकाना थोडीबहुत तरी अटकळ करता येईल अशी आमची समजूत आहे

वैदिक लोकात यज्ञ म्हणजे एक मोठे धतकृत्य, आणि तशात अश्वमेध म्हणजे मग काही विचारूच नये ! हा वैदिक लोकाचा इहलोकातील सर्वश्रेष्ठ

-समारंभ होय ! हा फक्त सार्वभौम अगर महाबलाढ्य राजानेंच करावयाचा असतो. या महायज्ञांत राष्ट्रांतील सर्व वैभव, सर्व संपत्ति, सर्व सौंदर्य, सर्व सामर्थ्य, सर्व विद्वत्ता, सर्व कलाकौशल्य, फार काय सर्व दर्शनीय व प्रेक्षणीय वस्तु एकत्र पाहावयास सांपडतात. वैदिक राष्ट्राचें अपूर्व ऐश्वर्य आणि अपार सामर्थ्य पाहण्याची अमूल्य संधि ती हीच ! वैदिक धर्माचें श्रेष्ट व तेजस्वी स्वरूप प्रकट होतें येथेंच ! वैदिक लोकांच्या विद्वत्तेचा व शहाणपणाचा कळस दिसतो तो याच ठिकाणीं ! ! अर्थात् हा अश्वमेध म्हणजे वैदिक लोकांच्या ऐश्वर्याचें, सामर्थ्याचें व विद्वत्तेचें एक मनोहर प्रदर्शनच होय !

या अश्वमेधाचा मुख्य मंडप मोठा विस्तीर्ण असून तो ध्वजापल्लवांनीं सुशोभित केलेला असतो. हा मंडप अग्निष्टोम अगर सोमयज्ञ मंडपाच्या धर्तीवरच घातलेला असून त्यांत निरनिराळे भाग केलेले असतात. म्हणजे हा मंडप प्राचीन शाळा, सद, हविर्धान, आग्नीध्रीय व मार्जालीय अशा पांच मंडपांचा मिळून एक झालेला असतो. प्राचीन शाळेंत आहवनीय, गार्हपत्य व दक्षिणाग्नि या तीन श्रौताग्नींच्या वेदि स्थापन झालेल्या असतात. या प्राचीन शाळेच्या पूर्वेस सदोमंडप असून तेथें यज्ञपुरोहित व प्रतिष्ठित मंडळीन बसावयाची व्यवस्था केलेली असते. याच्या पूर्वेस हविर्धान मंडप असून तेथें यज्ञसाहित्य वगैरे ठेविलेलें असतें. या मंडपांतच अग्रभागीं एक सौमिक वेदि बांधलेली असून तिलाच महावेदि असें म्हणतात. या वेदीच्या पूर्वेस जवळच यज्ञीय पशु बांधण्यासाठीं म्हणून पळस, खदीर अगर बिल्ववृक्ष याचा एक खांब ( यूप ) रोंविलेला असतो. अश्वमेधांत असे एकवीस खांब असतात. महावेदीच्या उत्तरेस आग्नीध्रीय व दक्षिणेस मार्जालीन असे मंडप असून या दोवटच्या मंडपांत यज्ञपात्रें वगैरे धुण्याची व्यवस्था असते. ऐष्टिक वेदीवर अग्निहोम करण्यांत येऊन महावेदीवर पशूचें हवन होतें. अशी ही थोडक्यांत यज्ञमंडपाची माहिती आहे.

अश्वमेधाच्या प्रथम दिवशीं दीक्षाविधि व ऋत्विग्वरण झाल्यावर राजा गळ्यांत सुवर्णाचा कंठा घालून सकाळीं होम करून तो कंठा अध्वर्यूस अर्पण करतो. प्रातर्होम झाल्यावर यम्हयाची परवानगी घेऊन अध्वर्यू हा दर्भाची वळलेली एक दोरी घेऊन त्या दोरीनें श्यामकर्ण जातीचा एक सुंदर घोटा धरून त्याला ' अभिधा असि ' या मंत्रानें बांधतो.

नंतर त्याला मोठ्या थाटानें एका सरोवराकडे मिरवीत घेऊन जातात. तेथें गेल्यावर त्याला पाण्यांत नेऊन सर्व ऋत्विज मिळून त्याच्या अंगावर पाणी शिपटतात, आणि अध्वर्यु हा 'प्रजापतये त्वा जुष्टं प्रोक्षामि' या मंत्रानें त्यास स्वच्छ धुऊन काढतो. घोड्याच्या बरोबरच एक कुत्रा पाण्यांत नेलेला असतो. घोड्याला धुतल्यावर अध्वर्यूच्या हुकमावरून त्या कुत्र्याला खदिराच्या मुसळानें ठार मारण्यांत येऊन त्याला घोड्याच्या पायांखालीं दिल्यावर तो त्याच्या धडावर पाय देऊन पाण्यांतून बाहेर येतो. बाहेर आल्यावर त्यास अग्निजवळ आणून 'अग्नये स्वाहा' या मंत्रानें त्यांत दहा आहुति देण्यांत येतात. नंतर प्रक्रमसंज्ञक होम केला जातो.

येवढें झाल्यावर त्या अश्वास पृथ्वीवर यथेच्छ संचार करावयास म्हणून ईशान्य बाजूनें सोडून देतात. त्याच्या संरक्षणासाठीं शंभर राजपुत्र, शंभर क्षत्रिय पुत्र, शंभर सूतपुत्र व शंभर क्षात्रपुत्र असे चारशें सैनिक सशस्त्र सिद्ध करून त्याच्याबरोबर पाठविलेले असतात. उद्देश हा कीं घोडा संचार करीत असतांना मध्येंच त्याला कोणी अडविल्यास अगर धरून ठेविल्यास त्याच्याबरोबर युद्ध करून त्या घोड्याला मुक्त करून त्याचा पुढील मार्ग मोकळा करून द्यावयाचा. याप्रमाणें तो घोडा सतत एक वर्षभर सर्व देशांवर सारखा भटकत फिरत असतो.

घोडा बाहेर संचारास गेल्यापासून परत येईपर्यंत इकडे मंडपांत नित्य निरनिराळे होमहवन व क्रियाविधि चाललेलेच असतात. ब्राह्मण दिवसा व क्षत्रिय रात्रीं याप्रमाणें दररोज वीणावादन व गायन चाललेलें असतें; शास्त्र-पठण होत असतें; धृतिसंज्ञक होम चालू असतो; आणि लोकांस जेवण्यासाठीं मुक्तद्वार असतें.

घोडा फिरून परत आल्यावर औद्ग्रभण नांवाचा होम करतात. नंतर त्या घोड्याला शृंगारून रथास जुंपतात. त्याच्या जोडीला आणखी तीन घोडे जुंपलेले असतात. रथ उत्तम शृंगारलेला असून वर विजयध्वज फडफडत असतो. याप्रमाणें चार घोडे जुंपलेल्या शृंगाररथांत, कनककुंडलें धारण करून व धनुष्यबाण घेऊन राजा वर चढून बसतो. नंतर तो रथ मोठ्या समारंभानें वाजतगाजत, मिरवीत मिरवीत सरोवरापर्यंत जातो आणि मग

तेथून पुनः यज्ञमंडपाकडे परत फिरतो. येवढें झाल्यावर त्या घोड्यास रथापासून मोकळा करतात.

अश्वाला रथापासून मोकळा केल्यावर राजपत्न्या त्यास घृतानें अंजन करतात. मग त्यास ' वायुष्टवा पचते ' या मंत्रानें प्रोक्षण केल्यावर त्याचे पाय, कंबर व डोकें बांधून त्यास एका शय्येवर निजवितात आणि ' नऽवा उम्रियसे ' हा मंत्र म्हणून त्याचें संज्ञपन करण्यांत येतें म्हणजे त्याला ठार मारण्यांत येतें. नंतर राजाच्या राण्या त्या घोड्याजवळ येऊन सोन्याच्या, रुप्याच्या व लोहाच्या सुया घेऊन त्या अश्वाच्या शरीरावर टोंचून त्याला खड्गानें कोठें प्रहार करावयाचे हें दाखविण्यासाठीं खुणा करून ठेवितात. नंतर त्याला शस्त्रानें मारून त्याचे अवयव निरनिराळे करण्यांत आल्यावर ' शं ते परेभ्यो गात्रेभ्यः ' या मंत्रानें त्या मृत अश्वाचें शांतवन करण्यांत येतें. नंतर त्याच्या निरनिराळ्या अवयवांचा निरनिराळ्या देवतांप्रीत्यर्थ यथाविधि होम केला जातो. होमाच्या अगोदर ब्रह्मोद्य नांवाचा ऋत्विजाऋत्विजांत एक सुंदर ज्ञानपर असा संवाद होतो.

या अश्वमेधांत इतर पशूंचेंहि हनन केलें जातें. यज्ञमंडपांत या सवनीय पशूंना बांधण्यासाठीं एकवीस खांब पुरलेले असतात. पैकीं मधल्या खांबास अग्निष्ठ हीं संज्ञा आहे. या अग्निष्ठयूपास सतरा पशू बांधलेले असून बाकीच्या वीस खांबांस प्रत्येकीं सोळा सोळा याप्रमाणें एकंदर तीनशें वीस पशूंची योजना केलेली असते. या सवनीय पशूंमध्यें घोडा, गाय, बैल, बोकड, हरीण, कोल्हा, मुंगूस, हंस, बक, गरुड, चक्रवाक, तित्तिर, घुबड, बेडूक, साप, वाघ, सिंह, सुसर, मासे, कांसव इत्यादि नाना जातींचे, नाना तऱ्हांचे, नाना रंगांचे ग्राम्य व वन्य असे अनेक प्राणी असतात. या सर्व पशूंची मिळून एकंदरीत सहाशें नऊ भरते. यांत जे अरण्यपशु असतात त्यांना कांहीं प्रकारचे संस्कार करून सोडून देण्यांत येतें. त्यांना मारीत नाहींत. अश्वमेधांत किती पशू नियुक्त करावयाचे यांविषयीं पुढील वचन असें आहेः—' षट् शतानि नियुज्यंते पशूनां मध्यमेऽहनि । अश्वमेधस्य यज्ञस्य नवभिश्चाधिकानि च ॥ ' अश्वमेधाच्या मुख्य दिवशीं एकंदर ६०९ पशूंची योजना केली जाते. हा अश्वमेध यज्ञ एक वर्ष सत्तावीस दिवस सतत चालू असतो. या यज्ञास

फाल्गुन शुद्ध अष्टमीस सुरवात करतात शेवटीं अवभृत स्नानाचा मोठा समारंभ होऊन यज्ञसमाप्ति होते (महीधरभाष्य)

या यज्ञाची फलश्रुति शतपथात वर्णिलेली आहे ती अशी –' तरति सर्वं पाप्मान तरति ब्रह्महत्या यो अश्वमेधेन यजते '–जो अश्वमेध करतो तो सकल पातकें तरून जातो–ब्रह्महत्या दोषापासूनहि तो मुक्त होतो त्याची सकल पातकें भस्म होऊन जातात, इतकेच नव्हे तर ' सर्वाह्नि वै कामानाप्नोति सर्वाव्यष्टीर्व्यश्नुते यो अश्वमेधेन यजते '–त्याचे सर्व मनोरथ सफल होऊन तो सर्व लोकाचा अधिपति होतो, अशी ही अश्वमेधाची फलश्रुति आहे

अशा प्रकारचा जो महायज्ञ त्याचा थाट व समारंभ वर्णावा तरी किती? हस्तिनापुराच्या पूर्वेकडील विस्तीर्ण मैदानावर हा भव्य मंडप उभारला असून तो ध्वजापताकानीं व पुष्पपल्लवानीं आतून व बाहेरून उत्तम शृंगारला होता शहराच्या उत्तरेस राजेरजवाड्याना व थोर थोर प्रतिष्ठित पाहुणे मंडळींना उतरण्यासाठी त्याच्या योग्यतेप्रमाण प्रशस्त व सुंदर शिबिर बाधलीं होतीं दक्षिणेस व पश्चिमेस गावाच्या सभोवतीं उघड्या मैदानावर सामान्य लोकासाठीं लहान मोठे मंडप व निश्रांतिशाळा बाधून त्याची राहण्याची सोय केली होती मधून मधून लहान थोर बाजारपेठा वसविल्या होत्या गोरगरिबाची व मुलामाणसांची उपासमार होऊ नये म्हणून जेथ तेथ अन्नछत्र उघडला होती नाक्यानाक्यावर करमणुकीसाठी खेळ, तमाशे, प्रदर्शनें इत्यादिकाची उत्तम व्यवस्था केली असून निकडे तिकडे चोख बदोबस्त ठेविला होता

समारंभाचा दिवस जसजसा जवळ येत चालला तसतसे लोक जमत चालले राजेरजवाडे, सरदार व जहागिरदार, आपापल्या लवाजम्यानिशीं दाखल होऊ लागले रथ, घोडे, पालख्या, मेणे, हत्ती, उंट याची दिवस दिवस गर्दी होऊ लागली जिकडे तिकडे हस्तिनापूर शहर फुलत चालल आणि लोकाच्या तोंडावर उल्हास व उत्साह चमकू लागला यज्ञाची सर्व सिद्धता संपूर्ण झाली आणि जनमेजय राजा आनंदभरित झाले यज्ञ सुरू होण्यास आता दोन दिवसाचाच काय तो फक्त अवधि राहिला

---

# वैशंपायनांचा जळफळाट

येवढा मोठा अश्वमेध म्हणजे काय आणि तो सम्राट् जनमेजय करतात म्हणजे काय आणि तशांत वैशंपायनांना कोणीच पुसत नाहीं म्हणजे काय ! शिष्य याज्ञवल्क्य तेथें ब्रह्मा आणि गुरु वैशंपायन म्हणजे कोणीच नाहीं ? याचा अर्थ काय ? केवढें हें धाडस ! आणि कोण हा अपमान ! ! सार्वभौम जनमेजयाच्या अश्वमेधासारख्या श्रेष्ठ यज्ञांत आपल्या प्रतिस्पर्ध्याला श्रेष्ठ स्थान आणि आपल्याला त्यांत अजिबात फाटा, केवढें धारिष्ट ! केवढें लांछन ! या अपमानामुळें या माजी राजपुरोहिताचें पित्त खवळून गेलें असलें तर आश्चर्य तें काय ?

पण वैशंपायन म्हणजे कांहीं कमी कारस्थानी नव्हते. त्यांची पकड तत्कालीन ब्रह्मवृंदांवर चांगली होती. याचा फायदा घेऊन इतर शाखांच्या ब्राह्मणांशीं गुप्त कट उभारून त्यांनीं जनमेजयांच्या या विख्यात यज्ञावर ऐन वेळीं कडकडीत बहिष्कार पुकारला ! आणि इतर शाखांच्या ब्राह्मणांना तेथें जाण्यास बंदी केली. इतकेंच नव्हे तर याच्याहि पुढें जाऊन यापुढें कोणत्याहि क्षत्रियाच्या यज्ञांत एकट्या वाजसनेयांखेरीज इतर कोणत्याहि शाखेच्या ब्राह्मणांनीं भाग घेऊं नये असें सक्तीचें फर्मान काढलें ! आपला अपमान व अपराध करणाऱ्या या जनमेजय याज्ञवल्क्यांस त्यांनीं आतां जवळ जवळ वाळींतच टाकल्यासारखें करून सोडलें.

पण जनमेजयराजे म्हणजे हाडांचे कांहीं कच्चे नव्हते आणि याज्ञवल्क्य म्हणजे तर प्रत्यक्ष मेरूचा अवतारच ! ते अशा भिक्षुकी धाकाला थोडेच कचरणार ? वैशंपायनांनीं याप्रमाणें यज्ञावर कडकडीत बहिष्कार पुकारला असला तरी त्यामुळें मुळींच न डगमगतां त्यांनींहि कंबर कसली आणि इंद्रोत दैवाप यांची होतृस्थानीं नेमणूक करून तो यज्ञ मोठ्या थाटांत व समारंभांत पूर्ण व यशस्वी करून दाखविला ! जनमेजयराजे खूष झाले. यज्ञमंडप आनंदानें डोलूं लागला ! वाजसनेयांच्या यशाची नौबत झडूं लागली ! योगीश्वर याज्ञवल्क्य विजयी झाले ! आणि सम्राटांनीं त्यांचा मोठा गौरव केला ! (मत्स्यपु०, अ ५० ) पुनः तसा आणखी एक महायज्ञ त्यांनीं सुरु

कार्तवीर्य याच्या मदतीने पूर्ण करून दाखविला ! एका अश्वमेधाच्या ठिकाणीं त्यानीं दोन अश्वमेध यज्ञ यशस्वी करून दाखविले ! ! याच नाव पौरुष ! ! !
( मत्स्यपु अ ५०–६३ )

—

## मत्सराचा कडेलोट !

अपमान ! निराशा ! आणि फजीति ! अरेरे ! कोण ही दुर्दशा ! वैशंपायनाच्या वेडाच आता काय झाल ? त्याचा कप कोठ दडला ? आणि त्याच्या फर्मानाची दशा काय झाली ? सगळे फसल आणि प्रतिस्पर्ध्यांचा विजय झाला ! वैशंपायनाना आता कोणी कुत्रासुद्धा विचारीना ! केवढी अप्रतिष्ठा आणि ती सहन होणार कशी ? अर्थात् गुरुजींचा पारा आता चढू लागला तशात याज्ञवल्क्याचे हें प्रलोभनीय सामर्थ्य व त्याचा राजदरबारात व इतरत्र होत असलेला जयजयकार पाहून आगींत तेल पडल ! आणि वैशंपायनाचा जळफळाट शेवटी शिखरास जाऊन पोचला

मग आता काय विचारता ? विवकान ताळ सोडला मत्सरान उचल खाल्ली शिष्टाचारास पायबंद बसला आणि क्रोधान ब्रह्मांड पेटलें ! प्रल्हादाच्या विष्णुभक्तीनें पिसाळलेला हिरण्यकश्यपु आणि याज्ञवल्क्याच्या उत्कर्षामुळें चडावलेले वैशंपायन याच्यात फारस अंतर राहिल नाहीं

याज्ञवल्क्याना येनकेनप्रकारेण उच्चाटन पाडण्याचा या श्रीमदाचार्यांनीं आता विडाच उचलला आणि तो हेतु सिद्धीस नेण्यासाठी म्हणून खलबत चालू केलीं जनमेजय राजे हे याज्ञवल्क्याचे मुख्य आधारस्तंभ असल्यामुळे त्याची उचलबांगडी केल्याशिवाय शत्रूची खच्ची होण्यासारखी नव्हती, म्हणून त्या पुण्यश्लोक राजर्षिविरुद्ध आता अंतस्थ कारस्थान सुरू झालीं त्याच शिष्य श्यामायनी, आरुणी, आल्थी इ प्रायश्चित्तासाठीं म्हणून देशभर फिरत होतेच त्याच्या करवीं ठिकठिकाणीं त्यानीं राजद्रोहाच सुग्ग पेरून ठेवविले पुण्यश्लोक जनमेजयाचें राज्यछत्र उलथून पाडण्याचा राक्षसी कट सिद्ध करण्यात आला. आणि गुरुवर्य श्यामाच्या सच्छील वर्तनाची त्याना पूर्ण विस्मृति पडली !

—

# धर्मराजाचें सिंहासन गडगडलें !

मत्सरानें पिसाळलेलीं पण मोठ्या विचाराचीं थोर माणसें देखील प्रसंग-विशेषीं कशीं भडकतात आणि त्यामुळें विवेकाला व न्यायनीतीला कशीं पारखीं होतात, याचें उदाहरण येथें प्रत्यक्षच पाहावयास मिळतें. वैशंपायनांना आपण काय करीत आहों याचें भानच राहिलें नाहीं. राग सगळा याज्ञवल्क्यांवर आणि संधान रोखलें तें जनमेजयांवर ! वैशंपायन आतां खरो-खरच मत्सरानें अंध झाले होते आणि क्रोधानें विवेकभ्रष्ट बनले होते. त्यांचा कट आतां सिद्ध झाला आणि एकदम ज्वालामुखीचा स्फोट होऊन राज्यांत जिकडे तिकडे बंडाचा भडका उडाला ! हरहर ! पुण्यश्लोक धर्मराजाचें सिंहा-सन गडगडलें आणि राजराजेश्वर स्थानभ्रष्ट झाले ! राजद्रोहाचा कडेलोट होऊन गुरुवर्य ध्यामांच्या नातूचा पणतू वनवासी झाला ! आणि गुरुघराण्या-वर वैशंपायनांनीं आपल्या हातानें कुऱ्हाड घातली ! हें सर्व कपटनाटक पाहून जनमेजय वैतागून अरण्यांत निघून गेले आणि याप्रमाणें वैशंपाय-नांच्या डोळ्याचें पारणें फुकटाचें फिटलें ! !

धन्य धन्य जनमेजय राजे ! आणि धन्य धन्य ती त्यांची शांत वृत्ति ! ! वैशंपायनांनीं इतका कहर केला तरी काय ? केवळ शांतमूर्ति ! त्रैलोक्यवीर अर्जुनाचे पणतू, वीरकुलभूषण अभिमन्यूचे नातू, सार्वभौम परीक्षित राजाचे सत्पुत्र राजराजेश्वर जनमेजय, ते काय अज्ञानें थोडेच कचरणार ! वैशंपायनांचा तामसीपणा, मत्सरी स्वभाव, दीर्घ व हिडिस कारस्थानें त्यांनीं पाहिलीं आणि राज्यावर पाणी सोडलें. पण याज्ञवल्क्यांचो मैत्री व महति काडीइतकीहि कमी होऊं दिली नाहीं. याला म्हणतात सत्वनिष्ठा ! केवढा त्यांचा थोरपणा आणि केवढी त्यांची गुरुभक्ति ! केवढा त्यांचा स्वार्थत्याग आणि केवढी त्यांची शांत वृत्ति ! वैदिक राजे पराक्रमांत जसे श्रेष्ठ तसेच ते सत्वरक्षणार्थ राज्यवैभवा-वरहि काय पण प्रत्यक्ष प्राणावरही पाणी सोडण्यास तितकेच उदार ! वैशंपा-यनांच्या असुरी कृत्याला ते किंचितहि आणि राजमुकुटावर तुळशीपत्र ठेविलें ! राज्यत्यागहि केला पण सूडबुद्धीला अंतःकरणांत तिळप्रायहि जागा दिली

नाहीं ! वैशंपायन थोर समजून चार पावलें माघारी घेतलीं आणि त्याचे वारेंहि नसो म्हणून अरण्यवास पत्करला ! कडकडीत वैराग्यवृत्ति धारण करून त दोवटपर्यंत अरण्यातच मोठ्या आनंदानें राहिले ! शाबास त्या पुण्यशील राजपाची आणि त्याच्या समाधानवृत्तीची ! असो

---

## डाव फसला !

किती झालें तरी वड त वडच ! त्याचा रंग काय तो अवघा तीनच दिवस ! पण अशानें काय व्हावयाचें आहे ? आणि कुठं काय झालें आहे ? फार तर राज्यात चार दिवस गोंधळ मात्र माजून राहावयाचा इतकेंच आणि येथेंहि असाच प्रकार झाला वैशंपायनांनी जनमेजयास राज्यत्याग करावयास लावला, हे जरी खरें असलें, तरी ज्या उद्देशानें त्यांनी हा व्यूह रचून डाव टाकला होता तो मात्र त्याचा सपशेल फसला त्यापासून योगीश्वराचें सामर्थ्य व वजन खचलें तर नाहींच, उलट त्यांना भरती मात्र चढली !

हस्तिनापूरच्या गादीवर आता पुन त्यांचा शिष्यच विराजमान झाला ! जनमेजयाचा ज्येष्ठ पुत्र शतानीक-योगीश्वराचा प्रत्यक्ष शिष्य-हा गादीवर बसला आणि त्यानं शुक्लयजुर्वेदाची तळी उचलून धरली पुन वैशंपायनाचा यजुर्वेद मागें पडला आणि ते आता क्षीणतेज होत चालले ! हस्तिनापुरच्या दरबारात वाजसनेयाचं प्रस्थ व प्राबल्य कायम राहून, वैशंपायनरूपूची पकड दिवसेंदिवस ढिली होत चालली इतक्यात जनमेजय राजे अरण्यात कालवश झाल्याची दु खद बातमी हस्तिनापुरात येऊन थडकली, आणि त्यामुळ व तेव्हापासून वैशंपायनरूपूत व क्षत्रियात चांगलीच तेढ व चुरस वाढून दोघामध्य आडवा विस्तव जाईनासा झाला विचारी क्षत्रियाची त्याच्यावर इतराजी होऊन त्यांनीं जी एकदा त्याच्याकडे पाठ वळविली ती पुन फिरविलीच नाहीं ! याप्रम ण वैशंपायनरूपूची पिछेहाट होऊन तो जो एकदाचा मागें पडला तो पडलाच आणि वाजसनेयास जी भरती लागली ती कायमच !

पुढ याचा परिणाम असा झाला कीं, हा वैशंपायनरूपू क्षत्रियास व वाजस नेयास दोघासही पाण्यात पाहू लागला क्षत्रियाचा द्वेष व वाजसनेयाची

त्यावळकी करण्यांतच तो आनंद व पुरुषार्थ मानूं लागला; आणि हीच प्रथा आणि हीच अनुदार वृत्ति आजमितीसहि चालू आहे. पण दुर्दैव हें कीं या विपरीत परिस्थितीमुळें ब्राह्मण व क्षत्रिय यांचें जें तेव्हांचें प्रेमाचें व जिव्हाळ्याचें नातें होतें त्याला ओहोटी लागून तेथें द्वेष व तिरस्कार यांची छावणी पडली! परस्परांचा परस्परांवरील विश्वास उडाला आणि यामुळें त्या दोन तेजस्वी जातींतील प्रभावी ऐक्य मावळत चाललें! असहकार्याचा अनिष्ट मनु सुरु झाला! आणि वैदिक धर्माचें आणि राष्ट्राचें नष्टचर्य ओढवलें! हेंच कलियुग! कलियुग कलियुग म्हणजे काय? विचारी ब्राह्मणांचें शोचनीय अज्ञान आणि प्रभावी क्षत्रियांचें मानसिक दौर्बल्य! ज्ञान आणि कर्म यांचें आत्मघातकी असहकार्य आणि वैभवशाली वैदिक राज्यलक्ष्मीचा शोचनीय अधःपात! याशिवाय कलियुग आणखी तें काय असणार? हें भारतभूमीचें भयंकर भविष्य त्रिकालज्ञ योगीश्वरांच्या दिव्य दृष्टीस आधींच दिसलें होतें म्हणूनच कीं काय कोणास ठाऊक, त्यांनीं वैदिक समाजास या महत्-संकटापासून सावध राहण्यासाठीं वेळींच प्रेमाचा पण जोराचा क्षणक्षणीत इषारा अगदीं सुटसुटीत शब्दानें आगाऊच देऊन ठेविला आहे. पण इकडे पाहतो कोण? आणि शेवटीं जें व्हावयाचें तें झालेंच!!

---

## योगीश्वरांची सामाजिक दृष्टि

भारतीय मानव कुलाकडे वैदिक आर्यांची 'पाहावयाची प्रापंचिक व पारमार्थिक आणि आजच्या भाषेंत सांगावयाचें म्हणजे व्यावहारिक व राष्ट्रीय दृष्टि कशी होती व असावी' याविषयीं या राष्ट्रीय विभूतीनें जो सुंदर धडा घालून दिला आहे तो केव्हांहि चिंतनीय व आजतर सर्वतोपरी अनुकरणीय असाच आहे. भारतीय आर्यांत ब्राह्मण-क्षत्रियादिकांची वर्णोत्पत्ति कशी झाली याची त्यांनीं उपपत्ति दिली आहे ती अशीः—वैदिक आर्यसमाज प्रथमारंभीं एकवर्णीच म्हणजे ब्राह्मणविशिष्ट असा एकावयवीच होता. ( ब्रह्म वा इदमग्र आसीत्। बृ. १-४-११ ) तशा एकांग स्थितींत समाजाचें संरक्षण, संपोषण व संवर्धन जसें व्हावयास पाहिजे होतें तसें होईना म्हणून समाजाचें संरक्षण अधिक सुसूत्र व सुव्यवस्थित व्हावें या उद्देशानें त्यानें आपल्यांतूनच

प्रभावी असा क्षत्रियवर्ण निर्माण केला (तत्क्षत्रमसृजत, बृ १-४ ११) म्हणजे एकावयवी समाजपुरुषाला आता क्षत्रियरूपी एक नवीन बाहु फुटर आणि यामुळे समाजरक्षणाचें कार्य आता अधिक सौकर्यानें होऊं लागलें हें खरें. पण तेवढ्यानें समाजाचें व्हावें तसें संपोषण व संवर्धनकार्य वाढीस लागावें तसें लागेना, म्हणून कृषि व वाणिज्यसंवर्धक असा वैश्यवर्ण त्यातून निर्माण झाला (तद्विशमासृजत, बृ १-४-१२) येवढें करूनहि पुढें व वाढत्या समाजाला सेवावृत्तीची गरज भासू लागली ती लागलीच आणि म्हणून त्यानें शूद्राचीहि उत्पत्ति केली (तच्छूद्रमसृजत, बृ १-४-१३) अशा रीतीनें हा भारतीय समाजपुरुष सर्वांगपरिपूर्ण व सर्वसमर्थ झाला हेंच आज पुरुषसूक्ताच्या भाषेत बोलावयाचें म्हणजे एकाच विराट देहाट व्यवहारपरत्वें मुख, बाहू, मांड्या व पाय असे निरनिराळे, पण परस्परसहाय कारक व संपोषक असे अवयव फुटून तो पूर्ण व प्रभावी झाला

गुलाबाच्या पाकळ्या जरी भिन्न भिन्न दिसल्या तरी फूल जसें एक, दाणे वेगळे वेगळे असले तरी डाळिंब जसें एक, मोती वेगळी असलीं तरी हार जसा एक, तद्वत् वर्ण अगर जाति जरी भिन्न असल्या तरी भारतीय मानवकुल एक व अखंड, ही दिव्य भावना डोळ्यापुढें ठेवूनच प्राचीन वैदिक लोक आपले प्रापंचिक व पारमार्थिक व्यवहार करीत असत आणि म्हणूनच वैदिक राष्ट्र एवढें प्रभावी व तेजस्वी म्हणून गाजून गेले शरिरांतील निरनिराळ्या अवयवांना सर्वत्र खेळून चैतन्य व सामर्थ्य देणारें शरीरांतील रक्त जसें एक तद्वत भारतसमाजोद्यानांतील निरनिराळ्या ताटव्यांतून वाढलेल्या ल्हानथोर विविध जातिरूप झाडाझुडपांना सुंदर टवटवी व मधुर तजेला देणारें अमृतसदृश धर्मरूपी पवित्र जीवनही एकच असल्यामुळे तो एका काळीं स्वर्गांतील नंदनवनाप्रमाणे फुलून व खुलून दिसत असला तर त्यांत नवल तें काय ?

भारतीय लोकांतील वर्णोत्पत्ति सांगून पुढें याज्ञवल्क्य आणखी एके ठिकाणीं असें स्पष्ट बजाऊन सांगतात कीं, हे वर्ण जरी व्यवहारमूलक भिन्न दिसले तरी वैदिक समाज काहीं वस्तुतः भिन्न व तुटक नाहीं तो एक व अखंड आहे ' इदं ब्रह्मेदं, क्षत्रमिमे लोका इमे देवा इमानि भूतानीदं सर्वं यदयमात्मा ' (बृ ४, ५, ७)-हे ब्राह्मण, हे क्षत्रिय, हे लोक, हे देव, हीं भूतें हे सर्व हा

आत्माच आहे! म्हणजे हें सर्व एकच आहे; विविधत्वांत एकत्व म्हणतात तें ह! पारमार्थिक अगर आजकाल राष्ट्रीय दृष्टि म्हणतात ती ही! अनेक एहान-थोर व्यक्तींचें मिळून एक कुटुंब होतें. अशा अनेक कुटुंबांची एक जात बनते, अनेक जातींचा मिळून एक गांव होतो, अनेक गांवांचा एक प्रांत, अनेक प्रांतांचा एक देश आणि अनेक देशांचें मिळून एक राष्ट्र होतें. प्रपंचांत मात्र व्यक्तिव्यक्तीच्या अगर कुटुंबाकुटुंबाच्या दृष्टीनें विचार करावयाचा हें जरी इष्ट व स्तुत्य असलें तरी ज्या वेळीं कुटुंब, गांव, प्रांत, देश अगर राष्ट्र यांच्या हिताहिताच्या प्रश्नासंबंधीं विचारविनिमय करावयाचा असतो तेव्हां व्यक्तीचा अगर इतर घटकांचा पृथक्शः विचार करीत न बसतां तेथें व्यापक व सामुदायिक दृष्टीनेंच तो केला पाहिजे आणि हीच पारमार्थिक दृष्टि होय. आणि यालाच आज आम्ही राष्ट्रीय दृष्टि म्हणतों. ही दृष्टि मनुष्यांत जसजशी विकास व विस्तार पावत जाईल तसतशी त्याची योग्यता व अधिकार परमार्थांत वाढत जातो आणि असें होतां होतां शेवटीं तो विश्वकुटुंबी होतो. हाच महात्मा आणि हाच महर्षि! *'इदं सर्वं यदयमात्मा'* हें *योगीश्वरांचें विश्वसंग्राहक प्रभावी* वचन सतत डोळ्यापुढें ठेवून या आत्मौपम्य दृष्टीनें आम्हीं सामाजिक व राष्ट्रीय प्रश्न आज सोडवावयास बसूं तर केवढी घरें मौज होईल!

पण दुर्दैवाची गोष्ट ही कीं आज ही आमची विशाल दृष्टि अगदीं मंद झाली असून तेथें संकुचित जातिनिष्ठ स्वार्थबुद्धीचे दाट धुके पसरलें असल्या-मुळें हा भव्य विराट पुरुष आज जवळजवळ अंधच झाल्यासारखा झाला आहे. तो आज जगाच्या डोळ्यांत मुळींच भरण्यासारखा नाहीं. उघडच आहे कीं विशाल वृक्षाच्या शाखा व उपशाखा तोडून त्यांचे निरनिराळे गढे बांधून ते वेगळे वेगळे टाकून दिल्यावर मग त्या भव्य वृक्षाचा गंभीरपणा राहणाऱ्यांच्या डोळ्यांत भरावा तरी कसा? अथवा सुंदर गुलाबाचें फूल कुस्करून त्याच्या मधुर पाकळ्या वाऱ्यांत उधळून दिल्यावर त्याचा स्वर्गीय मोहकपणा मग राहणार तरी कोठून? आणि आज आपली हीच स्थिती झाली नाहीं काय? याज्ञवल्क्य जीव तोडून सांगत आहे कीं, बाबांनो, ही जातिनिष्ठ संकुचित दृष्टि मानवी हितास व वैदिक धर्मास बिलकूल पोषक व पाचक नाहीं. 'ब्राह्मण वेगळे आणि ब्राह्मण वेगळे असें जे समजतात त्यांस ब्राह्मण दूर करतात. ( ब्रह्म तं परादद्याद्योऽन्यत्रात्मनो ब्रह्म वेद. बृ. ४, ५, ७ ) क्षत्रिय

वेगळे व आपण वेगळे असें जे समजतात त्यांस क्षत्रिय वेगळे समजतात (क्षत्रं तं परादद्यायोऽन्यत्रात्मनो क्षत्र वेद. बृ. ४, ५, ७) आणि लोक वेगळे व आपण वेगळे असें जे समजतात त्यांना लोक दूर करतात!' आणि आज हिंदु समाजाचें काय झालें आहे? ब्राह्मण–ब्राह्मणेतरवाद हा काय आहे? मी ब्राह्मण, तूं मराठा, मी परभू, तू लिंगायत, मी स्पृश्य, तूं अस्पृश्य अशा संकुचित जातिनिष्ठ स्वार्थांधतेमुळे त्या विशाल व भव्य हिंदु समाजाचे जातिशः पटलेले लहान मोठे खंड पाहून विचारी हिंदूंचें काळीज करपून व दडपून जात नाहीं काय? ही जातिनिष्ठ स्वार्थांधता आज हिंदूचे प्राण हिरावून घेण्यास बसली आहे, हे आम्हांस समजूं नये म्हणजे मोठें आश्चर्य म्हणावयाचें! आतां याला उपाय म्हणजे एकच आणि तो म्हणजे याज्ञवल्क्य महर्षि सांगतात त्याप्रमाणे 'इदं ब्रह्मेद क्षत्रमिमे लोका इमे देवा इमानि भूतानीद सर्वं यदयमात्मा' या वचनाचें प्रत्येकानें मनन करणें, व ते कृतींत आणणें हा होय. आमच्यांत कितीही भेद, कितीही पंथ, कितीही भाडणें असलीं तरी राष्ट्रहिताकडे पाहतांना आम्ही सर्वांनीं मिळून सर्व भेद बखेडे विसरुन कौरव-पांडवाप्रमाणें 'वयं पंचोत्तर-शतम्' या दिव्य दृष्टीनेंच, या श्रेष्ठ पारमार्थिक दृष्टीनेंच, पाहावयास शिकलें पाहिजे आणि त्याप्रमाणें तुम्ही पाहावयास शिका, असा योगीश्वरांचा आग्रह-पूर्वक उपदेश आहे. त्याचा जर आज आम्ही अव्हेर करूं तर हिंदूंचें भविष्य अगदीं ठरलेलेंच आहे' तें सांगण्यास मग प्रत्यक्ष भास्कराचार्यच कशाला हवेत? हा याज्ञवल्क्यांनीं हिंदूसाठीं घालून दिलेला पारमार्थिक दिव्य धडा किती मार्मिक व व्यापक व पथ्यकर आहे बरें! त्याचा अव्हेर करुन, हिंदूंनो, तुम्ही काय मिळविणार आहात?

---

## जनकसभेंत

जोंपर्यंत वैदिक वाङ्मय जिवंत आहे तोंपर्यंत पुण्यश्लोक जनकराजाचें नावहि पण अजरामर असणारच. ते पुण्यात्मे नीतिनिपुण तर होतेच. पण त्यांचा जो लौकिक आहे तो त्यांच्या राजनीतीविषयीं नसून वैदिक धर्माचा प्रमुख पुरस्कर्ता म्हणून. जनकांनीं अनेक लहान मोठे यज्ञ केले आणि मोठमोठ्या

भरवून त्यांत तत्त्वज्ञानविषयक प्रौढ व गंभीर चर्चा केली व करविली. त्यांच्या उत्तेजनानें व दीर्घ प्रयत्नानें वैदिक तत्त्वज्ञानवृक्ष चांगलाच फोफावला, इतकेंच नव्हे तर त्याचीं मनोहर व मधुर फळें मुमुक्षूंस आजमितीसहि चाखावयास मिळत आहेत. हे काय त्यांचे लहानसहान उपकार? या पुण्यश्लोक राजाचा वैदिक अनुयायांनीं जयजयकार करावा तेवढा थोडाच आहे.

या राजर्षीची ज्ञानलालसा मधून मधून उचंबळत असे. अशीच ती एकदां उचंबळून आली. जनमेजयराजे नुकतेच दिवंगत झाले होते व वैशंपायनांची मंडळी शांत झाली होती. सर्व विद्वान ऋषींची एक मोठी सभा बोलावून, तींत ब्रह्मज्ञानाविषयीं करून व खूप चर्चा करावी असें त्यांच्या मनांत भरल्यावरून तत्कालीन कुरुपांचालादि देशांतील कसलेल्या व नांवाजलेल्या थोर थोर विद्वान आचार्यांस यज्ञाच्या मिषानें निमंत्रण पाठविलें. यांत त्यांचा अंतस्थ हेतु हा कीं, या सभेंत ब्रह्मज्ञानाविषयीं चर्चा करवून त्यांत श्रेष्ठ कोण ठरेल त्याजकडून ब्रह्मोपदेश घ्यावयाचा. हा त्यांचा हेतु बाहेर कोणास कळविलेला नव्हता. पुढें आमंत्रणाप्रमाणें सर्व निमंत्रित ऋषिमंडळी जनकराजाच्या सभागृहीं उपस्थित झाली. अर्थात् याज्ञवल्क्यही तेथें असणारच हें अगदीं उघड आहे.

सभागृहीं सर्व मंडळी जमल्यावर जनक राजे त्यांना उद्देशून म्हणाले कीं, "अहो ऋषींनो, वांसरांसहित एक हजार गाई सुवर्णमंडित शिंगांसह मी तयार ठेविल्या आहेत. तर जो कोणी तुमच्यांत ब्राह्मण श्रेष्ठ असेल त्यानें त्या खुशाल वळवून न्याव्या." (बृहदारण्यक अ. ३, ब्रा. १)

हें भाषण ऐकून तेथें जमलेले सर्व ऋषी आपआपसांतच एकमेकांकडे पाहूं लागले. तेथें जमलेले सर्वच ब्राह्मणश्रेष्ठ असतां 'मीच तेवढा ब्राह्मणश्रेष्ठ' असें छातिठोकपणानें भरसभेंत उठून सांगणें म्हणजे इतर ऋषींचा धडधडीत अपमान करण्यासारखेंच होय असें जो तो मनांत समजून कोणीहि पुढें येण्यास धजेना. जिकडे तिकडे अगदीं सामसूम! हूं नाहीं कीं चूं नाहीं! याप्रमाणें एक क्षण लोटला, दोन लोटले, घटिका गेली; तरी जिकडे तिकडे शांतताच. राजे हात जोडून तसेच उभे. याज्ञवल्क्यांनीं हा प्रकार पाहिला. कोणी पुढें येत नाहीं असें पाहून शिष्याला हाक मारून सांगितलें कीं,

'अरे सामश्रवा, जा आणि गाई पळव!' तो याज्ञवल्क्यांचा हुकूम विचारतां काय? सामश्रव उठला आणि तडक गाईंकडे निघाला. ( बृ. अ ३ ब्रा. १–२ )

इतका वेळ पुतळ्याप्रमाणे शांत व स्तब्ध बसलेल्या ऋषिमंडळांत आतां हळूच कुळकुळ सुरू झाली. याज्ञवल्क्य एकटेच गाई पळवितात हें पाहून त्यांचा धीर सुटला. " काय, काय, याज्ञवल्क्य तेवढेच ब्राह्मणश्रेष्ठ? आणि आम्ही? आम्ही कोण? आम्ही काय गुराखी? पाहूं, पाहूं बसे काय गाई पळवतात ते. दोन हात केल्यशिवाय आम्ही असे थोडेच त्याना हार जाणार आहों " अशी जिकडेतिकडे एकच आरडाओरड सुरू झाली. इकडे याज्ञवल्क्य तरी कांहीं कमी खंबीर नव्हते. प्रत्यक्ष सूर्यनारायणाचे पट्ट शिष्य! आणि तशांत सरस्वतीचा पूर्ण वरप्रसाद! मग अशा धाकाला ते असे थोडेच भीक घालणार? प्रसंग ओळखला आणि झटकन् त्यांनींहि कंबर बांधली!

हा सर्व विलक्षण प्रकार पाहून जनक राजे स्तंभितच झाले. केलें एक आणि हे झालें भलतेंच. ब्रह्मवृंदांमध्यें माजलेली ही धंदाळी पाहून ते मनांत जरा घाबरल्यासारखे झाले होते. तरी प्रसंगावधान धरून तेथें हातघाईवर आलेल्या मंडळीस हात जोडून शांतपणें विनंती केली कीं, "महाराज, आपण थोर ब्रह्मनिष्ठ म्हणवितां, आणि हे आरंभिलें आहे तरी काय? अशानें या प्रश्नाचा उलगडा होईल असें कां आपणांस वाटतें? आपण आपलें उदात्त शील विसरून सामान्य माणसांप्रमाणें हातघाईवर आलां तर काय म्हणू मी याला? ब्राह्मणहो, शांत व्हा सारे बसा. आणि आपल्यांत ब्रह्मिष्ठ कोण आहे याबद्दल वाद असेल तर त्याविषयीं शांतपणें चर्चा करून काय तो निर्णय लावून घ्यावा, हे बरें दिसत नाहीं काय? या माझ्या नम्र सूचनेचा विचार होणार नाहीं काय?" असें बोलून ते स्तब्ध झाले. जनकाची ही सूचना सभेंत सर्वांना पटली आणि आपल्यात ब्राह्मणश्रेष्ठ कोण हे ठरविण्यासाठीं वाद करण्यास ते तयार झाले. याज्ञवल्क्य एकटेच एका बाजूला आणि इतर सर्व तत्त्वज्ञानी एका बाजूला असे पक्ष होऊन चर्चेस प्रारंभ झाला. या सभेंत विदुषी स्त्रियांनींहि भाग घेतला होता हे येथें मुद्दाम सांगून ठेविलें पाहिजे.

जनकराजे हे विद्याव्यासंगी असल्यामुळे त्यांच्या दरबारांत चांगली, कसलेली विद्वान मंडळी उपस्थित होती. आश्वलायन शाखेचे प्रवर्त्ते शाकल्य,

जनकांचे पुरोहित अश्वल, प्रत्यक्ष याज्ञवल्क्यांचे गुरु उद्दालक आरुणि, प्रख्यात विदुषी गार्गी, वाचक्नवी वगैरे वगैरे एकापेक्षां एक वरचढ अशी विद्वान मंडळी याज्ञवल्क्यांबरोबर वादविवाद करण्यास पुढें सरसावली. काय वर्णावी त्या महासभेची थोरवी? जनकराजांचा दरबार, विद्वान आचार्यांची महासभा, आणि तत्त्वज्ञानावर वादविवाद! तेथें प्रत्यक्ष सरस्वतीच अवतरली होती असें म्हटल्यास त्यांत अतिशयोक्ति मुळींच होणार नाहीं. तेथें जी ज्ञानचर्चा झाली तशी पुनः आजपर्यंत क्वचितच झाली असेल. असो.

---

## लढाईस तोंड लागलें

प्रथम जनकांचेपुरोहित अश्वल यांजकडून चर्चेस तोंड फुटलें. त्यांनीं मृत्यु, मुक्ति, हवन, आहुति व इतर याज्ञिक कृत्यांसंबंधीं बरेच प्रश्न विचारले आणि याज्ञवल्क्यांनीं त्या सर्वांना समर्पक उत्तरें देऊन त्यांना निरुत्तर केलें. (बृ. अ. ३ ब्रा. १) नंतर जरत्कारव आर्तभाग पुढें आले. त्यांनीं ग्रहांसंबंधीं कांहीं प्रश्न विचारून, शेवटीं मनुष्य मेला म्हणजे कोठें जातो हा प्रश्न केला. त्याला याज्ञवल्क्यांनीं 'कर्माप्रमाणें त्यास गति प्राप्त होते' हा कर्मसिद्धांत सांगितला आणि तो आर्तभागास पटल्यामुळें ते पुढें नरम पडले. नंतर लह्याचा पुत्र भुज्यु हा आला. हा वैशंपायनांचा शिष्य. स्वारी मोठ्या उत्साहानें पुढें आली आणि त्यानें परिक्षितीचा मुलगा मृत जनमेजय आतां कोठें गेला म्हणून प्रश्न टाकला. लागलीच याज्ञवल्क्यांनीं 'अश्वमेध करणारे कोठें जातात तेथें म्हणजे वायुलोकाप्रत गेला' असें सांगितलें. झालें, या एका उत्तरानेंच स्वारी नरम पडली आणि अधिक प्रसंग करण्याचे भानगडींत न पडतां तेथून हळूच पाय काढला. (बृ. अ. ३ ब्रा. ३)

नंतर चक्राचा पुत्र उषस्त्य पुढें आला आणि आत्म्याविषयीं विचारूं लागला. याज्ञवल्क्यांनीं थोडक्यांतच त्याची पूर्ण समजूत घातली. तो मागें सरला. त्याच्यानंतर कहोल पुढें आला पण तोही लवकरच परत फिरला. (बृ. अ. ३ ब्रा. ४ व ५)

---

## गार्गी-उद्दालकांचा भडिमार

आतां आले उद्दालक आरुणि. प्रत्यक्ष याज्ञवल्क्यांचे गुरुदवत! तत्त्वज्ञानाचे शिरोमणि! प्रसंग मोठा आणीबाणीचा, पण आतां इलाज काय? वैदिक लोकांची कर्तव्यजागृति मोठी वाखाणण्यासारखी खरी. कर्तव्यक्षेत्रांत कोणी जरी आडवा आला तरी त्याच्याशी नातेंगोतें विसरून दोन हात करण्याची त्यांची तेजस्वी परंपरा मोठी वर्णनीय आहे. धनुर्धारी अर्जुन हा द्रोणाचार्यांचा पट्ट शिष्य. पण कुरुक्षेत्रावर दोघांची जेव्हां गांठ पडली तेव्हां अर्जुनानें गुरूचें पवित्र नातें विसरून, त्यांच्याशी भयंकर रणसंग्राम गाजविला नाहीं काय? पितृआज्ञा होतांच परशुरामानें तर प्रत्यक्ष आपल्या जन्मदात्या माउलीचें मस्तकच उडवून दिलें! केवढी जाज्वल्य कर्तव्यनिष्ठा! आतां येथेंहि याज्ञवल्क्यांना खुद्द आपल्या गुरुदेवतेबरोबरच संग्राम करण्याचा प्रसंग आला. पण करणार काय? प्रसंगाला तोंड देणें हें वीराचें कर्तव्यच आहे. तेथें पाय मागें घेऊन कसें चालेल? आतां प्रत्यक्ष गुरुशिष्यांतच भयंकर रण माजलें!

याज्ञवल्क्य आतां प्रत्यक्ष गुरुदेवांबरोबरच लढण्यास तयार झाले. अर्थात् दोघांचेंहि तुमुल वाग्युद्ध जुंपलें. उद्दालकांनी विचारलें की "हा लोक, परलोक, आणि सर्व प्राणिमात्र एकत्र ओवले गेले आहेत तें सूत्र कोणतें?" याज्ञवल्क्यांनीं उत्तर दिलें कीं, "तें सूत्र म्हणजे वायु होय." हें उत्तर गुरुजींना पटलें. पुनः त्यांनीं प्रश्न टाकला कीं "हा लोक, परलोक, आणि सर्व प्राणिमात्र यांच्यामध्यें राहून जो या सर्वांचें नियमन करतो तो अंतर्यामी आत्मा तूं जाणतोस काय? याज्ञवल्क्या, याचें उत्तर न देतां जर तूं गाई नेशील तर तुझें मस्तक तुटून पडेल!" "होय," शिष्य म्हणाला, "तो आत्मा मी जाणतों. उद्दालक मुने, जो पृथ्वी, अंतरिक्ष, वायु, द्युलोक, आदित्य, दिशा, चंद्र, तारका, आकाश, अंधःकार, तेज, सर्व प्राणि जात, प्राण, वाचा, चक्षु, श्रोत्र, मन, त्वचा व बुद्धि या सर्वांच्यामध्यें व आंत राहतो पण ज्याला मात्र पृथ्वी, अंतरिक्ष, वायु वगैरे कोणीच जाणत नाहींत, वरील सर्व वस्तु हें ज्याचें शरीर आहेत आणि या सर्वांच्या आंत राहून जो त्यांचें नियमन करतो असा तो हा तुमचा मृत्युरहित आत्मा अंतर्यामी आहे. हा आत्मा अदृष्ट असून पाहणारा आहे,

अश्रुत असून ऐकणारा आहे, अमत असून मनन करणारा आहे आणि अज्ञात असून जाणणारा आहे! याहून दुसरा द्रष्टा नाहीं, श्रोता नाहीं, मंता नाहीं आणि विज्ञाताही नाहीं. हा आत्मा, गुरुजी, तुमच्या अंतःकरणांत असून तो अमर आहे! याशिवाय इतर सगळें नाशवंत होय!" हें उत्तर ऐकून उद्दालकांच्या तोंडाला कुलुप पडलें आणि अखेर याज्ञवल्क्यांचा जय झाला!! (बृ. अ० ३, ब्रा. ७)

आतां आली गार्गी वाचक्नवी! प्रसिद्ध ब्रह्मवादिनी!! ही स्त्री खरी पण विजेप्रमाणें ती चमकत होती. ती म्हणजे मूर्तिमंत ज्ञानाची दिव्य पुतळीच. ब्रह्मविद्येंत ती अत्यंत निष्णात. याज्ञवल्क्यांसारख्या अतिरथीबरोबर ती भर सभेंत दोन हात करावयास एकदां नव्हे, तर दोन वेळां सरसावून पुढें आली. एवढ्यावरूनच तिचें ज्ञानसामर्थ्य केवढें प्रचंड व अद्भुत असलें पाहिजे याची वाचकांनीच कल्पना करावी. मोठमोठ्या पंडितांना कोठें चुटकीसरशीं, कोठें हां हां म्हणतां, केव्हां घटकेंत तर केव्हां अर्ध घटकेंत योगीश्वर चीत करून मागें टाकीत असत; पण ही महामाया मात्र त्यांना मोठी तिखट भेटली हें कांहीं खोटें नाहीं. याज्ञवल्क्यांशीं झुंज खेळण्यास वादक्षेत्रांत ती दोन वेळां पुढें आली यावरून तिची योग्यता व वादकौशल्य चांगलें व्यक्त होतें. उद्दालक आरुणींच्या आधीं व नंतर तिनें यांच्याशीं घनघोर रणसंग्राम माजविला. सूक्ष्म व खोंचदार प्रश्नांचा तीक्ष्ण बाणांप्रमाणें प्रतिस्पर्ध्यावर भडिमार करून तिनें त्यांचा चांगलाच समाचार घेतला.

याज्ञवल्क्य म्हणूनच निभावले. दुसरे कोणी असते तर; तर काय?— तिच्यापुढें नारळ ठेवून नाक घांसावयाचीच पाळी! योगीश्वरांना मिरचीसारखी ती चांगली झणझणीत झोंबली. तिच्या सूक्ष्म व खुबीदार प्रश्नांना उत्तरें देतां देतां ते अगदीं मेटाकुटीस आले होते असेंच कां म्हणाना! प्रश्नांचा भडिमार करून तिनें त्यांना बरेंच जर्जर केलें होतें. ब्रह्मर्षि खरे, पण करतात काय? हिच्यासारखा प्रतिस्पर्धी त्यांना साऱ्या जन्मांत भेटला नव्हता! एकामागून एक असे खुबीदार व खोंचदार प्रश्न करून त्या विदुषीनें त्यांना क्षणभर चांगलेंच पेचांत धरलें होतें हीं गोष्ट मात्र अन्यथा नाहीं. हा गार्गी-याज्ञवल्क्य संवाद आजमितीसही वाचनीय व मननीय आहे. तिनें विचारलें कीं, "हें जग, उदक,

वायु, अंतरिक्ष, गंधर्वलोक, आदित्यलोक, चंद्रलोक, नक्षत्रलोक, देवलोक, इंद्रलोक, प्रजापतिलोक कशांत ओतप्रोत आहे ?" त्याला योगीश्वर उत्तरले कीं, हे सर्व लोक पूर्व पूर्व लोक उत्तरोत्तर लोकांत ओतप्रोत असून शेवटीं सर्वांचा ब्रह्म लोकांत अंतर्भाव होतो हे उत्तर ऐकून ती क्षणभर नरमली व मागें सरकली पुढें उद्दालक निघून गेल्यावर पुन तिला स्फूर्ति आली आणि पुन तिनें त्याच्याशीं वाद केला या खेपेस तिनें विचारलें कीं, जे द्युलोकाच्या वर आहे, जें पृथ्वीच्या खालीं आहे, जें द्यावापृथिवीच्यामध्यें आहे, ज्याला भूत, वर्तमान व भविष्य म्हणतात तें कशामध्यें ओतप्रोत आहे ? ' याज्ञवल्क्यांनीं सांगितलें कीं "तें आकाशांत ओतप्रोत आहे ' "आणि आकाश कशांत ओतप्रोत आहे ?" असें तिनें पुन विचारलें त्याचें उत्तर त्यांनीं 'ब्रह्मांत" म्हणून सांगून पुढें तें ब्रह्म क्षयरहित आहे, अस्थूल आहे, अनणु, अह्रस्व, अदीर्घ, अप्रकाश, अस्नेह, छायारहित, तमोरहित, वायुरहित, आकाशरहित, संगरहित, रसरहित, गंधरहित, चक्षुरहित, श्रोत्ररहित, वाणीरहित, मनरहित, तेजरहित, प्राणरहित, मुखरहित, मात्रारहित, अंतर्बाह्य आहे, असें त्या ब्रह्माचें लक्षणही सांगितलें आणि पुढें या अक्षर ब्रह्माच्या नियंत्रणानें निर्माण केलेले चंद्र, सूर्य नियमानें वागतात, त्याच्याच नियंत्रणानें ही द्यावापृथिवी स्थित आहे, हा काळ स्थित आहे, असें सांगून जो या अक्षर ब्रह्माला न जाणता हवन करतो, यज्ञ करतो, तप करतो, त्याचें तें सर्व कर्म व्यर्थ आहे आणि याचें ज्ञान करून न घेतां जो मरण पावतो तो कृपण होय असें शेवटीं सांगून टाकलें याज्ञवल्क्याचें हे प्रखर तेज पाहून गार्गी निस्तेज पडली आणि अखेरीस तिनें त्यांस नमस्कार केला आणि तेथें जमलेल्या ब्राह्मणांस ती म्हणाली, 'आचार्यहो, याज्ञवल्क्यास मुकाट्यानें नमस्कार करा आणि अगून मोकळे व्हा ! वादांत त्यांना जिंकण्यास तुमच्यांत कोणीहि समर्थ नाहीं !"( बृ अ ३ ब्रा ६ व ८ )

झालें ! हें भाषण ऐकून, तेथील सर्व लोक थिजून गेले त्यांची तोंडें चिमणीप्रमाणें म्लान झालीं तोंडचें पाणी पळालें अंत करणांत कालवाकालव सुरू झाली डोळ्यांसमोर निराशेचे काजवे चमकू लागले आपण खास हरलों असें मनांत समजून जो तो खिन्न झाला आणि सभेमध्यें जिकडे तिकडे स्मशान-शांतता पसरून राहिली

---

# एक चमत्कार

इतक्यांत आश्वलायन शाखेचे प्रवर्तक विदग्ध शाकल्य–यांना पुराणांत देव-मित्र शाकल्य म्हटलें आहे–हे वादक्षेत्रांत उतरले. त्यांना पाहतांच त्या निश्चेष्ट पडलेल्या सभेंत पुनः थोडेंसें चैतन्य खेळूं लागलें. लोकांच्या तोंडावर स्मित-हास्य झळकलें, आशेचा मंद किरण पुनः अंतःकरणांत डोकावूं लागला आणि त्या सभेचा जीव जरासा खालीं पडल्यासारखा झाला. हे शाकल्यमुनि होतेच तसे बृहस्पति. हे वादक्षेत्रांत उतरतांच एकदम जिकडे तिकडे त्यांच्या नांवाचा जयजयकार गरजून गेला आणि सभा पूर्वीप्रमाणेंच पुनः उत्साह-भरित झाली. कोण त्या लोकांचा उतावीळपणा! याज्ञवल्क्यांचा नक्षा केव्हां उतरेल आणि त्यांचें काळवंडलेले तोंड पाहण्यास केव्हां मिळेल असें त्याला त्याला होऊन गेलें होतें.

शाकल्यांची विद्वत्ता मोठी दांडगी होती यावद्दल वाद नव्हता. आणि यामुळें सर्वांची खात्री ही कीं चुरुचुरु बोलणाऱ्या याज्ञवल्क्यांची आतां कांहीं धडगत राहिली नाहीं. शाकल्यांच्या तेजापुढें याज्ञवल्क्य काय टिकणार आणि काय जय मिळविणार? स्वारी लवकरच काळवंडणार असा समज करून घेऊन जो तो मनांत हुरळून गेला. आणि त्या मनोराज्यांत आनंदाच्या गिरक्या खात प्रत्येकजण उंच मान करून लक्ष्यपूर्वक वाद ऐकत बसला. प्रत्येकाची ही खात्री कीं याज्ञवल्क्य आतां खास हरणार!

आतां याज्ञवल्क्य व शाकल्य यांच्या दरम्यान खडाजंगी सुरू झाली. वाद चढतां चढतां मोठ्या भरांत चढला. हे शाकल्य म्हणजे मोठें दांडगें प्रस्थ. तत्त्वज्ञानांत त्यांचा लौकिकहि फार मोठा. याज्ञवल्क्यांस त्यांनीं पुष्कळ छेडलें व छळलें. इकडे योगीश्वर झाले तरी काय? तेहि चांगले कसलेले वीरच! सूर्यनारायणाचे कट्टे शिष्य आणि तशांत प्रत्यक्ष सरस्वतीच त्यांच्या जिभेंतून वाहत होती. मग या दोघांची सारखी सरबत्तीवर सरबत्ती लागून राहिली आणि हें पाहून विजयश्री श्रांत झाली! शाकल्यांनीं विचारलें, "देव किती?" याला याज्ञवल्क्यांनीं योग्य उत्तर दिलें. नंतर वसु, रुद्र, आदित्य यांसंबंधीं प्रश्न विचारले. त्यांचेंही उत्तर बरोबर दिलें. इंद्र व प्रजापतिसंबंधीं माहिती

विचारल्यावरून तीही सांगण्यात आली नंतर यज्ञाविषयीं थोडेंसें विचारल्यावर त्याचें उत्तर देऊन याज्ञवल्क्यानीं आता चढाईच धोरण स्वीकारलें. त्यानीं प्रथम पुरुषाविषयीं विचारून मग इतर प्रश्नाचा भडिमार केला आणि शेवटीं शाकल्यास म्हटल कीं, "हे शाकल्या, या ब्राह्मणानीं तुला विस्तव उचल ण्याचा जसा काही चिमटाच केला आहे!" या भाषणानें शाकल्य जरा गरम झाले आणि म्हणाले कीं, "याज्ञवल्क्या, ब्राह्मणाना तू असं टाकून बोलतोस तर तू तरी ब्रह्म जाणतोस काय? साग तर, पूर्व दिशेला तुझी देवता कोण आह ती?' याप्रमाणे शाकल्यानींही उलट प्रश्नाचा वर्षाव चालविला याज्ञवल्क्यानीं तो सगळा सहन करून पुन आपली प्रश्नमालिका सुरू केली आणि शेवटी उपनिषदातील पुरुषासंबंधीं एक प्रश्न टाकून वर बजावलें कीं "शाकल्या, या प्रश्नाच उत्तर जर तू न देशील तर तुझे मस्तक तुटून पडेल!" शाकल्यानीं या प्रश्नाच उत्तर तर दिलें नाहींच, उलट त्यानीं याज्ञवल्क्याची थट्टा मात्र केली पण चमत्कार हा कीं पुढे शापाप्रमाणे शाकल्याच मस्तक तुटून पडल!! "याज्ञवल्क्याचा जो कोणी अपमान करील त्याचें मस्तक तुटून पडेल!" असा वर सूर्यानं याज्ञवल्क्यास दिला होता आणि त्याची अम्मलबजावणी येथे अगदीं ततोतत झाली! (बृ अ ३ ब्रा ९, व आन्हिक चन्द्रिका पृ ३०७)

हा विलक्षण व अनपेक्षित प्रकार पाहून ती सभा हादरली! आणि तेथील लोकाची एकच गाळण उडाली जो तो मनातल्या मनात चपापल्यासारखा झाला! देवमित्र शाकल्यमुनीचा हा प्रकार पाहून आता याज्ञवल्क्यापुढे येऊन वादविवाद करण्यास जो तो मागें सरकू लागला याज्ञवल्क्यानीं काहीं वेळ वाट पाहिली व कोणीही आता पुढें येत नाहीं असें पाहून ते म्हणाल कीं, "अहो ब्राह्मणहो, तुम्ही सर्वजण मिळून अगर तुमच्यात जो कोणी तसा समर्थ असेल तो मला वाटेल तसला प्रश्न करा अगर करू दे मी त्याला उत्तर देतों आणि मीही तुम्हा सर्वांना मिळून अगर तुमच्यात माझ्या मर्जीला येईल त्यास वाटेल तो प्रश्न विचारतों, पण त्याला उत्तर मात्र मिळाले पाहिजे असेल कबूल तर हो म्हणा" असं म्हणून ते उत्तराची वाट पाहू लागले (बृ अ ३ ब्रा ९)

पण काय ? सगळी चित्राची सभा ! निर्जीव पुतळे ! मुक्याचें प्रदर्शन ! कोणी ब्र काढील तर शपथ ! ही जबाबदारी घेण्यास तेथील कर्मिमंडळ धजलें नाहीं. अर्थातच याज्ञवल्क्याचा जयजयकार झाला ! विजयश्रीनें त्याना माळ घातली ! सूर्यदेवाला धन्यता वाटली ! आणि सरस्वतीला हर्षवायु झाला ! जनक राजे आनंदानें डोलूं लागले ! ! आणि याज्ञवल्क्य त्या भूदेव सभेंत देवश्रेष्ठ ठरले ! ! ! जनक राजाच्या त्या हजार गाई त्या सवत्सवत्स सामश्रवान आश्रमाकडे वळवून नेल्या आणि योगीश्वराच्या धवलकीर्तीची नौबत चिकडे तिकडे झडूं लागली जनकराजानीं त्याचें तें अगाध व अमर्याद ज्ञानभांडार पाहून आश्चर्यानें चकित होऊन त्यास नमस्कार केला व पुढें ते त्याचे परम शिष्य बनले वरील सभेची सविस्तर हकीकत बृहदारण्यकांत आली असून ती मोठी मार्मिक व मननीय आहे ज्याला ती वाचावयाची असेल त्यानें खुद त्या ग्रथाकडेच धाव मारली पाहिजे असो.

याज्ञवल्क्य जनकसभेंत मोठमोठ्या तत्ववेत्त्यांशीं सामना करून अखेर विजयी ठरले आणि ब्राह्मणश्रेष्ठत्वाचा बहुमान पदरीं पाडला. हा विजय म्हणजे त्याच्या तत्वज्ञाननैपुण्याचा व विचारकौशल्याचा सुंदर कळसच होय ! आतापर्यंत त्यानीं कितीतरी लोकाबरोबर झुंज घालून प्रत्येक वेळेस प्रतिपक्षावर अप्रतिम जय मिळविला आणि अशा रीतीनें अद्वितीय व दुर्दमनीय कर्मवीर अशी दिगंत ख्याति संपादन केली त्याचा नक्षा उतरविण्यासाठीं वैशंपायनासारख्या, उद्दालक-शाकल्यासारख्या मोठमोठ्या अतिरथी-महारथी सारख्यानीं चंग बांधले, पण शेवटीं सर्वांना हार खाऊन तोंड खालीं घालण्याचा प्रसंग आला ! याचप्रमाणे पुढे झालें तरी त्याची उत्तरोत्तर भरभराट व कीर्ति वाढतच गेली त्याचा यशोनिधि शेवटपर्यंत सारखा उचंबळत होता त्याला ओहोटी म्हणून कधीं लागलीच नाहीं जसे ते यज्ञकर्मांत व तत्वज्ञानांत अग्रगण्य विजयी ठरले तसेच योगशास्त्रातही अत्यंत निष्णात असल्यामुळे त्याना योगीश्वर हा बहुमानहि मिळाला, यासंबंधीं हकीकत पुढे येणारच आहे

---

# उत्तरार्ध

## कु. मैत्रेयीची ओझरती ओळख !

कुमारी मैत्रेयी ही जनकराजाच्या मित्र नांवाच्या प्रधानाची मुलगी. ती अठरावीस वर्षांची होती तरी अजून अविवाहितच होती. प्रसिद्ध गार्गी वाचक्नवी ही तिची मावशी, म्हणजे तिच्या आईची बहीण, ही गार्गी आजन्म कुमारी होती. आणि यामुळे तिचें प्रेम या मैत्रेयीवर फार होतें. तिनेंच तिला वाढविली होती आणि जवळ ठेवून घेऊन विद्याभ्यास करविला होता. मैत्रेयी ही तरुण होती तरी स्वभावतःच वैराग्यशील व अध्यात्मप्रवण होती. मावशीजवळ राहून ती जवळ जवळ मावशीच्या वळणावरच गेली होती असें म्हटलें तरी फारसें बिघडणार नाहीं. विवाहाचा प्रश्न तिच्या मनांत उसळावा तसा जोरानें अद्याप उसळलेला नव्हता. तरी पण तिचा बाप मित्र प्रधान, तिला अनुरूप असा योग्य वर पाहण्याच्या प्रयत्नांत होता हें मात्र येथें सांगून ठेविलें पाहिजे.

जनकसभेमध्यें ही मैत्रेयी प्रत्यक्ष हजर होती. आणि आपल्या मावशी-जवळ बसून तेथील संवाद तिने संपूर्ण ऐकला होता. केवढें याज्ञवल्क्यांचे झगझगीत आत्मतेज तें ! मोठमोठे ज्ञानधुरंधर त्यांच्यावर मोठ्या आवेशानें चालून जात पण क्षणार्धांतच त्यांच्यापुढें पतंगाप्रमाणें पटापट पतन पावत ! मैत्रेयी हा प्रकार पाहून खरोखर स्तिमितच झाली होती. एवढे जनक राजे, पण ते सुद्धां स्तंभित होऊन गेले होते तेथें या अल्लड मुलीची मातब्बरी ती काय ?

याज्ञवल्क्य या वेळीं जवळ जवळ तीस बत्तीस वर्षांचे असतील नसतील. अर्थात् त्यांची तारुण्यकांति पौर्णिमेच्या प्रफुल्ल चंद्राप्रमाणें ताजी, टवटवीत व मनोहर दिसत होती. त्यांची अगाध विद्वत्ता, अलोट ज्ञानसामर्थ्य, अपार

वाक्चातुर्य, अपूर्व शरीरकांति, ती उल्हासित अंतःकरणवृत्ति, तो तेजस्वी चेहरा पाहून त्या तरुण व सुंदर मैत्रेयीला काय बरें वाटलें असेल? अविवाहित राहण्याची तिची इच्छा आता ठिकाणावर राहिली असेल काय? त्या विद्याप्रभावानें ती खरोखर दिपूनच गेली होती! गार्गी उद्दालकाचा त्याच्याशीं झालेला संवाद ऐकून तर ती भानच विसरल्यासारखी झाली. तिचें मन आता चलबिचल होऊं लागलं आणि शेवटीं शेवटीं ती त्याच्या पूर्ण अंकित झाली! याज्ञवल्क्यानीं त्या सभेंत वाग्युद्ध करून जसा इतर विद्वानांवर जय मिळविला होता तसाच त्यांनीं त्या तरुण मैत्रेयीच्या प्रेममुग्ध अंतःकरणावर मिळविला होता, निदान तिला तरी तसें वाटलें! (कात्यायनी आणि मैत्रेयी)

---

# योगीश्वरांवर एक संकट

जनकसभेच्या हकीकतीनंतरची थोड्याच दिवसांची गोष्ट. याज्ञवल्क्य पहाटेस उठून सहज बाहेर फिरावयास गेले होते. मिथिलानगरीच्या जवळच कांहीं अंतरावर एका बाजूस एक मोठें अरण्य होतें. फिरत फिरत ते त्या अरण्यात शिरले आणि एका टेकडीवर चढून उभे राहिले. पहाटेची वेळ. सूर्यनारायण नुकताच कोठें उदयगिरीवर डोकावूं लागलेला. पक्ष्यांच्या मधुर किलकिलाटानें आसमंतातील सगळा भाग भरून गेलेला. शीतल व सुगंध वायुराज मंद मंद वाहून मनाला उल्हासित करीत असलेला. अशा सुसमयास याज्ञवल्क्यास समाधि लावून बसण्याची लहर आली. आणि मग तेथें अवकाश कसला? जवळच एका सुंदर झाडाखालीं ते बसले आणि समाधि लावून तल्लीन झाले.

योगीश्वर आता समाधींत मग्न झाले होते. पण दुर्दैव हें कीं अशा वेळीं एका वाघाची नजर त्यांच्यावर पडली! वाघ म्हणजे तो वाघच! त्याला मनुष्यासारखं तारतम्य कोठून असणार? सावज दिसलें कीं झेपटी आपटलीच! याज्ञवल्क्यावर केवढें हें प्राणसंकट! जवळ तर कोणी नाहीं. आणि वाघ तर झडप घालण्यास टपून बसलेला! वाचकहो, त्या प्रसंगाची तुम्हींच कल्पना करा. हाय हाय! योगिराज आता वाघाच्या पोटात शिरणार काय!

इतक्यांत एक तीर सूं सूं करीत त्या वाघाकडे आला आणि नेमका त्याच्या नेत्रांत शिरून पार झाला! पुनः दुसरा एक तीर आला आणि त्याने दुसऱ्या नेत्राचा ठाव घेतला. पुढें दोन तीन बाण लागोपाठ आले आणि ते वाघाच्या पोटांत शिरून रुतून बसले. वाघानें मोठी किंकाळी फोडली आणि अंतकाळच्या असह्य वेदनांमुळें तो सैरावैरा धांवत सुटला. त्याला आतां मार्गाचें भान राहिलें नाहीं आणि तो वाट सांपडेल तिकडे धांवत अरण्यांत निघून गेला. याज्ञवल्क्यांचें पुण्य मोठें आणि म्हणून ते या प्राणसंकटांतून निभावून गेले!

वाघाची ती भयंकर किंकाळी ऐकून योगीश्वरांची समाधि भंग झाली. डोळे उघडून पाहतात तों पुढें मित्र प्रधान उभे आणि त्यांच्या मागें दोन क्षत्रिय वीर धनुष्यबाण घेऊन हळूच चालत येत होते. याज्ञवल्क्य आनंदित झाले आणि त्यांनीं आपले प्राण वांचविल्याबद्दल कृतज्ञतापूर्वक त्या त्रिवर्गाचें अभिनंदन केलें. नंतर सर्व मिळून नगराकडे परत आले. (कात्यायनी आणि मैत्रेयी)

---

## घरोबा वाढला

या दिवसापासून मित्र प्रधानजींचा व योगीश्वरांचा घरोबा वाढत चालला आणि यामुळे कात्यायनी व मैत्रेयी यांच्यांत सख्य जुळत चाललें. कात्यायनी ही मैत्रेयीपेक्षां मोठी होती हें जरी खरें असलें तरी ती मैत्रेयीहून दोनतीन वर्षांनीच मोठी होती. अर्थात् दोघीहि जवळजवळ समवयस्कच होत्या. मैत्रेयी ही आतां नेहमीं कात्यायनीकडे येऊं जाऊं लागली आणि कात्यायनी झाली तरी वेळांत वेळ काढून मैत्रेयीच्या घरीं जात येत असे. दोघीहि तरुण, सुंदर व समवयस्क. मग त्यांच्यांत प्रेम व स्नेहवृद्धि कां होऊं नये? दोघींमधील सख्य आतां दिवसेंदिवस जोरावत चाललें. कात्यायनीला नाहीं म्हणावयाला एक मुलगा झाला होता. आणि तो तिचा जीव की प्राण होता, हें सांगण्याची आवश्यकता नाहीं.

कात्यायनी व मैत्रेयी या मैत्रिणीद्वयाचें चित्र रेखाटणाऱ्यांनीं तरी काय रेखाटावें ? कात्यायनीहि सुंदर आणि मैत्रेयीहि सुंदरच. मग कोणाचें लावण्य श्रेष्ठ म्हणून सांगावें ? कात्यायनी ही सुवर्णासारखी सुंदर वर्णाची असून अंगानें जरा स्थूल पण त्या मानानें उंचीत जरा ठेंगणी अशी होती. मैत्रेयी ही शरीरानें सडपातळ आणि म्हणून दिसावयास जरा उंच होती. दोघींचेंहि सौंदर्य त्या त्या मानानें रमणीयच होतें. एक लक्ष्मी तर एक सरस्वती! दोघीहि त्या त्या परीनें सुंदरच ! मग कोणाला चढवावें नि कोणाला उतरवावें ? निदान आम्हांस तरी हें कठीणसें झालें आहे. असो.

हें त्याच्या स्वरूपाविषयीं झालें. परंतु त्याच्या अंतःसृष्टीकडे पाहिलें म्हणजे तेथें मात्र पाहणाऱ्यास ठळक रीतीनें फरक दिसून येत होता. कात्यायनीचा ओढा सगळा संसाराकडे आणि मैत्रेयीकडे पाहावें तर तेथें विवेकाचा प्रकाश खुललेला. एकीला विषयसुखाची हौस फार तर दुसरीला वैराग्यवृत्तीनें राहण्याची आवड दांडगी ! एक संसारकृत्यांत मोठी दक्ष तर दुसरी एकांतांत राहून विचार करण्यांत मोठी तत्पर एकीचें मन कोमल तर दुसरीचें गंभीर! एक विकारवश तर दुसरी विचारवश! एक हौशी तर दुसरी उदासीन! एक मोठी उतावीळ, तर दुसरी अति शांत! एकीला कथागोष्टी ऐकण्याचा नाद तर दुसरीला तत्त्वज्ञान श्रवण करण्याचा छंद! पण दोघीहि प्रेमळ, उदार व सात्त्विक होत्या. याप्रमाणें त्या दोघींमध्यें विविध रूपगुणाचा साम्यविरोध दृष्टोत्पत्तीस येत होता.

---

## वरीन तर याज्ञवल्क्यच वरीन !

मैत्रेयी ही सुंदर, तरुण व विद्यामंडित होती, हें वर सांगितलेंच आहे. आणि ती किती जरी ज्ञानसंपन्न व विद्यामंडित असली तरी वयोमानानें तिच्या मनांत तारुण्यसुलभ प्रेमाचा उदय व्हावयाचा तो झालाच होता. फक्त एवढेंच कीं, तें प्रेम आंधळें व उच्छृ नव्हतें. त्याला विवेकाचें कोंदण पडलें होतें. तिचा चेहरा गुलाबाप्रमाणें मोहक होता तरी त्यांत सात्त्विक वृत्तीची व सौजन्याची मधुर झांक मारत होती. तिला सुखाची इच्छा होती. पण तें सुख सर्वस्वीं विषयपंकांतच रुतून बसलेलें नव्हतें. तिला ऐषआराम पाहिजे होता. म्हणून

ती आलसप्रिय होती असा त्याचा अर्थ नव्हे. तिला पतीची आवड होती, पण त्यामुळें जाणाऱ्या येणाऱ्या पुरुषावर तिची नजर ठरत होती, असा त्याचा भाग नव्हता. थोडक्यांत म्हणजे तारुण्यसुलभ मधुर भावनांचा तिच्या मुग्ध अंतःकरणांत मंगलोदय झाला होता तरी आधुनिक मोहक ' नवनीती 'च्या भडक कल्पनेमुळें बेफाट वहकून गेलेल्या नवशिक्षित अल्लड तरुणीप्रमाणें ' हृदयाच्या हांकें'ला ओ देऊन ' बंधनाच्या पलीकडे ' अथवा ' अटकेपार ' जाऊन आपली क्षणभंगुर तहान भागविण्यास ती तयार नव्हती. अल्लड हृदयाची मंजुळ हांक म्हणजे नाजूक विद्युल्लतेची चंचल चमक, अशी तिची पक्की समजूत असे. तिच्या सर्व मधुर भावना क्षणिक विकारतंत्र नसून त्यांसभोंवतीं विनय व विचार यांचें सुंदर कोंदण विलसत होतें. तिच्या हृदयांतील हृदयांत आणखी एक देवता होती. त्या विवेकदेवतेला कौल लावूनच काय करावयाचें तें ती करी. आर्यस्त्रियांची थोरवी म्हणतात ती हीच! पण दुर्दैवानें आज आमच्या नवशिक्षित स्त्रियांना तिचा विसर पडत चालला आहे, ही केवढ्या दुःखाची गोष्ट ! असो.

विष्णूला जशी लक्ष्मी अथवा शंकराला जशी पार्वती, तशी याज्ञवल्क्यांना कात्यायनी होती. त्यांचा संसार म्हणजे आतां खरोखर दृष्ट लागण्यासारखा होता. प्रत्यक्ष स्वर्गहि तेथें लाजावा ! मग मैत्रेयीनें तिची सवत होण्याची इच्छा करणें म्हणजे त्या सोन्यासारख्या सुंदर संसारांत जाणूनबुजून माती कालविण्यासारखेंच नव्हे काय ? निदान तसा त्याचा अर्थ तरी होत नाहीं काय ? छे छे ! ती गोष्ट याज्ञवल्क्य तरी कशी कबूल करतील ? आणि ती सूचना त्यांना करण्याची अशी छाती तरी कोणाची ? 'कात्यायनीला सवत करा' असें सांगणें म्हणजे त्यांच्या घराला कायमचा रामराम ठोकणें, अशापैकींच तें होय. पण असें धाडस कोण करणार ? तशांत मित्र प्रधान म्हणजे कांहीं कमरेचें सोडून डोक्याला गुंडाळलेले नव्हते. ते चांगले विचारी व मोठे विद्वान् होते. त्यांचा व याज्ञवल्क्यांचा मोठा स्नेह व घरोबा होता. आणि शुक्लयजुर्वेद तयार करण्यांत त्यांची त्यास मोठी मदतहि झाली होती, हें सगळें खरें. शिवाय अरण्यांत त्यांनीं त्यांचे प्राण वांचविले होते, हेंहि कांहीं खोटें नाहीं. पण मैत्रेयीच्या लग्नाची बाब अशी कांहीं नाजूक व विलक्षण होती कीं, तिचा याज्ञ-

वल्क्यांपुढे उघार करणें म्हणजे एक मोठें पापच होतें. मित्र प्रधानजींना तर हें कसेंसेच दिसलें ! कात्यायनीचा सुखद व सुंदर संसार ते नित्य डोळ्यांनीं पाहत असत. मग आपल्या लाडक्या मुलीला तिच्या छातीवर नाचवा म्हणून त्यांनीं तरी योगीश्वरांजवळ आतां कोणत्या तोंडानें म्हणावें ? हा न्याय झाला काय ? याला नीति म्हणावें काय ? त्यांना 'माझी मैत्रेयी पदरांत घ्या' असें सांगणें म्हणजे त्या सुसूत्र व सुरळीत चाललेल्या सुंदर रथाला मध्येंच खीळ ठोका, असें स्पष्ट सांगून टाकण्यापैकींच नव्हे काय ?

मैत्रेयीचा हा हट्ट सफल होण्याची त्यांना आशा दिसली नाहीं. म्हणून याची तिला नीट कल्पना आणून द्यावी आणि तिचें मन या दुराग्रहापासून परावृत्त करून पाहावें, असा विचार करून त्यांनीं तिची एक दिवस एकांतांत भेट घेतली आणि तिला सर्व परिस्थिति नीट समजावून सांगितली. बापाचें अंतःकरण तें ! मुलगी उपवर झाली म्हणजे तिचे दोन्हींचे चार हात होईतोंपर्यंत रात्रंदिवस तें कसें तिळतिळ तुटत असतें, हें, जावे त्याच्या वंशा तेव्हां कळे ! मित्र प्रधानजीस आतां खरोखर रात्रंदिवस चैन नसे. ते सारखे मनांतून झुरणीस लागले होते. त्यांनीं मुलीला प्रेमानें जवळ बोलाविली आणि म्हटलें कीं, 'मुली, याज्ञवल्क्यांची पत्नी होण्याचा हा आग्रह सोड. ही तुझी इच्छा सफल होण्यासारखी नाहीं. तुला पाहिजे तर दुसरें उत्तम स्थळ पाहून देईन. पण हा आग्रह मात्र धरूं नकोस. मग पाहूं ना दुसरीकडे ?'

पण मैत्रेयी ती मैत्रेयीच ! तिनें मनांत एकदां निश्चय केला तो केलाच ! आतां पुनः तो फिरविणें हें कालत्रयींहि शक्य नव्हतें. तिची महत्त्वाकांक्षा मोठी दांडगी होती हें खरें, आणि ती पूर्ण होणें जवळ जवळ अशक्यच होतें, हेंहि ती नीट ओळखून होती. पण कसेंहि असलें तरी तिला लग्न करावयाचें होतें, तें फक्त याज्ञवल्क्यांशींच ! नाहीं तर आपल्या मावशीप्रमाणेंच कडकडीत कुवारपणा पत्करून आनंदानें आत्मविचारांत सगळा जन्म काढावयाचा, असें तिनें पक्कें ठरविलें होतें. आर्यस्त्रियांचा बाणेदारपणा म्हणतात तो हा ! थिल्लर हृदयाच्या चंचल लहरीवर प्रेमशोधनार्थ मोकाट वाहवत जाण्यापेक्षां शांत व स्थिर विवेकाच्या गूढ व मंगल कूजनावरच त्या अधिक लुब्ध असत ! त्यांची दृष्टि तात्पुरतिक भावनातृप्तीवर नसून ती शाश्वत परिणामावर अधिक असे.

ज्यांचें कोमल अंतःकरण व पवित्र शरीर सदैव शुद्ध व निर्दोष राखण्यास त्या जिवापाड जपत असत ! आणि या दिव्य भावनेच्या जोरावर सीता, सावित्री, द्रौपदी इत्यादि थोर व चारित्र्यसंपन्न तरुण आर्यमहिला प्रसंग-विशेषीं भयंकर दिव्य करून इतिहासांत आजपर्यंत अजरामर होऊन राहिल्या आहेत ! ज्यांची पवित्र आठवण आज पांच हजार वर्षें सतत टिकून राहिली आहे आणि ज्यांचा पुण्यप्रभाव आज देखील सगळें जग एकाच सुरांत मोठ्या आवडीनें गात आहे, अशा स्वर्गीय शीलसंपन्न महिला या पुराणप्रसिद्ध भरतखंडाखेरीज व प्रभावी वैदिक धर्माव्यतिरिक्त अन्य देशांत व अन्य धर्मांत पाहावयास मिळूं शकतात काय ? ' अहल्या-द्रौपदी-सीता ' या पुण्य-मंत्रासारखा दिव्य मंत्र इतर धर्मांत कोठें तरी आढळून येतो काय ? नवनीतीच्या भारतीय पुरस्कर्त्यांनो, आमच्या भारतीय भगिनींचीं निष्पाप मनें काव्यमय कल्पनोद्यानांतील प्रणयकूजनाच्या सुरेल संगीतावर पापवृत्तीस प्रवृत्त करण्याच्या आधीं या प्रश्नास अगोदर उत्तर द्या आणि मग तुमच्या पुण्यश्लोक 'रसेल' ऋषीच्या नवनीतिप्रचुर पुराणपोथीची गांठ उकला !

कुमारी मैत्रेयीची गणना या करारी व सत्त्वनिष्ठ आर्यस्त्रियांमध्येंच केली पाहिजे. तिनें आपला निश्चय ध्रुवाप्रमाणें निश्चल ठेविला होता. मग तिची महत्त्वाकांक्षा सफल होवो अगर न होवो ! त्याची तिला दिक्कत नव्हती ! यांत तिला कात्यायनीशीं चुरस अगर हेवादावा मांडावयाचा नव्हता, कीं तिच्या सुखसोहाळ्यांत आडकाठी घालावयाची नव्हती. फक्त याज्ञवल्क्याची मनोभावें सेवाचाकरी करून प्रथम आपली ज्ञानलालसा आणि मग इतर हार्दिक मधुर आकांक्षा शक्य तों कात्यायनीस खूप ठेवूनच तृप्त करून घ्यावयाच्या होत्या. कात्यायनीचा स्वभाव व मन ती पूर्ण ओळखून होती. त्या सतीची बटीक होऊनहि तिच्या शेजारीं राहावयास ती विदुषी तयार होती. पण बापाच्या म्हणण्याला रुकार देऊन इंद्राचें साम्राज्य मिळालें तरी तें तिला नको होतें ! म्हणून तिनें बापास चक्क सांगून टाकिलें कीं, पिताजी, वरीन तर याज्ञवल्क्यच वरीन ! ! ही तिची स्पष्टोक्ति ऐकून बिचारे मित्र गारेगार झाले ! आणि निराश होऊन जड अंतःकरणानें पुढें कांहींएक न बोलतां आले तसे तेथून गुपचुप निघून चालते झाले ! ( हा मजकूर ' कात्यायनी व मैत्रेयी ' या मराठी ग्रंथाच्या आधारें घातला आहे. )

---

# कात्यायनीचें अपूर्व दिव्य!

ही कात्यायनी म्हणजे मोठी चाणाक्ष स्त्रीच म्हटली पाहिजे. मैत्रेयीनें आपलें अंतःकरण तिच्याजवळ प्रत्यक्ष उघडून दाखविलें नव्हतें, तरी तेथें कोणती भावना धुमाकूळ घालीत होती, हें तिला समजल्याशिवाय राहिलें नाहीं. 'तरुणीचें अंतःकरण तरुणीच ओळखूं शकते' म्हणतात, तें कांहीं खोटें नाहीं. आपल्या पतीवर तिची नजर आहे, हे त्या चाणाक्ष स्त्रीनें तेव्हांच ओळखलें. आणि एका प्रसंगीं बोलतां बोलतां गार्गीहि पण तशी स्पष्टच बोलूनहि गेली. आपल्या सौख्यपूर्ण सुंदर संसाराकडे पाहून ती गोष्ट आपल्या पतीजवळ काढण्यास कोणीहि धजत नाहींत, हेंहि तिला कळून आलें.

मैत्रेयीचा प्रेमळ स्वभाव व मधुर भाषण पाहून ही कात्यायनीहि फारच मोहित झाली होती. त्या दोघींचें प्रेम अलीकडे इतकें जुळलें होतें कीं, एकमेकींला सोडून राहणें म्हणजे त्यांच्या जिवावर येई. कात्यायनीजवळ मैत्रेयी, नाहीं तर मैत्रेयीजवळ कात्यायनी, अशी ही दुक्कल नेहमीं एकमेकींजवळ असलेली दिसावयाची. तशांत कात्यायनीला मैत्रेयीचें वेड फार लागलें होतें. नेहमीं ती जवळ असावी, तिच्याशीं बोलावें, तिचें गोड व उपदेशपर भाषण ऐकावें, असें तिला वाटूं लागलें. पण तें जुळावयाचें कसें, आणि जुळवणार तरी कोण? मैत्रेयीची ही करुणारव व असहाय स्थिति पाहून ती मनांत फार कळवळली आणि मनांतच तिनें कसला तरी बेत केला.

रात्रीची वेळ. चांदणें शुभ्र पडलेलें. आश्रमांत जिकडे तिकडे शांत व प्रसन्न वातावरण खुलून राहिलेलें. सुगंध फुलांनीं नखशिखांत नटलेल्या सुंदर वेलीं मंद वायुलहरींनें मधुर नृत्य करीत असलेल्या रजनीदेवी शुभ्रचंद्रिकेचें झिर-झिरीत पातळ नेसून विलासी जगाला मोहमुग्ध करीत असलेली अशा प्रशांत व प्रसन्न समयास योगीश्वर जेवणखाण आटोपून समोरच्या चौथरीवर व्याघ्रां-बर टाकून सृष्टिशोभा पाहात सहज एकटेच पडले होते.

इतक्यांत संधि साधून सती कात्यायनी तेथें आली, आणि येऊन शेजारीं उभी राहिली. तिला पाहून ते उठून बसले. आणि तीहि तेथेंच शेजारीं बाजूला बसली.

ती बसल्यावर ते म्हणालेः—पाहा ना हें चांदणं! किती शुभ्र पडलं आहे तें! मला वाटतं जिकडे तिकडे पीठच पीठ उधळलं आहे!

कात्यायनी समोंवतीं दृष्टि फिरवून म्हणालीः—खरंच बाई! फारच सुंदर चांदणं! अहाहा! काय छान देखावा!

याज्ञवल्क्यः—वा! छान म्हणून काय विचारतेस! अगदींच सुंदर! तीं वेलीचीं फुलं पाहा, कशीं हंसत आहेत तीं! केवढी मौज! सृष्टिसौंदर्य म्हणतात तें हें बरं का?

कात्यायनीः—अन् हा बाजूचा मोगरा. कसा अगदीं फुलानं बहारला आहे.

याज्ञवल्क्यः—अशोच ती पलीकडची जाई! कशी डौलानें नाचत आहे ती!

कात्यायनीः—अहाहा! काय मधुर! किती गोड!

याज्ञवल्क्यः—चंद्रकांत कुठं दिसत नाहीं. निजला आहे कीं काय?

कात्यायनीः—हं, ही अशोच आलें त्याला निजवून.

यावर याज्ञवल्क्य पुढें कांहीं बोलले नाहींत. आकाशाकडे दृष्टि वळवून ते चंद्राकडे व आकाशाकडे पाहूं लागले.

दोनचार क्षण लोटल्यावर पुढें तीच म्हणालीः—एक गोष्ट विचारावी म्हणतें, विचारूं ना?

याज्ञवल्क्यः—मग त्याला ज्योतिषी कां हवा हें सांगायला!

कात्यायनीः—(स्मितहास्य करून) थट्टा नाहीं ना करायची? हो, आधींच सांगायचं. नाहीं तर मग—

याज्ञवल्क्यः—(हंसून) आजचा रंग कांहीं निराळाच दिसतोय् अं. बरं, विचार काय विचारायचं तें.

कात्यायनीः—पहा, मला हिणवायचं होईल. मला मी नाहीं ऐकायची. आधीं सारं ऐकून घ्यायचं, हं हं म्हणायचं. अन् मग शेवटीं बाह्यबुद्धि तुमची—वेडी समजूत-असं नि तस्सं! मग नको सरबत्ती उडायला! हें पुरुषांचं नेहमीं अस्सं असतं.

# कात्यायनीचें अपूर्व दिव्य !

ही कात्यायनी म्हणजे मोठी चाणाक्ष स्त्रीच म्हटली पाहिजे मैत्रेयीनें आपलें अंत करण तिच्याजवळ प्रत्यक्ष उघडून दाखविलें नव्हतें, तरी तेथें कोणती भावना धुमाकूळ घालीत होती, हें तिला समजल्याशिवाय राहिलें नाहीं ' तरुणीचें अंत करण तरुणीच ओळखू शकते ' म्हणतात, तें कांहीं खोटें नाहीं आपल्या पतीवर तिची नजर आहे, ह त्या चाणाक्ष स्त्रीनें तेव्हाच ओळखलें आणि एका प्रसंगी बोलता बोलता गार्गीहि पण तशी स्पष्टच बोलूनहि गेली आपल्या सौंदर्यपूर्ण सुंदर संसाराकडे पाहून ती गोष्ट आपल्या पतीजवळ काढण्याम कोणीहि धजत नाहींत, हेंहि तिला कळून आलें

मैत्रेयीचा प्रेमळ स्वभाव व मधुर भाषण पाहून ही कात्यायनीहि फारच मोहित झाली होती त्या दोघींचें प्रेम अलीकडे इतकें जुळत होत कीं, एकमेकीला सोडून राहणं म्हणजे त्यांच्या जिवावर येई कात्यायनीजवळ मैत्रेयी नाही तर मैत्रेयीजवळ कात्यायनी, अशी ही दुकल नेहमी एकमेकींजवळ असलेली दिसावयाची तशात कात्यायनीला मैत्रेयीचें वेड फार लागल होतें नेहमी ती जवळ असावी, तिच्याशीं बोलावें, तिचं गोड व उपदेशपर भाषण ऐकावें असें तिला वाटू लागल पण तें जुळावयाचें कसें, आणि जुळवणार तरी कोण ? मैत्रेयीची ही करुणास्पद व असहाय स्थिति पाहून ती मनात फार कळवळली आणि मनातच तिनें कसला तरी बेत केला

रात्रीची वेळ चादणें शुभ्र पडलेलें आश्रमात जिकडे तिकडे शात व प्रसन्न वातावरण खुलून राहिलेलें सुगध फुलानीं नखशिखात नटलेल्या सुंदर वल्ली मद वायुलहरीनें मधुर नृत्य करीत असलेल्या रजनीदेवी शुभ्रचंद्रिकेचें झिर झिरीत पातळ नेसून विलासी जगाला मोहमुग्ध करीत असलेली अशा प्रशात व प्रसन्न नभभास पौर्णिमेला जेवणखाण आटोपून समोरच्या ओसरीवर त्याच्या वर टाकून सृष्टिशोभा पाहात सहज एकटेच पडले होते

इतक्यांत संधि साधून सती कात्यायनी तेथें आली, आणि येऊन दोजारीं उभी राहिली. तिला पाहून ते उठून बसले. आणि तीहि तेथेंच शेजारीं बाजूला थमली.

ती बसल्यावर ते म्हणालेः—पाहा ना हें चांदणं ! किती शुभ्र पडलं आहे तें ! मला वाटतं जिकडे तिकडे पीठच पीठ उधळलं आहे !

कात्यायनी सभोंवतीं दृष्टि फिरवून म्हणालीः—खरंच बाई ! फारच सुंदर चांदणं ! अहाहा ! काय छान देखावा !

याज्ञवल्क्यः—वा ! छान म्हणून काय विचारतेस ! अगदींच सुंदर ! तीं वेलींचीं फुलें पाहा, कशीं हंसत आहेत तीं ! केवढी मौज ! सृष्टिसौंदर्य म्हणतात तें हें बरं का ?

कात्यायनीः—अन् हा बाजूचा मोगरा. कसा अगदीं फुलानं बहरला आहे.

याज्ञवल्क्यः—तशीच ती पलीकडची जाई ! कशी डौलानें नाचत आहे ती !

कात्यायनीः—अहाहा ! काय मधुर ! किती गोड !

याज्ञवल्क्यः—चंद्रकांत कुठं दिसत नाहीं. निजला आहे कीं काय ?

कात्यायनीः—हं, ही अशोच आलें त्याला निजवून.

यावर याज्ञवल्क्य पुढें कांही बोलले नाहींत. आकाशाकडे दृष्टि वळवून ते चंद्राकडे व आकाशाकडे पाहूं लागले.

दोनचार क्षण लोटल्यावर पुढें तीच म्हणालीः—एक गोष्ट विचारावी म्हणतें, विचारूं ना ?

याज्ञवल्क्यः—मग त्याला ज्योतिषी कां हवा हें सांगायला ?

कात्यायनीः—( स्मितहास्य करून ) थट्टा नाहीं ना करायची ? हो, आधींच सांगायचं. नाहीं तर मग—

याज्ञवल्क्यः—( हंसून ) आजचा रंग कांही निराळाच दिसतोय् अं. बरं, विचार काय विचारायचं तें.

कात्यायनीः—पहा, मग हिणवायचं होईल. मग मी नाहीं ऐकायची. आधीं सारं ऐकून घ्यायचं, हं हं म्हणायचं. अन् मग शेवटीं बादरायणबुद्धि तुमची—वेडी समजूत-अस्सं नि तस्सं ! मग नको सरस्वती उडायला ! हें पुरुषांचं नेहमीं अस्सं असतं.

याज्ञवल्क्य —प्रस्तावना लावतच चालली कीं ! (हसून) आज काय आम्हाला चीत तर नाहीं ना करण्याचा विचार ?

कात्यायनी —शी ! भलतच काही तरी !

याज्ञवल्क्य —हा भडिमार पाहूनच मी भेदरून गेलें ! काय विचारता वायकाचा कावा ! आधीं साखर पेरायची अन् मग हळूच टोक्यावर चडा यच ! स्त्रीकौशल्य तें हेंच

कात्यायनी —ह काय अस अगदींच थट्टा नको बाई ! (हसून) ह, विचारू ना पण ?

याज्ञवल्क्य —आणखी किती वेळा सागू ? विचार, विचार, विचार !

कात्यायनी —यव नि त्यव म्हणायच होईल मग नाही मी–

याज्ञवल्क्य —अग विचार म्हणता ना ? ह, विचार अशी काय नाजूक गोष्ट कळू दे तरी !

कात्यायनी —ती !

याज्ञवल्क्य —ती ? ती कोण ? ही ती कोण ?

कात्यायनी —हें अस्स काय वर ? तो मत्रयी ! ती प्रधानजींचा मुलगी मैत्रेयी ?

याज्ञवल्क्य —ह ह, आल लक्षात ती तुझी मैत्रीण ! तीच ना ?

कात्यायनी —ह, तीच ती !

याज्ञवल्क्य —मग पुढ ?

कात्यायनी —तिचीच गोष्ट बोलणार आहें मी आता ती इथ या आमच्या घरात यावी म्हणतें कायमची राहत्ला हो ! माझ्याप्रमाणच तीहि इथ रहावी म्हणत आल का लक्षात ?

याज्ञवल्क्य —नाही समजल काय म्हणतेस तू

कात्यायनी —(हसून) हेंच तें ! मुद्दाम वेड पाघरायच हातय तें हेंच !

याज्ञवल्क्य —खरच, कात्यायनी, मला नाहीं समजल तुझ हें कोड ! अग ती रोजच इथ येते अन् मग आताच माझी परवानगी कशाला ?

कात्यायनी —ह काय अस माणसान वेड पाघरायच तरी !

असें म्हणून ती गालातल्या गालात थोडीशी हसली आणि एक नाजूक

कटाक्ष टाकून अधिक लाडिकपणानें म्हणाली—' तिला माझ्याप्रमाणंच—' हे अर्धेच शब्द उच्चारून ती मध्येंच थांबली आणि जराशी लाजली.

याज्ञवल्क्यः—अशी मुग्ध कां ? म्हणतेस तरी काय तूं ?

कात्यायनीः—अस्सं काय तरी अगदींच ! अजून नाहींच का समजलं ?

याज्ञवल्क्यः—अंहं, खरंच नाहीं. वेदाचा अर्थ आपण लावूं. पण तुम्हां बायकांच्या शब्दांचा अर्थ लावायला—

कात्यायनीः—( हंसून ) प्रत्यक्ष ब्रह्मदेवच आला पाहिजे ! असंच ना म्हणण्याचा अर्थ ?

याज्ञवल्क्यः—हूं, तस्संच, अगदीं अगदीं तस्सं !

कात्यायनीः—इश्श, पुरे झालं. मी किनई खरंखुरंच म्हणते तिला माझ्याप्रमाणेंच धन्य करायची ! अन् या पायांचा आश्रय द्यायचा ! तिला आपली करायची अन् इकडे कायमची आणायची ! ! आतां आलं कां लक्षांत ? कां नाहींच अजून ?

याज्ञवल्क्यः—( आश्चर्यानें भिवया वर चढवून ) म्हणजे ! कात्यायनी, काय म्हणतेस हें तूं ?

कात्यायनीः—म्हणायचं काय ? तिला आपली करायची ! नाथ, किती गोड ! किती प्रेमळ ! म्हणून सांगूं मी ती !

याज्ञवल्क्यः—अस्सं, अस्सं ! आणखी काय काय ? याचा कीं पुराण सगळं एकदांच ! ऐकूं दे तरी ! मैत्रिणीची शिफाई ठीक चालली आहे. हं चालूं द्या !

कात्यायनीः—बाई बाई ! शर्थ झाली आतां माणसापुढं !

याज्ञवल्क्यः—मग काय तें स्पष्टच सांगना ? मी काय करूं तें उघड बोलून दाखव आपली. उगीच असा आडपडदा नको. अशी लाजतेस काय म्हणून ?

कात्यायनीः—जसं कांहीं समजलंच नाहीं ! येवढ्यावरून माणसानं ओळखूं नये म्हणजे आतां शर्थ झाली ! इश्श, हें काय मेलं ! ( थोडेसें हंसून ) स्पष्ट सांगूं ? सांगूं ना पण ? तिला माझी सवत करायची ! होय ! सवत ! !

याज्ञवल्क्यः—ओं! काय म्हणालीस ? कात्यायनी, काय म्हणालीस तूं ! स–व–त ! अन् तुला ! !

कात्यायनीः—(मान वेळावीत हंसत) हं हं, मला ! मला ! ! या कात्यायनीला ! ! !

याज्ञवल्क्यः—माझ्या गृहलक्ष्मीला ! आणि स–व–त ! अन् मग मी कुठं राहूं ? हिमालयांत कां निमिषारण्यांत ! !

कात्यायनीः—(जरा रागावल्यासारखें करून) मी नाहीं जा बाई ! थट्टाच करायची असेल तर मी ही निघालें इथून !

असें म्हणून ती चटकन् उभी राहिली. पण याज्ञवल्क्यांनीं तिचा हात धरून तिला जवळ बसवून घेतली आणि प्रेमानें तिच्या पाठीवरून हात कुरवाळीत ते म्हणालेः–लाडके, तुला वेड तर नाहीं लागलं? माझी कात्यायनी अशी भोळी कशी !

कात्यायनीः—तें कांहीं नाहीं. येवढं झालंच पाहिजे ! ती माझी सवत झाली पाहिजे !

याज्ञवल्क्यः—कात्यायनी, तूं मोठी हट्टीच दिसतेस कीं ! नीट शुद्धीवर आहेस कां तूं ? सवत म्हणजे काय समजलीस ? दागिना नव्हे बरं का तो !

कात्यायनीः—इतकी का मी खुळी आहें हें न समजण्यायेवढी ! तरीपण माझा हा हट्ट पुरवलाच पाहिजे ! तिच्याशिवाय मला आतां करमेनासं झालं आहे ! अलीकडे इकडं तिनं येण्याचं सुद्धा टाळलं आहे ! अन् मला तिची सारखी चुटपुट लागून राहिली आहे. सांगा नाथ, होइल का येवढी मेहेरबानी? होईल ना पण ?

याज्ञवल्क्यः—अग, ती तुझ्या संसारावर–

कात्यायनीः—काय करील ?

याज्ञवल्क्यः—निखारा ठेवील निखारा ! धगधगीत निखारा ! काय करील म्हणजे ? आहेस कुठं ?

कात्यायनीः—इश्श, हें काय तरीच ! इतकी कां ती वेडी आहे ?· येवढी कां ती दुष्ट आहे ? नाहीं, नाहीं बरं, ती तशी नाहीं !

याज्ञवल्क्यः—भोळी रे भोळी ! कात्यायनी, तूं फार भावडी दिसतेस ! आणि म्हणून विस्तवाशीं अशी खेळेन म्हणतेस ! पण याचा नीट विचार कर बरं.

कात्यायनी —( मान हलवीत ) हो हो, केला आहे विचार अन् विचार करूनच ही गोष्ट काढली आहे आपल्याजवळ मग करायची ना माझी एवढी इच्छा पूर्ण ? आणायची ना तिला इथ ?

याज्ञवल्क्य —( तिचे दोन्ही हात आपल्या हातात धरून ) कात्यायनी, तू किती गाड आहेस ! किती प्रेमळ आहस ! फारच थोर मनाची बर का तू ! पण मला खरोखर तुझी कीव येते बघ !

कात्यायनी —( गयावया तोंड करून ) देवा, असे दुष्ट होऊ नका ! पदर पसरतें ! असे निर्दय होऊ नका !

याज्ञवल्क्य —तिला घरीं आणून माझ्या ससाराची माती कर म्हणतेस, होय ? ( तिच्या पाठीवरून हात फिरवीत ) मी माझ्या लाडक्या कात्यायनीला दु खात लोटू, खाईत ढकलू असाच ना तुझा अर्थ ? नाही, लाडके, ती गोष्ट मी सहसा करणार नाही ! माझ्या लक्ष्मीला मी सवत करणार नाहीं !

कात्यायनी —का ? का बर त्याची येवढी काळजी ? अन् लक्ष्मीला सवत नाहीं कीं काय ? सागा, नाथ, लक्ष्मीला सवत नाही कीं काय ? मी इथ घरात लक्ष्मी एकटीच आहें त्यामुळ घराला असावी तशी शोभा नाहीं ( हसून ) म्हणून म्हणतें कीं जोडीला श्री पाहिजे ! ह, श्रीहि पाहिजेच ! आल का ध्यानात ? म्हणजे इथ वैकुठ रंगेल ! ! मग आता शायच ना वचन ? अस म्हणून तिनें आपला हात पुढें केला

तो तिचा हात योगीश्वरानीं प्रमानें आपल्या दो ही हातात घट्ट धरून म्हटलें –वेडे, आपल्या हातान का कोणी आपल्या ससारावर निखारा ठेवीत असत आणि तस सागणारी स्त्री काय शहाणी म्हणावी ? वेडीच ! कात्यायनी, तू वेडी ! अगदींच वेडी ! ! ह ह ह ! ! !

कात्यायनी —हो, मी वेडीच ! आपल्यापुढ मी वेडीच ! अन् पतरल मला वेड ! पण ती सवत पाहिजे ! !

याज्ञवल्क्य —लाडके, सोड हा आग्रह ! हा विषाचा प्याला हातात धरू नकोस ! माझ्या लाडक्या कात्यायनीला हीअवदसा कोठून बर आठवली ? कात्यायनी, सोड हा आग्रह ! तिनें तुला कुरळ तर नाहीं ना घातली ? अग वाटेल त माग–माग तुला काय सोन्याचा पर्वत हवा ? का रत्नाची खाण

हवी ? का अमृताचा समुद्र हवा ? सांग, तुला काय पाहिजे तें सांग याज्ञ-वल्क्य तें हातात घेऊन उभा आहे ! पण एवढं मात्र–

कात्यायनी —( निर्धारानें ) नाहीं, नाहीं. ही माझी हौस पुरी झालीच पाहिजे ! एवढी भिक्षा मला मिळालीच पाहिजे माझ्या मैत्रेयीला या पायाचा आश्रय मिळालाच पाहिजे !

याज्ञवल्क्य—देवि ! देवि ! !

कात्यायनी —तें काहीं नाहीं मैत्रेयीला मी क्षणभरहि विसरून रहायची नाहीं साफ सांगत, मा क्षणभरहि राहायची नाहीं !

याज्ञवल्क्य —( डोकें खाजवीत ) आता मात्र पचाईत आली खुवा !

कात्यायनी —एवढी विनवणी केली असती तरी दगड देखील पाझरला असता–पण पुरुष जात म्हणजे काय, दगडापेक्षाहि कठीण ! ! अगदीं काळा पत्तर ! ! !

याज्ञवल्क्य —अवश्य ! केवढी गोलंदाजी ही ! आम्ही तर अगदीं चकित झालों की ! [redacted]

कात्यायनी —येऊन जाऊन आम्ही घरांत भांडत बसू हीच ना इकडची भीति ? पण ही कात्यायनी येवढी खुळी का आहे ? महाराज, मला तुमचा वेदांत समजत नसला तरी मी अगदींच कांहा सामान्य स्त्री नाहीं वर तेवढं मला समजत, आणि मैत्रेयीसुद्धा तशी शहाणी आहे किती गोड ! किती सरळ ! देवा, आपल्या सुखात ती मुळींच अडथळा आणायची नाहीं घालील तर उलट भरच घालील ! केवढी प्रेमळ ! अन् किती सुशील ! झालं तर आपला फायदाच होईल शिवाय ती माझ्या जिवाभावाची मैत्रीण आहे ! ! तिला सुखात पाहणं हें माझं कर्तव्य नव्हे का ? देवा, ती करील तर आपल्याशींच विवाह करील !

याज्ञवल्क्य --आणि नाही तर ?

कात्यायनी —तशीच कुवारीण राहील ! तसा तिचा निश्चयच आहे ! आणि म्हणून माझी एवढी जीव तोडून इकडची मनधरणी चालली आहे आपल्यापुढं ही गोष्ट काढायला तिचा बाप काय, किंवा लोक काय धजत नाहींत म्हणून मला ही शिष्टाई पत्करावी लागली आता आलं ना सर्व लक्षात ! आता तरी करायच ना माझ्या मनासारखं ? हो म्हणायच ! सांगू तिला ?

याज्ञवल्क्य —समज, मी क्षणभर तुझ्या मनाप्रमाण केल, अन् मग ती तुझ्याशीं भाडू लागली, तुझा हेवादावा करू लागली, मग कस ?

कात्यायनी —हें अस काय विचारायच बर ? ती जर माझ्याशीं भाडूतडू लागली, हेवादावा करू लागली तर जापर्यंत माझे देव माझ्याजवळ आहेत, तोंपर्यंत मी तिला काय म्हणून भीक घालीन ? हे पाय माझ रक्षण करतीलच !

याज्ञवल्क्य—(हसून) अन् मीहि तिच्याकडचाच झालों तर ?

कात्यायनी —मग देवच फिरल म्हणून स्वस्थ बसेन ! आपणच फिरला तर मग ही कात्यायनी जिवत तरी राहील का ? पण नाथ, अशी भलती सलती शका काढून मला भिवबू नका गडे सूय कधीं पश्चिमेकडे उगवला आहे काय ? कदाचित् उगवला तर उगवेलहि ! पण माझे देव मला कधींहि अतरणार नाहींत ! दूर लोटणार नाहींत ! याचा येवढा विश्वास आहे म्हणूनच ही कात्यायनी येवढ धाडस करीत आहे ! हें दिव्य करायच धैय तिला आल आहे ! (याज्ञवल्क्याच्या पायाकडे बोट करून) हे माझे चरण मला कधींहि अतरणार नाहींत !—असें म्हणून तिनें त्याचे पाय घट्ट धरले

याज्ञवल्क्य तिच्या हातून आपले पाय सोडवीत म्हणाले -कात्यायनी ! कात्यायनी ! भग हें काय ? सोड ना ? ह काय अस वेड्यासारख बर ! सोड माझे पाय हा याज्ञवल्क्य तुला कधींहि विसरणार नाहीं बर ! तुला कधींहि अतरणार नाहीं ! तू माझी गृहलक्ष्मी ती शेवटपर्यंत गृहलक्ष्मीच राहशील ! ! कात्यायनी ! तू सामान्य स्त्री नाहींस ! असलें धाडस मला कुणीं केल नाहीं अन् पुढ कुणी करणारहि पण नाहीं ! तुझा स्वार्थत्याग दाडगा आहे ! मन अत्यत धार आहे ! प-ण—

कात्यायनी —पण काय ?

याज्ञवल्क्य —तुझ्या विनतीला हो म्हणायला अजून मन धजत नाहीं हा विषाचा प्याला मी माझ्या हातान माझ्या गृहदेवतेला कसा देऊ ? कात्यायनी, मला कसा बर देऊ ?

कात्यायनी —देवा, तो विषाचा जरी प्याला असला आणि तो या हातातून मला मिळाला तर त्याचें अमृतच होईल ! गोड अमृतच होईल ! ! रात्राहयातील शुष्क खाबाचा क्षणार्धात पुष्पपल्लवानीं सुशोभित असा सुदर

शिष्टाई पाहून त्याना मनांत आनंद झाला व तिचा निर्धार पाहून ते जरा नरमलेहि. अर्थात् प्रेमळ पत्नीच्या आग्रहाला वश होऊन शेवटी त्यांनीं तिला विजयपत्र दिलें! सती कात्यायनीचा विजय झाला! आणि मैत्रेयी तिची पुढें सवत झाली!! सती कात्यायनीचें केवढें हें अपूर्व दिव्य!!!

जी गोष्ट योगीश्वराजवळ काढावयाला सगळें जग भीत होतें तीच गोष्ट कात्यायनीसारख्या स्त्रीनें मोठ्या धैर्यानें काढून आणि कौशल्यानें एटून आपल्याशी करून घेतली आणि जाणूनबुजून सवतीचा प्रखर आग अंगावर घेऊन मैत्रेयीची इच्छा पूर्ण केली, या तिच्या धैर्याचें व स्वार्थत्यागाचें या स्वार्थप्रवण विसाव्या शतकात निदान कौतुक तरी नको का करायला?

वृक्ष बनविणाऱ्या माझ्या नाथाचे हात काय मला विष देतील ? तें प्रत्यक्ष जहर काळकूट जरी असल तरी त्यावर माझ्या देवाची दिव्य नजर पडताच तें स्वर्गीतील मधुर अमृतच होईल ! ! !

बोलता बोलता कात्यायनी आपणास अडवू लागली हें योगीश्वरांनीं ओळखिलें आणि मनात तिच्या स्वार्थत्यागाचें कौतुक करीत वरवर थट्टेवर गेल्यासारखें करून हसत हसत म्हणाले —मग देऊ तर विष ? घेतेस तें ?

कात्यायनी —तर तर ! द्या घेतेंच कीं नाहीं पहा या कात्यायनीचें धर्य तरी पहा ! तुमच्या हातातील विष पिऊन ही कात्यायनी मेली तर धन्यच झाली ! अन् वाचली तर माझ्या देवाची कीर्ति जगभर होईल या पायानवळ मला विषाची काय भीति ! जगाला जाळणार विष–भयकर कालकूट भोला नाथ शकरान घेतल आणि तो सुदर नीलकठ झाला ! तोच गौरीहर मी पुजला आहे देवा, तोच गौरीहर मींहि पुजला आहे ! सामान्य बायकाना भयभीत करणार सवतीच हें जहर विष ही कात्यायनी आपल्या हातान व आपखुषीन पिऊन त्या गोरीहराच्या प्रसादान व आपल्या चरणसेवेच्या प्रभावान अमरच होईल ! खात्रीन ती अमरच होईल !! मग द्याना विष ? नाहीं तर करा मैत्रेयी माझी सवत ! !

असें म्हणून तिनें स्मितहास्य केलें याज्ञवल्क्य क्षणभर स्तब्ध झाले आणि पुढें हसून म्हणाले —पण—

कात्यायनी —आता नको पण नी बीण येवढ झालच पाहिजे आपण अगदीं नि शक असायच गगायमुना जरी वेगळ्या असल्या तरी समुद्रनाथा जवळ जाताना एकरूप होतात, तद्वत् कात्यायनी-मैत्रेयी या दोघी दिसावयास भिन्न दिसल्या तरी या चरणाची सेवा करताना त्या दोघीहि एकरूप होऊनच करतील ! तेथें कात्यायनी व मैत्रेयी हा भेद राहणार नाहीं !

याज्ञवल्क्य — लाडके ? लाडके ?

कात्यायनी —का माझ्या परमेश्वराला अजून या कात्यायनीचा भरवसा वाटत नाहीं काय ? येवढी भिक्षा मला मिळणार नाहीं काय ? देवा, आपण देणार नाहीं काय ?—असें म्हणून तिनें आपला पदर पुढें केला

याज्ञवल्क्य आता निरुत्तर झाले तिचा स्वार्थत्याग व मैत्रिणीची कुशल

विशाई पाहून त्यांना मनांत आनंद झाला व तिचा निर्धार पाहून ते जरा नरमलेहि. अर्थात् प्रेमळ पत्नीच्या आग्रहाला वश होऊन शेवटी त्यांनीं तिला विजयपत्र दिलें! सती कात्यायनीचा विजय झाला! आणि मैत्रेयी तिची पुढें सवत झाली!! सती कात्यायनीचें केवढें हें अपूर्व दिव्य!!!

जी गोष्ट योगीश्वरांजवळ काढावयाला सगळें जग भीत होतें तीच गोष्ट कात्यायनीसारख्या स्त्रीनें मोठ्या धैर्यानें काढून आणि कौशल्यानें लढून आपलीशी करून घेतली आणि जाणूनबुजून सवतीचा प्रखर आग अंगावर घेऊन मैत्रेयीची इच्छा पूर्ण केली, या तिच्या धैर्याचें व स्वार्थत्यागाचें या स्वार्थप्रवण विसाव्या शतकांत निदान कौतुक तरी नको का करायला?

---

## मध्यान्हींचा भास्कर

'योगीश्वरांचें वैभव आतां कोण वर्णू शकेल? लक्ष्मीसारखी कात्यायनी व सरस्वतीसारखी मैत्रेयी या दोन गृहदेवतांच्या सहवासांत त्यांचा सुंदर संसार म्हणजे आतां ऐहिक सुखानंदाच्या शिखरास जाऊन पोहोंचला होता. त्यांना आतां कांहीं कमी नव्हतें. विपुल संपत्ति, विपुल कीर्ति आणि विपुल गृहसुख. उत्तम आरोग्य, उत्तम सामर्थ्य, आणि उत्तम विद्वत्ता. अपूर्व कौशल्य, अपार चातुर्य, आणि अगाध प्रतिभा! श्रेष्ठ तेज, उदार धोरण आणि पवित्र अंतःकरण! अखंड शांति, उदंड जागृति आणि अभंग छाती! मग त्या योगीश्वरांचें ऐश्वर्य कसें आणि किती म्हणून सांगत बसावयाचें? आमची लेखणी तर येथें खरोखर लंगडी पडते! हें सगळें एकाच वाक्यांत सांगावयाचें म्हणजे आतां ते सुखानंदाच्या परमोच्च शिखरास पोंचले होते! ते एकमेवाद्वितीय असे कर्मवीर व ज्ञानवीर होते!

वैशंपायनांनीं कुत्सित डाव टाकून योगीश्वरांचा उजवा हात नाहींसा केला होता हें खरें, पण अजिबात त्यांना नामोहरम करण्याचें सामर्थ्य गुरुजींत राहिलें नव्हतें. योगीश्वरांचें सिंहासन आतां चांगलें दृढ झालें होतें. दोजारणीनें कोंबडा झांकून ठेविला म्हणून उजाडावयाचें का कोठें राहिलें आहे? वैशंपायनांनीं

जनमेजयाला बळी घेतला म्हणून याज्ञवल्क्याचा प्रतापसूर्य असा थोडाच दडून राहणार होता तो जो एकदाचा उगवला तो कायमचा झळकतच राहिला वेशपायनाच्या या दुष्ट कृतीनें उलट इतकें मात्र झालें कीं, सर्व क्षत्रिय समाज त्याच्याकडे पाठ वळवून बसला आणि याज्ञवल्क्याकडे त्यानें तोंड वळविलें ! सर्व भरतखडभर त्याचा कीर्तिपरिमळ दरवळून जाऊन राज मडळात व क्षत्रिय समाजात त्याचा जम बसत गेला आणि दिवसेंदिवस त्याची तेजी व सरशी होत चालली

आपल्या मधुर पुगिच्या सुस्वर नादानं गारुडी जसा सापास भुरळ पाडून त्यास आनदानें डोलावयास लावतो, तद्वत् याज्ञवल्क्यानीं आपल्या सद्गुणाना, प्रेमळ अत करणानें, कर्मकौशल्यान व दिव्य प्रतिभातेजानें सर्व जगास भारून माडलें होतें भ्रमर जसे कमलावर लुब्ध होऊन सभोंवता गुंजारव करीत घिरट्या घालीत असतात अथवा मधाचर मोहित होऊन मधमाशा जशा गर्दी करीत असतात किंवा प्रकाशाला भुलून पतग जसे दीपासभोंवतीं थैमान घालीत असतात तद्वत् राजेरजवाडे, सरदारजहागीरदार व इतर क्षत्रिय लोक त्याच्या गुणावर व विद्यावभवावर अनुरक्त होऊन त्याच्या सभावती नमत चालले होते वेशम्पायनाची ती दुष्ट व कपट कृति पाहून ते मनात फार चिडले व विटले आणि कोण नाहीं विटणार ? जनमेजयानीं असा काय त्याचा महान् अपराध केला होता की त्यानीं बड करून त्याना देशोधडीस पिटाळून द्याव ? त्याचें ह राक्षसी कृत्य त्या वेळच्या विचारी क्षत्रियाना मुळींच आवडल नाहीं, आणि म्हणून त्या वगान जो आपला दरवाजा या वैशपायन कपूम तेव्हापासून बद केला तो पुढें बदच झाला ! आणि तेव्हापासून त्यानीं जो वाजसनेय याना प्रवश दिला तो आजपर्यंत तसाच आहे व तेव्हापासून राजे लोकाचें गुरु घराणें जें एकदाच वाजसनेयाकडे आलें तहि आजपर्यंत कायमच आह

केवळ जनक राजे तेवढेच त्याचे शिष्य होते असें नसून सर्व भरतखडभर त्याचा आता शिष्यपरिवार जेथें तेथें पसरला होता किती राजे, किती महा राजे, किती सरदार, किती जहागीरदार, किती शेट आणि किती सावकार याची गणतीच नाहीं ! देशभर ते पूज्य व वदनीय होऊन बसले देशभर

त्यांचा कीर्तिध्वज फडफडत राहिला. आणि देशभर त्यांचा जयजयकार दुमदुमून गेला. किती स्वागत, किती समारंभ, किती दर्शन-औत्सुक्य आणि किती जयघोष! राजे लोकांनीं व सरदार जहागीरदारांनीं दिलेली संपत्ति म्हणजे त्यांच्या घरांत व आश्रमांत कानाकोपऱ्यांत भरून व फुलून गेली होती. घरांत आणि बाहेर जावें तिकडे व पाहावें तेथें त्यांना वैभवच वैभव दिसूं लागलें. जावें तेथें यश, पाहावें तेथें समारंभ, आणि ऐकावें तेथें कीर्ति! बृहदारण्यकांत आनंदाच्या म्हणून त्यांनीं ज्या कांहीं पायऱ्या सांगितल्या आहेत त्या सर्व आपल्या पायानें प्रत्यक्ष चढून ते वर शिखरावर जाऊन पोहोंचले होते. आणि म्हणूनच त्यांना अद्वितीय ब्रह्मानंदाचा साक्षात् अनुभव घेतां आला. म्हणजे तात्पर्य काय तर त्यांचा प्रतापसूर्य आतां चांगला मध्याह्नीवर आला असून 'स्वदेशे पूज्यते राजा विद्वान् सर्वत्र पूज्यते' ही सुभाषोक्ति प्रथमच त्यांच्या बाबतींत जगाच्या निदर्शनास आली! त्यांचा शुक्लयजुर्वेद चांगला मोहरला असून वाजसनेयाना आतां जिकडे तिकडे मोठा बहार लागला होता!

---

# पिंपळाच्या झाडाखालीं

घोर आणि घनदाट अरण्य! झाडी अगदीं किर्र लागलेली. वड, आंबे, फणस, साग, पिंपळ, पिंपरी इत्यादि उंच व विशाल वृक्षांची जणूं काय एकच गर्दी उडालेली; करवंद व इतर लहान लहान झाडेंझुडपें यांच्या निबिड जाळ्यांनीं अरण्य सर्वत्र गजबजून गेलेलें; फार काय सूर्यनारायणाला भूमातेचें दर्शन घ्यावयाचें म्हणजे तो एक कपिलाषष्ठीचा योगच!

अशा निबिडतर कांतार-जठरांत अगदीं पहांटेच्या प्रशांत समयीं एक स्त्री एका वस्त्रांत कांहींसें गुंडाळून तें छातीवर धरून हलकेंच एक एक पाऊल टाकीत जपून चालली होती. ती तरुण होती पण एकटीच होती. सुंदर होती पण दुःखी व उदास दिसत होती. मूळची तेजस्वी खरी, पण आतां ती निस्तेज व फिकट पडली होती. अशा प्रशांत समयीं व अशा निर्जन प्रदेशांत ती

एकटीच अशी चोरून येण्याचें कारण तरी काय बरें असावें ? तिच्यावर तसा प्रसंग तर नसेल ना कांहीं आला !

ती येतां येतां आतां एका पिंपळाच्या झाडाखालीं आली आणि काय वाटलें कोणास ठाऊक–तेथेंच एकदम थबकली. इकडे तिकडे न्याहाळून पाहिलें आणि त्या शांत व प्रसन्न देखाव्यानें तिचा जीव थोडासा हलुवारल्यासारखा झाला. तिनें मागें पुढें वळून पाहिलें, खालीवर दृष्टि फेंकली, चोहींकडे नीट तपास घेतला. तेव्हां कोठें तिला थोडेंसें हायसें वाटलें. ती जागा त्यांतल्या त्यांत प्रशस्त व निवाऱ्याची वाटल्यावरून ती हळूंच तेथें खालीं बसली, आणि ती वस्त्रांतून गुंडाळून आणलेली वस्तु तिनें त्या झाडाच्या बुंध्याजवळ हलक्या हातानें ठेवून तिकडे एकवार सप्रेम दृष्टीनें पाहिलें. पुनः .काय वाटलें कोणास ठाऊक तिनें ती वस्तु हळूंच उचलून घेतली, आणि उराशीं घट्ट धरून तिचें चुंबन घेतलें. एक, दोन, तीन वेळा तिनें असें केलें क्षणभर तिला उराशीं घट्ट आवळून धरिलें. शेवटीं मनांत कसला तरी निश्चय करून ' नीज हं बाळ इथं ! परमेश्वर तुझं कल्याण करो ! ' असें पुटपुटून तिनें त्या वस्त्रावगुंठित नूतन अर्भकाला तेथें निजविलें.

अहाहा ! केवढें सुंदर बाळ तें ! किती नाजूक ! किती कोमल !! किती गोड !!! खालीं निजविल्याबरोबर तें लहान ऐंकरू आपल्या चिमुकल्या मुठी वळवीत व गुलाबी पाय नाचवीत ट्यां ट्यां करीत रडूं लागलें. जणूं ' आई, मला एकट्यालाच तूं सोडून निघालीस ? कां बरं अशी माझ्यावर रागावलीस ?' असें विचारण्याचा त्याचा भाव होता. त्या प्रेममुग्ध माउलीनें त्या रडण्याचा अर्थ ओळखला. त्या प्रेमळ अंतःकरणाला आतां कडकडून पीळ बसला ! डोळ्यांतून घळघळां अश्रुधारा वाहूं लागल्या ! कंठ सद्गदित झाला ! प्रेमानें अंग थरारलें ! भयानें कंपित झालें ! दुःखानें व्याकूळ बनलें ! अरेरे ! केवढी दुर्दशा त्या गरीब गाईची ! अन् कोण कठीण प्रसंग त्या प्रेमळ माउलीवर !

तिनें त्या मांसाच्या गोजिरवाण्या गोळ्याला उचलून पुनः उराशीं धरलें, मातेच्या प्रेमळ हातांनीं कुरवाळिलें, आणि त्या सुकुमार गालाचे गोड मुके घेतले ! केवढी प्रचंड तळमळ ! कोण ती विलक्षण कालवाकालव ! सर्व ब्रह्मांडाचें ब्रह्मांडच आतां तिच्या सभोंवतीं गरागर फिरूं लागलें होतें ! तिला

वाटलें कीं, हा जणूं प्रलयकाळच कोसळला! अहो, माउलीचें प्रेमळ अंतःकरण तें! त्याची दुर्दशा काय सांगावी? आणि सांगून ती कोणाला कशी कळणार? आम्ही पुरुष कितीहि सदय असलों तरी मायमाउलीच्या प्रेमळ व कोमल अंतःकरणाची आम्हांस कल्पना तरी कशी येणार? तें फक्त ती देवताच जाणे! आणि तें तिलाच ठाऊक!!

तिनें मन आतां पुनः घट्ट केलें. मातेचा मायाळु पुरता बाजूस सारला, आणि तें गोंडस बालक-पोटचा कोमळ गोळा-कंपित हातानें हळूंच पुनः ठेवून, त्या विशाल अश्वत्थवृक्षाकडे सजल दृष्टीनें पाहिलें, हात जोडले आणि म्लान वदन करून त्या अश्वत्थ नारायणाला पदर पसरून कंपित स्वरानें विनंति केली कीं, " 'अश्वत्थ विष्णुरूपोऽसि त्वं देवेषु प्रतिष्ठितः। तस्माद्रक्षस्व मे पुत्रं सर्वतस्त्वं वनस्पते' ( कंद १--१७४--१८ )—हे अश्वत्थनारायणा, तूं साक्षात् विष्णुस्वरूप आहेस, देवांमध्यें श्रेष्ठ आहेस, तर या माझ्या अर्भकाचें आतां तूच संरक्षण कर. " अशी प्रार्थना करून ती माउली आतां तेथून उठली आणि पुनः एकवार त्या अर्भकाकडे अश्रुपूर्ण दृष्टि वळवून त्याचें शेवटचें दर्शन व चुंबन घेतल्यावर मनाचा हिय्या करून ती दुःखित व भग्न अंतःकरणानें मागें वळली! शिव शिव! काय त्या माउलीचें दुःख! आणि काय त्या अर्भकाची दशा!!

ती माउली आपले पंचप्राण त्या झाडाखालीं ठेवून तेथून परतली. तिला तेथें राहणें आतां शक्यच नव्हतें. न जाणों कुणीं नरी पाहिलें तर! केवढा लोकापवाद!! भगवान् सूर्यनारायण आतां चांगला वर आला होता. जवळ जवळ प्रहर दीडप्रहर दिवस चढला होता. आतां आणखी तेथें घुटमळत राहणें म्हणजे आपल्या अघूचें प्रदर्शन करण्यासारखेंच होय, असें समजून ती तेथून जड अंतःकरणानें व निरुपायानें हळूं हळूं चालूं लागली. जातां जातां तिच्या मनांत नाना तऱ्हेचे विचार येऊं लागले. हें काय झालें आणि कसें झालें? आतां काय करूं व कुठें जाऊं? बाळ कसं जगेल? त्याचें कसं होईल? पुनः तेथें जाऊं का आणि त्याला उचलून घेऊं का? कां विहिरींत उडी घेऊं कां नदींत बुडी मारूं? काय करूं? देवा, कसं करूं? आपणाला पुरुषस्पर्शहि नाहीं, मग हा चमत्कार झाला कसा? याप्रमाणें विचार करीत ती मोठ्या बुचकळ्यांत पडली.

इतक्यात वर निरभ्र आकाशात गडगडू लागलें आणि त्यातून स्पष्ट मनुष्य वाणी निघाली की, 'हे कसारी, तू शोक करू नकोस यात तुझा अपराध नाही! आणि कुणाचाच नाही! हा सर्व दैवाचा खेळ आहे तू निष्पाप आहेस, तशीच पुण्यवानहि आहेस! उतथ्याच्या शापाने प्रत्यक्ष देवगुरु बृहस्पति तुझ्या पवित्र उदरी ज मास आला आहे! हा मोठा सिद्ध पुरुष होईल! महायोगी व थोर तपस्वी होईल! हा पिंपळाच्या रसावर जगणारा होईल! हा पिप्पलाद या नावानें प्रसिद्धि पावेल पुरुषसंग नसताना हा तुला झाला हें पाहून तुला विस्मय वाटला असेल पण तसें वाटण्याचें कारण नाही हा कोणाचाच दोष नाही तुझ्या भावाचें रेतास्खलन झालेलें वस्त्र तू अजाणता नेसलीस आणि त्याचा हा परिणाम झाला! तें वस्त्र नेसून तू स्नान करीत असताना त्या रेताचा तुला नकळत तुझ्या गर्भात प्रवेश झाला आणि तू गर्भिणी झालीस! त रेत अमोघशक्ति असल्यामुळें तुला हा महातेजस्वी पुत्र झाला आहे!'

ही आकाशवाणी तिनें कानान ऐकिली मात्र ती हाय हाय करत रडू लागली तिच्यावर जणू वज्राघातच झाला!! ती शोकविव्हल झाली, विचार मूढ बनली, दु खपकात रुतली! काय कराव, कोठें जाव हें तिला कळेना! शून्य दृष्टीनें व भग्नहृदयान ती वाट सापडेल तिकडे पाउल टाकीत चालली आणि जाता जाता मध्येंच दु खातिशयानें मूर्च्छित होऊन धाडकन् जमिनीवर पडली! बाळ तिकडे रडू लागल आणि माउली इकडे मूर्च्छित पडली!! हाय रे विधात्या! केवढा निर्दय तू!! (स्कद, ६–१७४)

---

# याज्ञवल्क्यांची बहीण कंसारी

याज्ञवल्क्याना एक बहीण होती तिच नाव कसारी असें होत निष्ठुर दैवानें ती लहान असतानाच म्हणजे सात वर्षांची असतानाच तिला वैध व्याची कडक शिक्षा दिली होती अर्थात् ती बालविधवा होती! माहेरीं ती याज्ञवल्क्याजवळ राहत असे आणि तेथें राहूनच काय जपतप व नेमधर्म पाळावयाचे ते ती पाळीत असे (स्कद ५ ३ ४२)

एके दिवशीं रात्रीं याज्ञवल्क्य हे झोंपीं गेले होते. झोंपेंत त्यांना एक विचित्र स्वप्न पडलें—म्हणजे त्यांना एक सुंदर अप्सरा दिसली. तिच्या दिव्य सौंदर्याला ते मोहित झाले आणि त्याचा परिणाम असा झाला की, स्वप्नामध्यें त्यांचें रेत स्खलन पावलें!

इतक्यांत ते जागे झाले आणि पाहतात तों असा प्रकार! हे पाहून त्यांना सखेद आश्चर्य वाटलें. पण करतात काय? होऊं नये ती गोष्ट होऊन चुकली. कांहीं झालें तरी हाडामांसांचा मनुष्यदेह तो! तो एवढा वज्रदेहासारखा कोठून असणार? चटकन् ते उठले आणि रेतानें बरबटलेलें तें वस्त्र तसेंच सोडून देऊन दुसरें एक नेसले. तें सोडलेलें वस्त्र तसेंच खुंटीवर गुंडाळून ठेवून अजून रात्र असल्यामुळें आणि रात्रीं स्नान करणें हे निषिद्ध सांगितल्यामुळें स्नान न करतांच तसेच ते पुनः अंथरुणावर जाऊन पडले.

पुढें पहाट झाली, आणि कंसारी उठली. त्या वेळीं ती ऋतुमती होती, म्हणून तिला स्नान करावयाचें होतें यासाठीं तिला एक वस्त्र नेसावयास हवें होतें. कर्मधर्मसंयोगानें तें तिला समोरच खुंटीवर दिसलें. तिनें तें ओढून घेतलें आणि अंगावरचें सोडून हें दुसरें लावून घेतल्यावर ती स्नान करावयास गेली. पुढें स्नान झालें आणि नित्याप्रमाणें ती आपल्या उद्योगाला लागली.

दैवयोग तरी किती विलक्षण पाहा! कंसारीनें हें केलें तें सर्व शुद्ध व सरळ मनानेंच केलें होतें. पण त्याचा परिणाम मात्र पुढें भलताच झाला. तिला दिवस गेले आणि प्रकृतींत फरक पडूं लागला! पुढें पुढें गरोदर असल्याचीं स्पष्ट चिन्हें व डोहाळे होऊं लागले. ती फार भ्याली, लाजली व विस्मयचकित झाली! तिच्या छातींत धस्स झालें आणि काळजाचें पाणी पाणी झालें! अरेरे, काय करील बिचारी! केवळ कठिण प्रसंग! भर तारुण्य आणि तशांत असा प्रकार! कियदं लांछन आणि केवढा लोकापवाद! यांत तिचा दोष कांहींच नव्हता हें खरें, पण या संशयखोर जगाला हें खरें कसें वाटणार? अशा वेळीं स्त्रियांची मनःस्थिति काय होत असेल हें श्रीहरिच जाणे! तिला आतां कांहीं सुचेना कीं कांहीं समजेना! ती मोठ्या संकटांत पडली, पेचांत अडकली आणि काळजींत चूर होऊन गेली!!

तूर्त आलेला प्रसंग कसातसा तरी मारून न्यावा असा विचार करून सहा

महिने ग्रस्तस्थ राहण्याचा तिनें बहाणा केला आणि त्या अवधींत आपणाला दुसऱ्याशीं बोलावयाचें नाहीं कीं दुसऱ्याचें दर्शन घ्यावयाचें नाहा असें घरात सांगून टाकलें आणि आश्रमातील एका स्वतंत्र पर्णकुटिकेंत जाऊन ती एकांतात दिवस काढू लागली तिचे आचले नेमधर्म नेहमीच चाललेले असावयाचे म्हणून याज्ञवल्क्य काय किंवा कात्यायनी-मैत्रेयी काय कोणींच तिकडे फारसें लक्ष दिलें नाहीं ती ग्रस्तस्थ असता सारेंपिणें सगळें तिचें तीच स्वतः करीत असे म्हणून तिच्या वाटेस फारसें कोणी जात नसत आणि या वेळेस तर कोणीच गेले नाहींत पुढें नवमास भरले आणि टहाया लागला एके दिवशीं रात्रीं ती आश्रमातून एकाएकीं नाहीशी झाली आणि पुढें काय झाले याची हकीकत वर दिलीच आहे

कसारी निघून गेल्यावर दोनतीन दिवस झाले असतील ता अजिबात आश्रमात कोठें दिसत नाहींसें पाहून याज्ञवल्क्यानें तिचा शोध चालविला लोक इकडेतिकडे फिरून तिला शोधू लागले पण तिचा थांग ना पत्ता कात्यायनी शोधून शोधून दमली मैत्रेयीच्या तिच्या पर्णकुटीकडे सारख्या खेपा चालल्या होत्या याज्ञवल्क्यहि फिरून फिरून थकले ता कोठें गेली याचा कोणाला काहींच तपास लागेना दोनप्रहरपर्यंत तिचा सारखा शोध चाललाच होता पण तिचा मागमूसहि लागला नाहीं याज्ञवल्क्य आता खरोखर घाबरले कात्यायनीच्या डोळ्यात अश्रू उभे राहिले आणि जो तो चिंतातुर दिसू लागला

इतक्यात एक तापसी, अरण्यात कसारी मूर्च्छित होऊन पडली आहे, अशी बातमी घेऊन आला हें ऐकताच याज्ञवल्क्याच्या तोंडचें पाणी पळालें धावतच ते त्या तापसीला घेऊन तिकडे निघाले कात्यायनी मैत्रेयी याहि बरोबरच निघाल्या इतर लोकहि पाठोपाठ आलेच अरण्यात आल्यावर तापसीनें ती जागा दाखविली कसारी मूर्च्छित होऊन पडली होती ! मैत्रेयी व कात्यायनी धावतच तिच्याजवळ गेल्या कात्यायनी वारा घालू लागली, व मैत्रेयी सेवा करू लागली याज्ञवल्क्यानी तिचा हात धरून [illegible] पण तेथें काय ! तेथें कसारी कोठें होती ! हाय [illegible] तिचा प्रे[illegible] [illegible] कसारीचा प्रिय आत्मा केव्हाच इहलोक सोडून

# बाळ पिप्पलाद !

केसरी त्या चिमुकल्या अर्भकास अश्वत्थनारायणाच्या पदरांत घालून तेथून कशीबशी निघून गेली आणि पुढें वाट चालतां चालतां दुःखाचा आवेग असह्य होऊन मध्येंच एकाएकीं मूर्च्छित होऊन पडली आणि तेथेंच तिचें प्राणोत्क्रमण झालें ! दुर्दैवी बिचारें अर्भक ! तें अरण्यांत एकटेंच राहिलें ! आतां कोण त्याची काळजी वाहणार ? कोण त्याचा संभाळ करणार ? दोन दिवसाचें कोंवळें व तान्हुलें बाळ तें ! त्याची निगा कोण राखणार ? त्याला न्हाऊं कोण घालणार ? अंगावर कोण घेणार ? पाळण्यांत कोण निजविणार ? अर्थात् त्याचें लालन-पालन कोण करणार ? तें गोड व गोंडस बालक आतां जिवंत राहील तरी कसें ? तरी तें सुंदर लेंकरूं जीव धरून राहिलें, असें कोणीं सांगितल्यास, वाचक हो, त्यावर तुम्ही विश्वासाल काय ? तें खरें समजाल काय ? आजचें वैद्य-शास्त्र त्याला सम्मति देईल काय ? छे, हें काय भलतेंच ! विसावें शतक हें ! अडाणी नव्हे, पक्कें सुधारलेलें ! ! दोन दिवसांचें कोंवळें बालक तें काय आणि उन्हावाऱ्यांत पडून जगतें म्हणजे काय ? झूट बात ! अगदीं झूट ! !

पण परमेश्वराची लीला अशी कांहीं अगाध व विचित्र आहे कीं, त्या अचिंत्य शक्तीचा ठाव आजपर्यंत कोणालाच लागलेला नाहीं ! आणि या भौतिक शास्त्रांना तर नाहींच नाहीं ! ! अलीकडचीं हीं पाश्चात्य शास्त्रें कांहींहि म्हणोत, प्राचीन वैदिक आर्यांचा इतिहास इतका कांहीं अद्भुतरम्य व आश्चर्यजनक आहे कीं, आज आम्ही कितीहि जीव तोडून सांगितलें तरी तो तुम्हांस मुळींच पटावयाचा नाहीं. भौतिक शास्त्रांच्या चष्म्यांतून पाहणारे तुम्ही त्याला हंसाल, नाक मुरडाल, थट्टा-टैटाळणी कराल ! हें सर्व साहजिकच आहे. पण ईश्वरी लीला अतर्क्य आहे, हें मात्र कोणी विसरूं नका ! !

फार लांब कशाला, आज पंचवीस तीस वर्षांखालचीच गोष्ट घ्या. तुम्ही काय आणि आम्ही काय, रामायणांतील पुष्पक विमानाची गोष्ट ऐकून 'हं, दिली आहे वाल्मिकींनीं कांहींतरी चमचमीत लोणकडी ठेवून !' असें म्हणून सहज हंसत होतों, नव्हे काय ? पण तेंच धाडस आज कोणी करावयास तयार

महिने व्रतस्थ राहण्याचा तिनें बहाणा केला आणि त्या अवधींत आपणाला दुसऱ्याशीं बोलावयाचें नाहीं की दुसऱ्याचें दर्शन घ्यावयाचें नाहीं असें घरांत सांगून टाकलें. आणि आश्रमांतील एका स्वतंत्र पर्णकुटिकेंत जाऊन ती एकांतांत दिवस काढूं लागली. तिचे आपले नेमधर्म नेहमींच चाललेले असावयाचे म्हणून याज्ञवल्क्य काय किंवा कात्यायनी-मैत्रेयी काय कोणींच तिकडे फारसें लक्ष दिलें नाहीं. ती व्रतस्थ असतां खाणेंपिणें सगळें तिचें तीच स्वतः करीत असे. म्हणून तिच्या वाटेस फारसें कोणी जात नसत. आणि या खेपेस तर कोणीच गेले नाहींत. पुढें नवमास भरले आणि दुखावा लागला. एके दिवशीं रात्रीं ती आश्रमांतून एकाएकी नाहींशी झाली आणि पुढें काय झालें याची हकीकत वर दिलीच आहे.

कंसारी निघून गेल्यावर दोनतीन दिवस झाले असतील. ती अजिबात आश्रमांत कोठें दिसत नाहींसें पाहून याज्ञवल्क्यांनीं तिचा शोध चालविला. लोक इकडेतिकडे फिरून तिला शोधूं लागले. पण तिचा थांग ना पत्ता. कात्यायनी शोधून शोधून दमली. मैत्रेयीच्या तिच्या पर्णकुटीकडे सारख्या खेपा चालल्या होत्या. याज्ञवल्क्यहि फिरून फिरून थकले. ती कोठें गेली याचा कोणाला कांहींच तपास लागेना. दोनप्रहरपर्यंत तिचा सारखा शोध चाललाच होता. पण तिचा मागमूसहि लागला नाहीं. याज्ञवल्क्य आतां परोपरी घाबरले. कात्यायनीच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले. आणि जो तो चिंतातुर दिसू लागला.

इतक्यांत एक तापसी, अरण्यांत कंसारी मूर्च्छित होऊन पडली आहे, अशी बातमी घेऊन आला. हें ऐकतांच याज्ञवल्क्यांच्या तोंडचें पाणी पळालें. धांवतच ते त्या तापसीला घेऊन तिकडे निघाले. कात्यायनी-मैत्रेयी याहि बरोबरच निघाल्या. इतर लोकहि पाठोपाठ आलेच. अरण्यांत आल्यावर तापसीनें ती जागा दाखविली. कंसारी मूर्च्छित होऊन पडली होती! मैत्रेयी व कात्यायनी धांवतच तिच्याजवळ गेल्या. कात्यायनी वारा घालूं लागली, व मैत्रेयी सेवा करूं लागली. याज्ञवल्क्यांनीं तिचा हात धरून पाहिला. पण तेथें काय! तेथें कंसारी कोठें होती! हाय हाय! तें तिचें प्रेत होतें!! कंसारीचा दिव्य आत्मा केव्हांच इहलोक सोडून गेला होता!!! (स्कंद, द. १७४)

---

होईल काय? 'आकाशवाणी झाली' असें पुराणिकबुवांनीं सांगितलें तर आम्ही त्यांना मनांतल्या मनांत वेड्यांत काढीत असूं. जीव व जीभ नसतां वेडें आकाश बोलतें म्हणजे काय! सांगणारे मूर्ख आणि ऐकणारे तर त्याहून शतमूर्ख!! अशी चुरचुरीत टीका त्या वेळीं हटकून व्हावयाचीच! पण आज *बोलपट म्हणजे काय आहे? त्याला जीव व जीभ आहेत का?* तो जड व निर्जीव पदार्थच नव्हे का? पण त्याचें सुन्दर व सुरस गाणें ऐकण्यास चांगल्या चांगल्या शहाण्यासुरत्यांच्या आज कोन उड्यांवर उड्या पडत आहेत! सती द्रौपदीची कौरवसभेंतील करुणारव हांक द्वारकेंतील श्रीकृष्णाला सत्यभामेच्या अंतःपुरांत ऐकूं आली, असें हरिदासांनीं कीर्तनांत सांगितलेलें ऐकून आम्हांस हंसूं कोसळल्यावांचून राहावयाचें नाहीं. हा सर्व कथाभाग म्हणजे कल्पनासृष्टींतील निव्वळ तरंग समजत असूं! होय, हें सगळें खरें ना पण? तेंच आज पाहा. लंडनमध्यें पार्लमेंटांत उभे राहून आमचे राजेसाहेब सुन्दर भाषण करीत आहेत आणि आम्ही तें मुंबईंत आरामखुर्चीवर पडून मजेंत ऐकत आहोंत! केवढा चमत्कार! मग ही स्वप्नसृष्टीच झाली कीं काय? कां जादूगाराची जादू म्हणतां? वाचकांनो, आत्म्याच्या अतर्क्य शक्तींचा विसर पडलेल्या आणि केवळ जडवादावरच विसंबून राहणाऱ्या वेड्या वाचकांनो, योगविद्येच्या जोरावर सृष्टीच्या गूढ शक्तींला पाण्याप्रमाणें सहज लीलेनें खेळविणारे वैदिक ऋषी हा तुमचा ज्ञानलव दुर्विदग्ध शोचनीय मूर्खपणा पाहून न हंसतील तर काय करतील?

पाहा, येथें दोन दिवसांचें लहान लेंकरूं पाहा. त्याच्याजवळ आई नाहीं, दाई नाहीं, कीं कोणी माणूस देखील नाहीं! तरी तें मेलें नाहीं!! नीट जिवंत आहे! गुटगुटीत आहे! धडधाकट आहे! आणि चांगलें वाढत आहे! 'सुरक्षितं तिष्ठति दैवरक्षितं' म्हणतात त्याचा हा मासला पाहा. बाळ पिप्पलाद खुशाल आहे, सुरक्षित आहे आणि शुक्लपक्षांतील चंद्राप्रमाणें चांगला वाढत आहे! भगवान् अश्वत्थनारायण आपला अमृततुल्य मधुर रस पाजून त्याचें संवर्धन करीत आहे! *मग आतां काय पाहिजे?* केसरीनें ती जागाच अशी कांहीं सुंदर शोधून काढली होती कीं, तेथें मृत्युलोक नसून प्रत्यक्ष स्वर्ग होता! तेथें यक्षयक्षिणी, गंधर्व-अप्सरा व देवदेवता हिंडतफिरत व क्रीडत-रमत

होत्या! त्याचे कृपाछत्र त्या बाळासभोंवतीं अखंड पसरलेलें होतें आणि त्यांची प्रेमदृष्टि सभोंवर पहारा करीत होती! तशांत पिप्पलाद म्हणजे तरी कोण? प्रत्यक्ष देवगुरु बृहस्पतीच! या अज्ञानी मानवजातीच्या उत्कर्षार्थ व उद्धारार्थ पवित्र मोक्षशास्त्राचे सुंदर कपाट सताड उघडून ठेवण्यासाठीं येथें प्रत्यक्ष अवतरलेले! मग बाळ पिप्पलादाचें बरें वाईट कसें होणार? छे, ती कल्पना देखील मनांत आणूं नका!

कुमार पिप्पलाद वाढतां वाढतां तो आतां चांगला आठ वर्षांचा झाला होता. तरी त्यास अद्याप मनुष्याचें दर्शनहि नव्हतें. दिवसा तो एकटाच झाडाच्या जवळपास हिंडे फिरे. झाडाफुलांशीं व माती दगडांशीं खेळ खेळे. तेथील फळफळावळ खाई. झऱ्यातील पाणी पिई. आणि सांज झाली कीं त्या अश्वत्थाच्या कोटऱ्यांत येऊन राही.

---

## बालकानें कृत्या सोडली !

असें होतां होतां एके दिवशी नारदांची स्वारी सहज फिरत फिरत तेथें आली. तेथें येतांच ती सूर्यासारखी तेजस्वी सुंदर बालमूर्ति एका झाडाखालीं खेळत असलेली त्यांना दिसली. तेथें त्या एकट्या लहान मुलाला पाहून आणि जवळपास कोणी नसलेलें अवलोकन करून ते चकित झाले. त्याच्याजवळ जाऊन त्यांनीं त्यास विचारले कीं, 'बाळ, तूं एकटाच इथं कसा? जवळपास कुणी दिसत नाहीं. मग तू इथ कसा आलास? तुझे आईबाप कोण व कुठं आहेत?'

नारदांना पाहून त्या बालकास विस्मय वाटला. अद्यापपर्यंत त्यानें द्विपाद प्राणी पाहिलाच नव्हता. तेव्हां नारदाकडे त्यानें एकवार आपादमस्तक विस्मयानें नीट न्याहाळून पाहिलें. आणि शेवटीं त्यांस म्हटलें कीः–'नाहं जानामि पितरं मातरं नच बान्धवम्'–मला बाप माहीत नाहीं, आई माहीत नाहीं, बन्धु माहीत नाहीं, कोणीच माहीत नाहीं! फार काय, हा प्रश्न करणारे आपण तरी कोण हें देखील मला माहीत नाहीं!'

नारदांना हें ऐकून आश्चर्य वाटलें. मुलगा पाहावा तर असा तेजस्वी आणि त्याचें भाषण ऐकावें तर तें असें चमत्कारिक. हा प्रकार पाहून त्यांना प्रथम

थोडासा प्रश्न पडण्यासारखा झाला पण काहीं झालें तरी ते त्रिकालज्ञानी असल्यामुळें अंतर्दृष्टीनें त्यानीं हें सगळें जाणलें आणि तो कोण, कसा जन्मला आई कोण, बाप कोण, आईचें काय झालें, बाप कोठें आहे वगैरे सर्व हकीकत त्या मुलास जवळ घेऊन साद्यंत सांगितली

बाल पिप्पलाद आता दुःखित झाला तो रडू लागला आपण असे कसे पापी जन्मलों म्हणून शोक करू लागला व आता आपण प्राणत्याग करणार, असा हट्ट धरून बसला नारदानीं त्याचें सान्त्वन केलें आणि यात तुझा अथवा कोणाचाच दोष अगर अपराध नाहीं, तू निष्पाप व निष्कलंक आहेस, हा दैवाचा खेळ आहे आणि तुझी अशी दशा व्हावयास शनि कारण आहे असें सांगितलें

हे ऐकून त्यास शनीचा राग आला व त्यानं त्या सूर्यपुत्रास रागानें वर पाहून खालीं जमिनीवर पाडून त्याचें पारिपत्य केलें पुढं शनिदेवानें करुणा भाकिली आणि म्हणून 'बारा वर्षांच्या आतील मुलास याउप्पर पीडा देणार नाहीं' असें त्याजकडून वचन घेऊन त्यास सोडून दिलें (स्कंद, ६–१७४)

नंतर नारदमुनि तेथून निघून गेल्यावर पुढें तो पिप्पलाद आपल्या जन्म वृत्तांताविषयी विचार करीत बसला तो लहान होता, बाल होता हें खरं, पण त्याची आत्मशक्ति मोठी प्रखर होती प्रत्यक्ष देवगुरूचा अवतारच तो! मग त्याचें आत्मसामर्थ्य काय सांगावयाचें? विचार करता करता त्याला काय वाटलं कोण जाणे, याज्ञवल्क्याचा त्याला राग आला चटकन् स्वारी उठली, आणि अग्निकुंड पेटवून हात जोडून ध्यानस्थ होऊन बसली

काहीं वेळानें त्या अग्निकुंडातून एक कृत्या निर्माण झाली! अबब! काय भयंकर ती! काय अक्राळविक्राळ स्वरूप तिचें! तिनें गळ्यात धगधगीत ज्वाळेच्या लालच लाल माळा घातलेल्या होत्या! आणि अग्नीप्रमाणच ती प्रखर व तेजस्वी दिसत होती!! अग्नींतून बाहेर येताच ती त्यास म्हणाली 'बाळा, मला का बोलाविलेंस तें सांग मी काय करूं तें सांग लवकर सांग समुद्र शोषू का पर्वताचें पीठ करूं? पृथ्वीला वेष्टन घालू का नभोमंडळ खालीं पाडू? कोणाच्या डोक्यावर जाऊन आदळू का कोणाचे प्राण हिरावून घेऊन येऊ? सांग, बाळा, काय करू तें मला सांग'

हें तिचें भाषण ऐकून पिप्पलादानें डोळे उघडले, तों काय भयंकर कृत्या पुढें उभी! तो तिला म्हणाला, ' कृत्ये, आलीस ? ठीक झालें. मी तुझेंच चिंतन करीत होतों. बरी वेळेवर आलीस. जा आतां आणि मिथिलेमध्यें याज्ञवल्क्य आहे त्याचा प्राण घेऊन ये ! जा, नीघ बघी ! '

कृत्याच ती! एवढा हुकूम होतांच वाऱ्याप्रमाणें सटदिशी ती तेथून निसटलीच ! आणि नभोमंडळ थरथर कांपवीत निघालीच याज्ञवल्क्यांकडे ! ! ( स्कंद, ५. ३–४२ )

---

## याज्ञवल्क्यांची तारांबळ

आपल्यावर कृत्या येत आहे, हें याज्ञवल्क्यांस समजतांच त्यांचें धाबे दणाणलें, आणि ते धांवतच जनक राजाकडे रक्षणार्थ गेले. पण तेथें त्यांची निराशा झाली. जनकांनीं हें काम आपल्या आंवाक्याबाहेरचें आहे, असें चट सांगून टाकलें. याज्ञवल्क्य घाबरले आणि ते आतां ब्रह्मदेवांकडे गेले. तेथेंहि त्यांना अभय मिळालें नाहीं. कृत्या पाठीस लागली आणि योगीराज संकटांत पडले. त्यांनीं आतां विष्णूकडे धांव घेतली. पण त्याचाहि कांहीं उपयोग झाला नाही. ते हताश झाले आणि पुढें काय करावें व कोठें जावें, हें त्यांस कळेना. क्षणभर ते हतबुद्ध झाल्यासारखे होऊन जागच्या जागींच खिळून बसले. पण इतक्यांत त्यांचें सुदैव म्हणूनच कीं काय त्यांना शंकराची आठवण झाली. मग आतां विलंब कसला ? उठलेच तेथून आणि लागले रस्त्याला. (स्कंद, ५, ३-४२)

---

## शंकरांनीं वरदहस्त ठेविला !

देवांत देव महादेव !! काय त्यांचा महिमा ! आणि केवढी भक्तवत्सलता !! शरणागताला अभय मिळालें नाहीं, असें कधीं झालेंच नाहीं. याज्ञवल्क्य आतां शंकरांच्या पायांजवळ आले, त्यांना नमस्कार केला आणि बोलायला वेळ नाहीं असें समजून आणि कृत्या आपल्यावर झडप घालणार हें पाहून

निश्चय, जसा निश्चय तसें कर्म, आणि जसें कर्म तसें फळ. या लोकीं मनुष्य जें काय कर्म करतो त्याचें फळ त्याला निदान परलोकीं तरी खास मिळतेंच मिळतें. आणि त्याचा उपभोग झाला म्हणजे पुन्हां त्याला या लोकीं परत यावें लागतें. याप्रमाणें जे वासनायुक्त असतात त्यांच्या मागचें हें भवचक्र कांहीं केल्या चुकतां चुकत नाहीं. ही सकाम कर्माची गोष्ट झाली.

'जनका, आतां जे वासनारहित आहेत त्यांची गोष्ट सांगतों ऐक. जो वासनारहित झाला, ज्याच्या इच्छा नाहींशा झाल्या अथवा पूर्ण झाल्या त्याचे प्राण उत्क्रमण पावत नाहीत. तो या स्थितींत ब्रह्मस्वरूप असल्यामुळें ब्रह्माप्रतच जातो. ज्याप्रमाणें वारुळामध्यें सर्पानें टाकिलेली कात असते त्याप्रमाणें आत्मा सोडून गेल्यावर हें शरीर होतें. शरीराहून भिन्न व अमर असा जो प्राण तो ब्रह्म होय..'

जनक म्हणाला, 'भगवन्, मी आपणांला हजार गाई देतों. आणखी मला ज्ञानोपदेश करा.'

याज्ञवल्क्य म्हणाले, 'हे जनका, हा मोक्षमार्ग फार सूक्ष्म आहे. हा फार प्राचीन आहे. हा मार्ग मीं प्राप्त करून घेतला आहे. मी याच्याकडेपर्यंत जाऊन पोंचलों आहें. जे ब्रह्मज्ञानी आहेत ते देह पडल्यावर या मार्गानें मोक्षाप्रत जातात. हा एकच मार्ग ब्रह्मानें पूर्ण आहे. जे ब्रह्मज्ञानी आहेत, पुण्यात्मे आहेत व जे तेजस्वी आहेत ते याच मार्गानें ब्रह्माप्रत जातात. जे केवळ कर्मठ असतात ते अत्यंत गाढ अशा अंधःकारामध्यें प्रवेश करतात. आणि जे केवळ ज्ञानामध्येंच रत असतात ते त्याहीपेक्षां घोर अशा अंधःकारामध्यें गडप होतात! जे बिचारे अज्ञानी असतील ते तर अंधःकारयुक्त व सुखरहित अशा नीच लोकाप्रत जाऊन तेथें खितपत पडतात यांत नवल तें काय?

हे राजा, मी ब्रह्म आहें असें ज्याला ज्ञानविज्ञान झालें तो प्रत्यक्ष सृष्टिकर्ताच होय. हें विश्व सर्व त्याचा आणि तो या सर्व विश्वाचा आत्मा होय. उत्कष., नें हें ब्रह्म आम्ही या मृत्युलोकांतच जाणलें. हें जर जाणलें नसतें तर आमचा मोठा घात झाला असता. हें जे जाणतात ते अमर होतात, आणि जे जाणत नाहींत ते दुःखी होतात. हें ब्रह्म मी जाणतों म्हणूनच मीही अमरच आहें. या लोकांत विविधत्व आहे असें जो समजतो त्याला जन्म-

या वरील संवादातील तात्पर्य घेऊनच गीतेमध्यें 'पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति ' हा प्रसिद्ध श्लोक गुंफण्यात आला असावा, हें निराळें सांगावयास नकोच शिवाय महाभारतांतहि शांतिपर्वामध्यें अध्याय ३१५ ते ३२३ पर्यंत याज्ञवल्क्यजनकसंवाद आला असून त्यांत सृष्टीचें वर्णन, कालगणना, जगाचा प्रलय, अध्यात्मविद्या, प्रकृति पुरुषविचार व मीमांसा इत्यादि विषय आले असून शेवटच्या अध्यायांत त्यांनीं आपलें थोडेंसें आत्म चरित्रहि कथन केलें आहे (भा शां प ३२३)

आता बृहदारण्यकांत त्यांनीं जनकास संसारातून मुक्त कसें होता येईल व मरणसमयीं मनुष्याची काय अवस्था होते आणि मोक्ष कशाला म्हणतात या विषयीं जें ज्ञान सांगितलें आहे त्याचा तात्पर्यानें अनुवाद करतो याज्ञवल्क्य म्हणाले, ' जनका, ऐक, अंतकालीं मनुष्याची काय अवस्था होते ती नीट लक्ष देऊन ऐक हा देह जरेनें वा रोगानें बलहीन झाला म्हणजे आत्माहि बल रहित होतो मनुष्याचा अंतकाळ जवळ आला म्हणजे हीं इंद्रियें आत्म्याजवळ येऊन जमतात त्यांना घेऊन तो हृदयामध्यें येतो त्या वेळीं हा इंद्रिय समुदाय सगळा आत्म्यामध्यें लीन झालेला असतो म्हणून त्याला बाहेरची प्रज्ञा असत नाहीं डोळ्याला दिसत नाहीं कानाला ऐकूं येत नाहीं जिभेला बोलता येत नाहीं हीं सर्व इंद्रियें जणूं काय प्रज्ञारहित झाल्यासारखीं असतात अंतकाळ जवळ आला म्हणजे आत्मा हृदयामधून बाहेर पडून चक्षु अगर मस्तक अथवा इतर अवयवद्वारा देह सोडून निघून जातो- त्याच्या मागोमाग प्राण जातो प्राणामागून इंद्रियें जातात त्याचप्रमाणें ज्ञान, कर्म व वासना हींहि आत्म्याबरोबरच निघून जातात।" (बृ अ ४ ब्रा ४–२)

पुन याज्ञवल्क्य सांगतात, ' राजा, हा आत्मा म्हणजे ब्रह्म आहे हा विज्ञानमय आहे, मनोमय आहे, प्राणमय आहे, तसाच तो आपोमय आहे, वायुमय आहे, तेजोमय आहे, आकाशमय आहे, त्याचप्रमाणें तो काममय आणि धर्ममयहि आहे जसें कर्म करील तसा तो होतो (यथाचारी तथा भवति) पुण्यकर्म करणारा पुण्यवान् होतो. पापकर्म करणारा पापी होतो. आणि म्हणून हा पुरुष काममय आहे, असें म्हणतात जशी इच्छा तसा

निश्चय, जसा निश्चय तसें कर्म, आणि जसें कर्म तसें फळ. या लोकीं मनुष्य जें काय कर्म करतो त्याचें फळ त्याला निदान परलोकीं तरी खास मिळतेंच मिळतें. आणि त्याचा उपभोग झाला म्हणजे पुन्हां त्याला या लोकीं परत यावें लागतें. याप्रमाणें जे वासनायुक्त असतात त्यांच्या मागचें हें भवचक्र कांहीं केल्या चुकतां चुकत नाहीं. ही सकाम कर्माची गोष्ट झाली.

'जनका, आतां जे वासनारहित आहेत त्यांची गोष्ट सांगतों ऐक. जो वासनारहित झाला, ज्याच्या इच्छा नाहींशा झाल्या अथवा पूर्ण झाल्या त्याचे प्राण उत्क्रमण पावत नाहींत. तो या स्थितींत ब्रह्मस्वरूप असल्यामुळें ब्रह्माप्रतच जातो. ज्याप्रमाणें वारुळामध्यें सर्पानें टाकिलेली कात असते त्याप्रमाणे आत्मा सोडून गेल्यावर हें शरीर होतें. शरीराहून भिन्न व अमर असा जो प्राण तो ब्रह्म होय.'

जनक म्हणाला, 'भगवन्, मी आपणांला हजार गाई देतों. आणखी मला ज्ञानोपदेश करा.'

याज्ञवल्क्य म्हणाले, 'हे जनका, हा मोक्षमार्ग फार सूक्ष्म आहे. हा फार प्राचीन आहे. हा मार्ग मीं प्राप्त करून घेतला आहे. मी याच्याकडेपर्यंत जाऊन पोंचलों आहें. जे ब्रह्मज्ञानी आहेत ते देह पडल्यावर या मार्गानें मोक्षाप्रत जातात. हा एकच मार्ग ब्रह्मानें पूर्ण आहे. जे ब्रह्मज्ञानी आहेत, पुण्यात्मे आहेत व जे तेजस्वी आहेत ते याच मार्गानें ब्रह्माप्रत जातात. जे केवळ कर्मठ असतात ते अत्यंत गाढ अशा अंधःकारामध्यें प्रवेश करतात. आणि जे केवळ ज्ञानामध्येंच रत असतात ते त्याहीपेक्षां घोर अशा अंधःकारामध्यें गडप होतात! जे बिचारे अज्ञानी असतील ते तर अंधकारयुक्त व सुखरहित अशा नीच लोकाप्रत जाऊन तेथें खितपत पडतात यांत नवल तें काय?

हे राजा, मी ब्रह्म आहें असें ज्याला ज्ञानविज्ञान झालें तो प्रत्यक्ष सृष्टिकर्ताच होय. हें विश्व सर्व त्याचा आणि तो या सर्व विश्वाचा आत्मा होय. जनका, तें हें ब्रह्म आम्ही या मृत्युलोकांतच जाणतों. हें जर जाणलें नसतें तर आमचा मोठा घात झाला असता. हें जे जाणतात ते अमर होतात, आणि जे जाणत नाहींत ते दुःखी होतात. हें ब्रह्म मी जाणतों म्हणूनच मीही अमरच आहें. या लोकांत विविधत्व आहे असें जो समजतो त्याला जन्म-

मृत्यूची बाधा चुकत नाहीं. हें शाश्वत ब्रह्म सर्वत्र एकरसात्मक आहे, असें अनुभवानेंच जाणलें पाहिजे. शहाण्यानें त्याचें ज्ञान करून घ्यावें. उगीच पुष्कळ बडबडण्यांत अर्थ नाहीं. कारण वाचालता ही व्यर्थ वाणीला शीण देणारी मात्र आहे.

हा आत्मा निर्मळ, आकाशाहूनहि सूक्ष्म, जन्मरहित, महान् व शाश्वत असा आहे. तो अजब व श्रेष्ठ आहे. हा इंद्रियांमध्यें व अंतःकरणांतहि आहे. सर्व विश्व याच्या स्वाधीन असतें. हा सर्वांचा स्वामी व अधिपति आहे. पुण्यकर्मानें हा वाढत नाहीं व पापकर्मानें कमी होत नाही. हा सर्वेश्वर आहे, भूताधिपति आहे व भूतपाल आहे. वेदाच्या अध्ययनानें, यज्ञानें म्हणजे स्वार्थत्यागानें, दानानें म्हणजे द्रव्यत्यागानें, तपानें व श्रद्धेनें ज्ञानी लोक याला जाणण्याची इच्छा करितात. आणि याला जो जाणतो तोच खरा मुनि होय.

राजा, 'नेति नेति' म्हणतात तो हा आत्मा बरें. हा अग्राह्य आहे, म्हणून याला ग्रहण करतां येत नाहीं. अशीर्य आहे म्हणून फाडतां येत नाहीं. असंग आहे म्हणून जोडतां येत नाहीं. असित आहे म्हणून व्यथा पावत नाहीं. विनाश पावत नाहीं. मीं पाप केलें म्हणून ज्ञानी मनुष्याला पश्चात्ताप होत नाहीं किंवा पुण्य केलें म्हणून हर्षहि होत नाहीं. ब्रह्मज्ञ हा सर्व पापपुण्य तरून जातो. कृताकृत त्याला ताप देत नाहींत. ब्रह्म जाणणारा हा पापकर्मापासून अलिप्त असतो, म्हणून तो शांत, दांत, उपरत, तितीक्षु, समाधानयुक्त होत्साता आपल्यामध्येंच आत्म्याचें स्वरूप पाहतो. हें सर्व आत्मा आहे असें पाहतो. सर्व पापें हा भस्म करितो. पापरहित, इच्छारहित व संशयरहित असा हा ब्रह्मज्ञ असतो. हाच ब्रह्मलोक होय! राजा, तूं या लोकाप्रत प्राप्त झाला आहेस!'

जनक म्हणाले, 'भगवन्, एक हजार गाई देतों आणि मी व माझे प्रजाजन हे आपले दास आहोंत.'

याज्ञवल्क्य म्हणाले, 'जनका, हाच आत्मा महान् व जन्मरहित असा आहे. प्राण्यांना हा कर्माप्रमाणें फळ देतो. हा आत्मा म्हणजे फार काय सांगूं, अजर, अमर व अभय असें प्रत्यक्ष ब्रह्मच आहे! अभय हेच ब्रह्म होय!! हें जो जाणतो तो अभयरूपी ब्रह्मच होतो!!!' (बृ. अ. ४. ब्रा. ४.)

किती सुंदर व मननीय विचार हे! हें ज्ञानामृत पिऊन जनक राजे तर धन्य झाले असतीलच! आणि कोण खरें होणार नाहीं? ज्याला वरील विचार वाचून क्षणमात्र तरी साश्चर्य आल्हाद व आनंद वाटणार नाहीं त्याला खरोखर अंतःकरणच नाहीं असेंच म्हटलें पाहिजे!

योगीश्वरांनीं वर जो जनकास उपदेश केला आहे तो म्हणजे कांही कल्पना-सृष्टि नव्हे, मनोराज्य नव्हे, कीं भाकडकथा नव्हे! तो सत्य आहे! तर्कशुद्ध आहे! शास्त्रसिद्ध आहे! आणि प्रत्यक्ष अनुभवगम्य आहे!! आत्मा जन्मत नाहीं आणि आत्मा मरत नाहीं! जन्म म्हणजे उत्पत्ति नव्हे आणि मरण म्हणजे नाश नव्हे! हें याज्ञवल्क्यांनी योगदृष्टीनें आधीं जाणून मग जगास जाहिर केलें. आणि आज शास्त्रज्ञ तरी काय सांगत आहेत? आजचे प्रसिद्ध अध्यात्मशास्त्रज्ञ सर ऑलिव्हर लॉज हे झाले तरी मृत्यूविषयीं काय सांगत आहेत? ते आज शास्त्राचा विचार घेऊनच सांगत आहेत कीं, Death is separation, not extinction मरण म्हणजे आत्म्याचा वियोग, नाश नव्हे. हें आतां कोठें पाश्चात्य शास्त्रज्ञ मनांत हळूंच पुटपुटूं लागले आहेत. आणि हीच गोष्ट योगीश्वरांनीं आज पांच हजार वर्षांपूर्वींच, जाणून पाहून अनुभवून जगास जाहीर करून ठेविली! मग त्यांचें साभिमानपूर्वक कौतुक आम्हीं कां करूं नये?

ही याज्ञवल्क्यांची शिकवण इतकी सुंदर, इतकी व्यापक, इतकी खोल, इतकी पूर्ण व प्रभावी आहे कीं, तसा सुंदर उपदेश तुम्हांला जगांतील आज-पर्यंतच्या कोणत्याहि तत्त्ववेत्याच्या ग्रंथांत पाहावयास सांपडणार नाहीं! फार काय, आज जगांत जेवढे म्हणून धर्मसंस्थापक होऊन गेले आणि जेवढे म्हणून तत्त्वशास्त्रज्ञ झाले त्या सर्वांच्या उपदेशग्रंथांत व विचारसरणींत कळत अगर न कळत, समजून अगर नुमजून या दिव्य विभूतीच्या सुंदर व सर्वव्यापी तत्त्वज्ञानाची व नीतिबोधाची मधुर झांक मारीत आहे असें म्हटलें तर ती चूक होईल काय? असो. आतां आपण त्यांच्या शतपथ ग्रंथाकडे थोडेंसें वळूं.

# शतपथाची उभारणी

ही शुक्लयजुर्वेदाची मांडणी स्वभावतःच साधी, सुगम व सुटसुटीत असल्यामुळें, लोकांत तो अधिक प्रिय होत चालला. आणि दिवसेंदिवस समाज त्यास अधिकाधिक चिकटूं लागला. जेथें जेथें यज्ञसमारंभ होत तेथें तेथें वाजसनेय अध्वर्यु तर प्रयोगग्रंथ हा शुक्लयजुर्वेद, अशी स्थिति प्राप्त झाली. आणि यामुळें या वेदाचें महत्त्व व प्राबल्य वाढत जाऊन शेवटीं तो जगद्वंद्य झाला. तशांत हा वेद साक्षात् सूर्यनारायणापासून प्राप्त झाला असल्यामुळें आणि क्षत्रिय हे सूर्यवंशी असल्यामुळे या वेदासंबंधीं त्यांना अधिक प्रेम व आत्मीयता वाटावी व वाजसनेयांना त्यांनीं जवळ करावें हे स्वाभाविकच होय. आणि वस्तुस्थितिहि पण तशीच घडून आली.

तेव्हां, त्या वेदांत सांगितलेल्या मंत्रांचा विनियोग कसा करावा, केव्हां करावा, कां करावा व कोठें करावा, यज्ञ म्हणजे काय, त्यांचे प्रकार किती व प्रयोग कसे करावेत, यांविषयीं याज्ञिकांना बोध व्हावा आणि जगाला शुक्लयजुर्वेदाची आणि वैदिक तत्त्वज्ञानाची महति व माहिती कळावी म्हणून त्यांनी सरस्वतीप्रसादानें सोपपत्तिक व सरहस्य असा एक सर्वांगसुंदर ग्रंथ तयार केला. यासच शतपथ ब्राह्मण असें म्हणतात ( शां अ. ३२३, २२-२३ ). हा ग्रंथ अखिल वैदिक वाङ्मयात अत्यंत मोठा, प्रौढ व भारदस्त असून यज्ञसंबंधीं विविध माहितीनें व सुंदर तत्त्वज्ञानविचारानें पूर्ण ओथंबलेला आहे. याची एकंदर चौदा कांडें असून शंभर अध्याय आहेत. आणि या शंभर अध्यायांवरूनच यास 'शतपथ' हे नांव प्राप्त झालें आहे. याज्ञवल्क्यांनीं यांत आपले बुद्धिवैभव व प्रतिभाचातुर्य संपूर्ण ओतलें असून त्यांत ग्रथित केलेले धार्मिक, याज्ञिक, व तात्त्विक विचार मोठे मार्मिक व माननीय असून, त्यांतल्यात्यात वैदिक तत्त्वज्ञानाचा तर पूर्ण कळसच झाला आहे !

वाचकहो, आज जगांत तुम्हां अनेक धर्म पाहतां. इस्लामी, ख्रिस्ती, बौद्ध असे कैक धर्म आहेत. पण आज ते कोणत्या स्थितीत आहेत बरें ? तुम्हीं आज त्यांतला कोणताहि धर्मग्रंथ उघडून पाहा. त्यांत उभे केलेले ज्ञानदुर्ग

या विसाव्या शतकांतील प्रचंड ज्ञानशक्तीमुळे व अपूर्व शास्त्रीय शोधांपुढें पटापट ढांसळून जमीनदोस्त झाले आहेत अगर होत आहेत, हें तुम्ही प्रत्यक्ष पाहत नाहीं काय ? या ज्ञानप्रधान व शास्त्रीय प्रगतीच्या काळांत या सर्व धर्मांची पुंगी आज जवळ जवळ बंदच पडल्यासारखी झाली आहे, असें म्हणण्यास काय हरकत आहे ? नांवाला मात्र ते जीव धरून आहेत. पण आपल्या वैदिक धर्माची गोष्ट मात्र असांतली नाहीं, हें आम्हां हिंदूंस भूषणावह व अभिमानास्पद नव्हे काय ?

वैदिक ऋषींनीं आपल्या अतुल ज्ञानसामर्थ्यानें, लोकोत्तर तर्कबुद्धीनें, अपूर्व आत्मस्फूर्तीनें, सूक्ष्म सृष्टिनिरीक्षणानें, शुद्ध विचारसरणीनें आणि अखंड कर्मयोगानें या विश्वाची आणि विश्वगत पदार्थांची सूक्ष्म फोड करून बसविलेले वैदिक सिद्धांत, काढलेले तात्त्विक निर्णय शहाणपणाचा व शास्त्रीय शोधांचा तोरा मिरविणाऱ्या या विसाव्या शतकांतल्या महान् महान् शास्त्रज्ञांना व जाड्या जाड्या तत्त्ववेत्त्यांनाहि मोह पाडीत आहेत, हें केवढें आश्चर्य ! या आमच्या योगीश्वरांच्या तत्त्वज्ञानाकडे क्षुद्र अगर वक्र दृष्टीनें पाहण्याची आजतरी अशी कोणाची छाती आहे ? आज आम्ही हें कांहींतरी अंध अभिमानानें लिहितों असें नव्हे, तर जगांतील सर्व विचारी विद्वान् व तत्त्ववेत्तेहि हेंच म्हणत आहेत.

फार लांब कशाला, आज जगद्गुरूचें पवित्र ब्रीद धारण करून जगभर फिरणारे श्री कृष्णमूर्ति यांचेकडे पाहा. ही थोर विभूति जगभर हिंडून सर्व सुधारलेल्या देशांत ज्ञानामृत पाजीत संचार करीत आहे. आणि ते जातील तेथील लोक—हजारों लोक—तें ज्ञानामृत लुटण्यासाठीं झुंडीच्या झुंडीनें उड्यांवर उड्या मारीत आहेत, हें तुम्ही वर्तमानपत्रांतून वाचत आहां ना ? पण त्यांच्या त्या दिव्य उपदेशांतील हें मधुर अमृत कोणीं तयार केलें व कोठें पैदा झालें त्याची तुम्हांला जाणीव आहे काय ? फार दूर नको, हा योगीश्वरांचा शतपथ ग्रंथ तेवढा उघडून पाहा म्हणजे कृष्णमूर्तींनीं हें ज्ञानभांडार कोठून व कसें लुटलें, हें तुम्हांस कळून येईल. ही आमची चिमुकली, यजुर्मणिमाला वाचा म्हणजे वेदांत काय जादू आहे, हें तुम्हांस समजून येईल. या वैदिक ज्ञानसूर्यांकडे पाहून सर्व शास्त्रज्ञांचे व सर्व विद्वानांचे डोळे दिपून गेले

आहेत, ही गोष्ट कांहीं आज नव्यानेंच सांगितली पाहिजे असें नाहीं. याज्ञवल्क्य ऋषींचे सामाजिक, धार्मिक, अध्यात्मिक व तात्त्विक विचार काय आहेत याचें सुटसुटीत विवेचन आम्हीं 'शतपथ पुष्पांजली' या ग्रंथांत विस्तरशः व विभागशः करणार असल्यामुळे त्यांचा येथें विस्तार करण्याच्या भरीस पडत नाहीं. मिळून मुद्दा काय तर हें योगीश्वरांचें तत्त्वज्ञान जोंपर्यंत अभंग व अजिंक्य आहे तोंपर्यंत खऱ्या जगद्गुरूचा मान व अधिकार एकट्या याज्ञवल्क्यांकडेच राहणार! बाकीचे सर्व आडनांवाचेच जगद्गुरु होत, असें म्हटल्यास त्यांत अतिशयोक्ति मुळींच होणार नाहीं.

---

## हें सर्व गृहस्थाश्रमांतच

याज्ञवल्क्यांचा संसार आतां घरी चांगला वाढला होता. कात्यायनीला चंद्रकांताशिवाय आणखी महामेघ व विजय असे दोन मुलगे झाले होते. मैत्रेयीला मूलबाळ कांहीं नव्हतें तरी ती दुःखीकष्टी अशी दिमत नव्हती. कात्यायनीचा संसार तो तिचाच संसार झालेला होता. हीं सर्व मुलें आईपेक्षां मैत्रेयीलाच अधिक चिकटून असत. येवढा तिनें त्या मुलांचा लळा लावून घेतला होता. कात्यायनीनें मागें म्हटल्याप्रमाणें दोघींहि एकजीव होऊन योगीश्वरांची सेवा करण्यांत च गृहकृत्यांत दक्ष झाल्या होत्या. सवत हा शब्द त्या दोघींनीं आजन्म उच्चारला नाहीं, आणि तो याज्ञवल्क्यांनीं ऐकिला नाहीं. कात्यायनीचें थोर अंतःकरण व मैत्रेयीचें मनमिळाऊपण या दोघींच्या दोन सद्गुणांमुळें योगीश्वरांचें निवासस्थान सदैव शांत व प्रसन्न दिसत होतें. आणि म्हणून बाहेरचें प्रचारकार्य त्यांना इतकें सुसंघटित व सुव्यवस्थित करतां आलें. या कामांत त्यांना मैत्रेयीची अपूर्व मदत मिळत गेली. तिचा स्वभाव व अंतःकरणवृत्ति त्यांच्या स्वभावाशीं अधिक सुसंगत व संपोषक असल्यामुळें त्यांचा लोभ तिच्यावर अधिकाधिक व्यक्त होत चालला. आणि ती त्यांच्या कार्यांत मोठी सहायकर्ती झाली.

योगीश्वरांचें कार्यसामर्थ्य व कर्मकौशल्य मोठें प्रशंसनीय खरें. केवढा त्यचा व्याप आणि काय त्यांची कर्तव्यतत्परता! नुसतें शतपथ ब्राह्मण

होळ्यानीं पाहूनच मनुष्य घाबरून जातो ! आणि तें उघडून त्यातील ज्ञान-पिसुष्ट पाहील तर मग काय पुसूच नये ! त्याच योगसामर्थ्य झालें तरी तसेंच मोठें प्रचंड होतें आणि काम करण्याची हौस म्हणजे तेथें सर्वांना हातच टेकावे ! आपल्या अगड कर्मयोगानें योगीश्वरानीं ज्ञानमेरूचें अत्युच शिखर गाठलें होते, ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे विशेषत. ही गोष्ट गृहस्थाश्रमाला नाक मुरडणाऱ्या भगव्या सन्याशानीं मनन करण्यासारखी आहे, असें म्हटलें तरी चालेल. ते कर्मनिष्ट तर होतेच, पण नुसत्या कर्मातच त्यानीं आपलें सर्व आयुष्य गुतविलें होतें, असें दिसत नाहीं मात्र कर्माच्या जोरावर आणि कर्म करता करताच त्यानीं ज्ञानाचा गौरीशकर गाठला होता, हे मात्र खरें कर्म श्रेष्ठ का ज्ञान श्रेष्ठ, याविषयीं आम्हा हिंदूमध्यें नेहमी शुष्क वाद मानून राहिलेला असतो. पण याज्ञवल्क्यानीं या प्रश्नाची मोठ्या खुबीदार रीतीने वासलात लाविली असून ती वसिष्ठवचनात सागावयाची म्हणजे 'उभाभ्या-मेव पक्षाभ्या यथा खे पक्षिणा गति । तथैव ज्ञानकर्माभ्या जायते परम पदम् ॥१'– पक्षी जसा आपल्या दोन्ही पखाच्या साहाय्यानें वर आकाशात यथेच्छ सचार करितो, तद्वत् ज्ञान व कर्म या दोहोंच्या साहाय्यानें मनुष्यास परमपदाची म्हणजे मोक्षपदाची प्राप्ति करून घेता येते यालाच ज्ञानकर्म समुच्चयवाद म्हणतात अलीकडे सन्याशी लोकानीं कर्माला दुय्यम स्थान देऊन ज्ञानाची फाजील महति वाढविली आहे ती कशी निर्मूल आहे, याचें खुद्द याज्ञवल्क्यच एक प्रत्यक्ष उदाहरण आहेत प्रपच टाका म्हणणाऱ्या सतमह-ताचें व बुवा-वैराग्याच इकडे लक्ष जाईल काय ?

योगीश्वर तत्त्वज्ञानात कुशल कर्णधार होते, येथेंच नसून तितकेच ते व्यव-हारातहि मोठे चतुरस्र पडित होते मनुष्याच्या स्वभावाची व गुणाची त्यास चागली पारख असून समाजात कोणीं कर्मे वागल तर व्यक्तीचें व समाजाचें ऐहिक व पारलौकिक हित व कल्याण होईल, यावद्दल त्यानीं एक नियमरूप ग्रथ लिहून ठेविला आहे या ग्रथाचें नाव याज्ञवल्क्यस्मृति असें आहे त्याचे तीन अध्याय असून पहिल्यात आचार, दुसऱ्यात व्यवहार व तिसऱ्यात प्रायश्चित्त सागितलें आहे या स्मृतीवर आजपर्यंत अनेक विद्वानाच्या टीका व प्रबध झालेले असून, त्यात विज्ञानेश्वराची 'मिताक्षरा' ही सुप्रसिद्ध आहे

शिवाय अपरार्काची टीकाही मोठी वाचनीय आहे. आज हिंदुधर्मशास्त्रांत याज्ञवल्क्यस्मृतीला जो मान व जें महत्त्व आहे तसें इतर स्मार्त ग्रंथांस क्वचितच आहे, ही गोष्ट निदान कायदेपंडितांस तरी निराळी सांगावयास नकोच.

जातां जातां येथें हेंहि सांगितलें पाहिजे कीं, हल्लीं याज्ञवल्क्यस्मृति म्हणून जो ग्रंथ उपलब्ध आहे तो खुद्द याज्ञवल्क्यांच्या हातचा जशाचा तसाच आहे कीं काय, याबद्दल आधुनिक विद्वानांत वाद आहे. या ग्रंथाचें आज जें श्लोकबद्ध स्वरूप दृष्टीस पडतें त्यावरून पाहतां ही स्मृति अजमासें इसवीसनापूर्वी दुसऱ्या अगर पहिल्या शतकाच्या सुमारास लिहिली गेली असावी, असें ऐतिहासिक अनुमान काढण्यांत येतें. आणि तें एका परीनें सयुक्तिकहि आहे, अशी आमची समजूत आहे. हल्लींचा ग्रंथ योगीश्वर याज्ञवल्क्यांच्या हातचा जशाचा तसाच नसला तरी ती मूळ याज्ञवल्क्यांच्या सूत्रांची सुधारून वा रूपांतर करून काढलेली नवीन आवृत्ति असावी, असें धरून चालण्यास कोणतीच हरकत दिसत नाहीं. आतां मूळ सूत्रें उपलब्ध नाहींत हें खरें, पण असे किती तरी ग्रंथ सर्वभक्षक काळाच्या अगाध उदरांत गडप झालेले आहेत, याला आतां इलाज काय ?

शिवाय बुद्धकाळीं असे अनेक ग्रंथ सुधारून अगर रूपांतरित करून तयार केलेले आहेत. उदाहरणार्थ, प्रसिद्ध भारतच घ्या. मूळचें व्यासांचें भारत म्हणजे आठ दहा हजार श्लोकांचें. पण पुढें त्याचें पोट वाढत वाढत शेवटीं सौतीच्या हातांत तें एक लाखाचें महाभारत होऊन बसलें ! ही गोष्ट संशोधकांस कांहीं अपरिचित नाहीं. त्याचप्रमाणें मानवधर्मसूत्राचें पुढें मानवधर्मशास्त्र ( मनुस्मृति ) बनलें. याप्रमाणें अनेक प्राचीन ग्रंथांत बुद्धधर्माच्या उत्तरकाळांत कोठें छाटाछाटी, कोठें मिळवामिळवी होऊन मूळ ग्रंथाचीं विलक्षण रूपांतरें झालीं आहेत. आणि याज्ञवल्क्यस्मृति या नियमास अपवाद नसावी, असें म्हटल्यास त्यांत वावगें तें काय झालें ? असो. कांहीं जरी असलें तरी वैदिक वाङ्मयांत शतपथ जसें डौलानें मिरवीत आहे आणि जसा त्याचा आज गौरवपूर्ण व कौतुकास्पद रीतीनें जगभर उल्लेख केला जात आहे, तद्वत् सर्व स्मार्त ग्रंथांत याज्ञवल्क्यस्मृति प्रामुख्यानें शिरोभागींच गणली जाते, एवढी गोष्ट लक्षांत ठेविली म्हणजे कार्यभाग झाला.

याचप्रमाणें संहितास्वरनिर्णयार्थ प्रतिज्ञासूत्र व संहितापठणार्थ याज्ञवल्क्य-शिक्षा, असे दोन ग्रंथ त्यांच्या नांवावर प्रसिद्ध आहेत, याचाहि पण विसर नसावा. एकंदरींत योगीश्वरांचा संबंध शुक्लयजुर्वेद, शतपथ ब्राह्मण, याज्ञवल्क्य-स्मृति, प्रतिज्ञासूत्र व याज्ञवल्क्यशिक्षा या पांच ग्रंथांशीं येत असून त्या सर्वांचा दर्जा वैदिक ग्रंथभांडारांत अव्वल प्रतीचा आहे, याविषयीं मतभेद असूं शकणार नाहीं. ( आह्निकचंद्रिका. )

---

## सूर्य तो सूर्यच !

हे याज्ञवल्क्यांचें चरित्र म्हणजे पौरुषानें पूर्ण भरलेलें आहे. किती विघ्नें ! किती अडथळे ! काय प्रसंग ! आणि केवढी धांदल ! पण या सर्वांनाहि न जुमानतां एकट्यानेंच सिंहाच्या छातीनें सर्व प्रतिस्पर्ध्यांशीं सामना देऊन अखेर त्यांवर त्यांनीं मात केली आणि आपलें यश सूर्याप्रमाणें तेजस्वी व शाश्वत केलें ! हें काय थोडें झालें ? नवीन संहिता काढली, नवीन पंथ स्थापिला, नवीन दिशा रोखली आणि सर्वच कांहीं नवीन व अपूर्व करून दाखविलें ! याला तुम्ही काय म्हणतां ? वैशंपायनांनीं तर त्यांना सळो का पळो करून टाकलें होतें. यत्किंचित् कारणाकरितां शाप काय दिला, शिकविलेली विद्या परत काय घेतली, यज्ञांतील दक्षिणेसाठीं भांडण काय काढलें, जनमेजयांच्या यज्ञांत शिष्यां काय हांसडल्या, पाय काय आपटले, कट काय केला, बंड काय उभारलें, एक का दोन इथून तिथून सगळ्या शनैश्वराच्या चेष्टा ! पण गंमत ही कीं, हिऱ्याला पैलू पाडावे तसा तो चमकदार व पाणीदार दिसूं लागतो. आणि हाच अनुभव येथेंहि प्रत्यक्ष आलाच. वैशंपायनांनीं जसा त्यांचा छल मांडला तसें त्यांचें सामर्थ्य चढतच चाललें ! आणि याबद्दल एका परीनें आम्ही गुरुजींचे आभारच मानले पाहिजेत !

होय, आभार मानूं नये तर काय ? रागाच्या भरांत भाच्याला ते तसा शाप न देते तर योगीश्वरांचें आत्मतेज तितक्या जाज्वल्यतेनें झळकलें असतें कीं नाहीं, याची आम्हांला वानवाच आहे. थोर माणसांतील कर्तृत्वशक्तीचे विस्फुलिंग प्रज्वलित होऊन प्रकाशमय होण्याला तसेंच कांहींतरी जबरदस्त

कारण हवें असते आणि तें येथें वैशंपायनानीं भरपूर पुरवून दिलें तुकारामा ची भगवद्भक्ति प्रज्वलित होण्याला त्याच्या बायकोचा कर्कशपणाच कारण झाला आणि प्रत्यक्ष लोकमान्याची गोष्ट झाली तरी काय ? त्याच्यामध्यें लोकोत्तर कर्तृत्वशक्तींचें जें एवढें धगधगीत आत्मतेज चमकलें त्याला कारणही मायबाप सरकारची तापट व तामस वृत्तीच नव्हे काय ? शिवाजीमहाराजाना हिंदुपदपादशाही स्थापन करावी लागली त्याला कारण मुसलमानाचा आसुरी छळ म्हणू नये तर आणखी काय म्हणावें ?

पाहा, रागाच्या भरात वैशंपायनानी काहीं तरी बोलून शिष्यावर बहिष्कार घातला खरा, पण त्याचा परिणाम म्हणजे नवीन शुक्लयजुर्वेद झळकला आणि निराळी एक वाजसनेय शाखा फुटली ! बादशाहीच्या अनिरुद्ध राजवटींत गोब्राह्मणाचा अनन्वित छळ झाला त्याचा परिणाम शिवाजीनें भवानीतलवार उपसली आणि हिंदुपदपादशाही स्थापन झाली ! दयाळू सरकारनें लो टिळकावर नाहक दात धरला आणि त्याचा परिणाम शुक्लयजुर्वेदाप्रमाणेंच चतु सूत्री स्वराज्यसंहिता निघून त्याच्या छत्राखालीं मोठा व प्रबल असा स्वराज्यपक्ष निर्माण झाला ! कर्तृत्ववान् व सज्जन माणसाशीं तामसी व मत्सरी लोकाचें घर्षण होऊन ठिणगी उडाल्यास काय विलक्षण परिणाम होतो आणि केवढा चमत्कार घडतो याबद्दल हा वरील उदाहरणें प्रत्यक्षच साक्ष आहेत. मग निराळें विवेचन आणखी पाहिजे कशाला ?

आता हा लोकापवाद—तो कोणाला बरें सुटला आहे ? श्रीराम, श्रीकृष्ण, धर्म, शिवाजी, टिळक, इतकेंच नव्हे, तर प्रत्येक थोर माणसामागें तो सावली-प्रमाणें आहेच आहे म्हणे याज्ञवल्क्य गुरुद्रोही ! का तर ते सर्व शिष्याकरिता आपण आगींत पडण्यास तयार झाले म्हणून ! वाहवा ! खासा न्याय ! श्री रामचंद्राला स्त्रीलंपट म्हणणें, कृष्णाला कपटी म्हणणें, धर्माला भितरा म्हणणें, शिवाजीला चोर लुटारू म्हणणें, टिळकाना राजद्रोही म्हणणें, गांधींना सैतान म्हणणें, तशातलाच याज्ञवल्क्याना गुरुद्रोही म्हणण्याचा हा प्रकार होय ! सूर्यालासुद्धा नाव ठेवणारे लोक आहेतच कीं नाहीं ? कुत्राळ जगाचे हे असले विपरीत चाळे केव्हाहि चालावयाचेच ! शिवाय आम्हीं म्हणतों प्रजेला छळ णारा तो राजा कसला, मुलाला रडविणारा तो बाप कसला, विश्वासघात

करणारा तो मित्र कसला आणि दिलेली विद्या परत घेणारा तो गुरु कसला ! वैशंपायनांना तरी हें शोभलें काय ? त्यांचा असा काय अक्षम्य अपराध केला होता, म्हणून त्यांनीं भाच्याचा असा कट्टा सूड उगवावा ? दिलेलें विद्यादान परत घ्यावें आणि त्यांचा असा वृथा छळ करावा ? राजद्रोह दिसतो पण प्रजा-द्रोह दिसत नाहीं म्हणतात. हें जर खरें असलें तर गुरुद्रोह तेवढा दिसावा आणि शिष्यद्रोह मात्र दिसूं नये, यांत अस्वाभाविक तें काय आहे? ही जगाची रीतच आहे कीं, लहानाच्या डोळ्यांतील कुसळ दिसतें आणि मोठ्या-च्या डोळ्यांतील मुसळ मात्र दिसत नाहीं ! मोठ्यांचे पर्वतप्राय दोष झांकले जातात आणि गरीबांचे बारीकसारीक देखील वेशीवर टटकतात ! यांत काय आश्चर्य आहे ? लहान होऊन जन्मणें हाच मुळीं गुन्हा ! अशी या जगाची समजूत. ती कोण व कशी घालविणार ? ज्याअर्थी भगवान् श्रीसूर्यनारायणांनीं याज्ञवल्क्यांवर अनुग्रह केला, वाग्देवी सरस्वतीनें वरद हस्त ठेविला आणि शंकरांनीं 'योगीश्वर' हा किताब दिला तो काय योगीश्वर गुरुद्रोही म्हणून ? वाचकहो, तुम्हींच सांगा, तो काय गुरुद्रोही म्हणून ? अशा माणसावर जनका-सारखे व जनमेजयासारखे पुण्यश्लोक राजे प्रेम करूं शकतील तरी काय ? त्यांना पवित्र गुरुपीठावर नेऊन बसवितील तरी काय ? ज्याअर्थी या सर्व गोष्टी घडून आल्या त्याअर्थी ते खास स्फटिकाप्रमाणें स्वच्छ व गंगेप्रमाणें निर्मळ असावेत. सूर्य, शंकर व सरस्वती यांच्या कृपाकटाक्षास ते पात्र झाले, ही एवढीच गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे त्यांच्या निर्दोषपणाबद्दल आणखी पुरावा तो काय पाहिजे ? आणि कांहीं जरी असलें तरी सूर्य तो सूर्यच ! त्याचा दिव्य प्रकाश जगांत शेवटीं कोंदून राहतोच कीं नाहीं ? असो. याचा एवढा विस्तार केला तो येवढ्याचकरितां कीं, कांहीं लब्धप्रतिष्ठित लोक अडूनदडून त्या श्रेष्ठ विभूतीवर आणि त्यांच्या वाजसनेयशाखेवर नाहक शिंतोडे उडविण्यांत मोठा आनंद मानीत असतात. पण थुंकी सूर्यावर उडत नाहीं. उलट आपलेंच तोंड उष्टावतें, येवढें देखील या पंडीत महाशयांना कळूं नये म्हणजे आतां हर्ष झाली यांच्या बुद्धिमांद्याची ! असो.

---

## मैत्रेयीला आत्मोपदेश

गृहस्थाश्रमाचा यथार्थ व यथाशास्त्र उपभोग घेतल्यावर पुढें याज्ञवल्क्य हे संन्यासाश्रमी बनले. हा आश्रम घ्यावयाच्या अगोदर आपल्या मिळकतीची वांटणी करून देऊन मैत्रेयीस वेगळी करावी या इराद्यानें त्यांनी तिला जवळ बोलाविली, आणि आपला बेत कळविला. मैत्रेयी ही कांहीं सामान्य प्रतीची बायको नव्हती. ती पंडिता होती तिला ऐहिक संपत्ति अगर ऐहिक सुख मुळींच नको होतें. तिला हवें होतें एक अमरत्व ! हात जोडून नम्रपणें ती पतीस म्हणाली, 'देवा, पैशानें गच्च भरलेली अशी ही सबंध पृथ्वी मला मिळाली अगर तुम्हीं दिलीत तरी मी त्यापासून अमर होईन काय ? सांगा, मी अमर होईन काय ?' 'नाहीं' लागलीच ते उत्तरले, 'मैत्रेयि, नाहीं..फार तर तूं सार्वभौम राजाप्रमाणें सुखी व संपन्न होशील. यापलीकडे कांहीं नाहीं. 'अमृतत्वस्य नाशास्ति वित्तेन '-पैशानें अमरत्व प्राप्त होईल ही आशाच अगदी निर्मूल आहे !' ( बृ. अ. ब्रा. ४-५. )

तेव्हां ती त्यांस पुनः म्हणाली, 'तर मग, देवा, पैशानें, वैभवानें, राजसत्तेनें अमरत्व प्राप्त होण्याची आशा नाहीं तर तो चंचल पैसा अगर तें नाशिवंत वैभव घेऊन तरी मी काय करूं ? मला तुमची ती धनदौलतहि नको अन् तो जमीनजुमलाहि पण नको ! मी अमर कशी होईन, याचें तेवढें ज्ञान द्या म्हणजे झालें. 'आपण मला कांहीं देणारच असाल तर एवढें मला द्या. बाकीचें मला तुमचें कांहींहि नको ! आपण मला आतां सोडूनच जाणार म्हणतां तर अशा वियोगप्रसंगीं माझी एवढी समजूत करून जाल तर बरें नाहीं का होणार ?' असें म्हणून ती त्यांच्याकडे करुण मुद्रेनें पाहत राहिली.

सुज्ञ पतीचें प्रेमळ अंतःकरण तें ! अशा प्रसंगीं द्रवल्याशिवाय कसें बरें राहील ? शिवाय प्रसंग म्हणजे कमला नाजूक! वैदिक संन्यास तो !! हिंदु नव्हे, कीं संन्यास घेतल्यावर चौथ्या दिवशींच पुनः घरासभोवतीं घिरट्या घालायला ! आजचा हिंदू संन्याशी म्हणजे वैदिक संन्याशाची निव्वळ थट्टा आहे ! पुनः मैत्रेयीची व आपली गांठ आजच्यासारख्या दाम्पत्यस्वरूपांत

पडणें शक्य नाहीं, ही गोष्ट ते जाणून होते आणि यामुळें तिचें तें शेवटचें व हृदयस्पर्शी भाषण ऐकून त्यांचें तें प्रेमळ हृदय खरोखर द्रवलें आणि तिच्या आत्मज्ञानप्रवण शुभेच्छेचें त्यांना क्षणभर कौतुकहि वाटलें. मैत्रेयीचा स्वभाव, योग्यता व आकांक्षा यांची त्यांना चांगली जाणीव होती. तिच्या पांडित्याचा व वैराग्यवृत्तीचा त्यांना मधूनमधून अनुभवहि आला होता. हें तिचें अंतः-करणपूर्वक केलेलें भाषण ऐकून त्यांना समाधान वाटलें. तिला प्रेमादरानें त्यांनीं जवळ बसवून घेतलें आणि आत्मज्ञानश्रवणास ती सर्वस्वी योग्य आहे असें पाहून त्या पतिरायांनी आपल्या मधुर वाणीनें तिच्यावर दिव्य आत्मज्ञानाचा न्यारसा अमृतवर्षाव केला ! धन्य झाली मैत्रेयी ! धन्य तिचा जन्म ! आणि धन्य धन्य तिचा आत्मा !! ( बृ. अ. ४ ब्रा. ५ )

त्या ज्ञानोपदेशानें ती तेवढीच धन्य झाली असें नव्हे, तर तिच्याबरोबर तिच्याप्रमाणेंच तळमळणाऱ्या असंख्य मुमुक्षु जीवांचेंहि अखंड व शाश्वत कल्याण झालें आहे ! केवढा सुंदर उपदेश तो ! किती व्यापक दृष्टि त्याची ! किती खोल विचार ते आणि केवढें दिव्य सामर्थ्य त्यांचें ! तो अखंड शांतीचा व परम सौख्याचा सुमधुर ज्ञान-झरा सर्व तृषितांना शांत व तृप्त करीत पुढें यावच्चंद्रदिवाकरौ असाच सारखा झिरपत राहील !

## याज्ञवल्क्य-मैत्रेयी-संवाद

याज्ञवल्क्यांनीं मैत्रेयीस पुढें बसवून घेऊन उपदेश केला तो असा: ते म्हणाले, 'मैत्रेयि, आतां मी जें तुला सांगणार आहें तें नीट लक्ष देऊन ऐक. भार्येला पति प्रिय असतो तें कां ? तर तो तिला पति म्हणून प्रिय नव्हे तर स्वत:करितां म्हणून तो तिला प्रिय होय. तसेंच पतीला भार्या प्रिय असते ती भार्येकरितां म्हणून नव्हे तर आपल्याचसाठीं ती त्याला प्रिय असते. याच-प्रमाणें पुत्र, मित्र, ब्राह्मण, क्षत्रिय, देव, प्राणिमात्र व इतर सर्व वस्तू हीं समजावीं. हीं सर्व आपल्यासाठींच प्रिय असतात, त्याच्यासाठीं म्हणून नव्हे. ( आत्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति । ) ( बृ. अ. ४ ब्रा. ५-६ ) म्हणून आपल्यामध्यें जो आत्मा आहे त्याला पाहिलें पाहिजे, त्याचें श्रवण मनन-ध्यान केलें पाहिजे. याचें कारण, मैत्रेयि, असें आहे कीं, याचें दर्शन, श्रवण,

मनन व ज्ञान झालें म्हणजे या सर्व विश्वाचें ज्ञान झालें असें होतें ('मैत्रेयि आत्मनि खल्वरे दृष्टे श्रुते मते विज्ञात इदं सर्वं विदितम्' (बृ अ. ४. ब्रा. ५ ६.) त्याचप्रमाणे पुन असें पाहा कीं, आपण वेगळे व ब्राह्मण वेगळे, असें जो समजतो त्याला ब्राह्मण दूर करतात क्षत्रिय वेगळे असें जो समजतो त्याला क्षत्रिय दूर करतात, देव वेगळे असें समजणारास देव दूर करतात, सर्व लोक वेगळे समजणाऱ्यास सर्व लोक दूर करतात. कारण हे ब्राह्मण, हे क्षत्रिय, हे देव व हे लोक हे सगळे हा आत्माच होय' मैत्रेयि, तुला फार काय सांगू? ओलीं लाकडें पेटविलीं म्हणजे त्या अग्नीपासून जसा धूर पसरतो तद्वत् हे जें महद्भूत आहे त्या महद्भूतापासून म्हणजे परमात्म्यापासून हा ऋग्वेद, हा यजुर्वेद, हा सामवेद, इतिहास, पुराणें, श्लोक, सूत्र, मंत्र, इहलोक, परलोक, हे सगळें भूतजात श्वासरूपानें विस्तार पावलें आहे. दुदुंभि वाजू लागली म्हणजे जो शब्द होतो, तो दुदुंभीहून वेगळा असें समजणें जसें शक्य नाहीं, तद्वतच या आत्म्यासबधानेंहि समज ज्याप्रमाणें सर्व उदकाचें समुद्र हें निवासस्थान आहे, तद्वत् हा आत्माहि या सर्व विश्वाचें एकायन आहे तो जसा समुद्राप्रमाणें घन, अतररहित, बाह्यरहित, पूर्ण, रसपूर्ण असतो तद्वतच हा जीवात्मा झाला तरी अंतररहित, बाह्यरहित, पूर्ण व ज्ञानपूर्ण असा आहे हा देहाचा नाश झाला म्हणजे त्यातून निघून मागें राहतो देह सुटल्यावर याला जीवात्मा असें वेगळें नाव राहत नाहीं' तेव्हा मैत्रेयी म्हणाली, 'भगवन्, मला मोह पडेल असें ज्ञान सांगू नका हें आपण काय म्हणता तें मला समजलें नाहीं त्याची नीट फोड करून सांगा'

'मैत्रेयि,' योगीश्वर म्हणाले, 'मी मोह पडण्यासारखें कांहीं सांगत नाहीं हा आत्मा अविनाशी आहे असा त्याचा अर्थ (अविनाशी वा अरे अयमात्मा) विनाश हा त्याचा धर्म नाहीं अगे, असें पाहा कीं, जर द्वैत असेल तर एक दुसऱ्याला पाहील, एक दुसऱ्याचा वास घेईल, एक दुसऱ्याचा आस्वाद घेईल, एक दुसऱ्याला बोलेल, एक दुसऱ्याचें ऐकेल, एक दुसऱ्याला स्पर्श करील व एक दुसऱ्याला जाणील. परंतु हें सर्वच जेथें आत्मा आहे तेथें काय कशानें पाहणार? कशानें वास घेणार? कशानें कोणाला बोलणार? कशानें श्रवण करणार? कशानें मनन करणार? आणि कशानें कोणाला पाहणार?

ज्याच्या योगानें हें सर्व जाणतां येतें त्याला कशानें जाणावयाचें ? 'असा नाहीं तसा नाहीं' असें ज्या आत्म्यासंबंधीं म्हणतात तो आत्मा, मैत्रेयि, हा. हा अगृह्य आहे म्हणून ग्रहण करतां येत नाहीं; अशीर्य आहे म्हणून फाडतां येत नाहीं; असंग आहे म्हणून जोडतां येत नाहीं; असित आहे ? व्यथा पावत नाहीं-विनाश पावत नाहीं, सर्वांचा जो ज्ञाता, अगे, त्याला कशानें जाणावयाचें बरें ? मैत्रेयि, तुला मीं हें आत्मज्ञान सांगितलें. हेंच तें अमृतत्व होय ! मैत्रेयि, हेंच तें अमृतत्व ! ! आतां तुझें समाधान झालें ना ! '

हें ऐकून मैत्रेयी शांत व तृप्त झाली आणि योगीश्वर हळूंच तेथून उठून गेले.

---

## हें पाहा मोक्षाचें मुक्तद्वार

पवित्र गंगेचे शुद्ध स्वरुप हरिद्वारांत नितांत पाहावयास सांपडतें तसें तें पुढेंपुढें म्हणजे काशीप्रयागांत मिळत नाहीं. त्याचप्रमाणें पवित्र सनातन धर्माचें उज्ज्वल व उदात्त स्वरूप झालें तरी वैदिक धर्मांत जसें प्रतीत होतें तसें तें आजच्या हिंदुधर्मांत दिसून येत नाहीं, ही गोष्ट कबूल करणें आज कोणालाहि भागच आहे. आजकालच्या हिंदुधर्मावर इतर धर्मांचे संस्कार झाल्यामुळें तो सनातनी जरी असला तरी मूळ सनातन धर्माचें तेज, चैतन्य व सामर्थ्य त्यांत चमकत नाहींत, एवढी गोष्ट मात्र खरी. काशींत वाहणारी गंगा ही गंगाच जरी असली तरी तिच्यांत हरिद्वारचा पवित्रपणा व निर्मलपणा नसून इतर नद्यांचीहि जशी भेसळ आहे तशीच गोष्ट आजच्या आमच्या हिंदुधर्माचीहि झाली आहे, येवढें लक्षांत ठेविलें म्हणजे भागलें. असो.

याज्ञवल्क्य व जनक नेहमींप्रमाणें सहज बोलत बसले होते. अर्थात् त्यांचें बोलणें झालें तरी ज्ञानपरच असावयाचें आणि या खेपेसहि विषय तोच होता. बोलतां बोलतां ओघाच्या भरांत जनकांनीं प्रश्न टाकला कीं, गुरुजी, मोक्षाचा अधिकार सर्वांनाच आहे कीं विविक्षित वर्णाला अगर व्यक्तीला आहे ?

याज्ञवल्क्य हंसून म्हणाले:-हें काय विचारतोस, जनका ! अरे, हा अधिकार प्रत्येक मनुष्याचा आहे. आतांपर्यंत मी जें सांगत आलों, त्याचें मर्म तरी हेंच आहे. ज्ञानानेंच मोक्ष मिळतो आणि मोक्ष म्हणजे प्रत्येकाचें माहेरघर !

मनन व ज्ञान झालें म्हणजे या सर्व विश्वाचें ज्ञान झालें असें होत ('मैत्रेयि आत्मनि खल्वरे दृष्टे श्रुते मते विज्ञात इदं सर्वं विदितम्' (बृ अ ४ ब्रा ५ ६) त्याचप्रमाणें पुन असें पाहा की, आपण वेगळे व ब्राह्मण वेगळे, असें जो समजतो त्याला ब्राह्मण दूर करतात क्षत्रिय वेगळे असें जो समजतो त्याला क्षत्रिय दूर करतात, देव वेगळे असें समजणारास देव दूर करतात, सर्व लोक वेगळे समजणाऱ्यास सर्व लोक दूर करतात कारण हे ब्राह्मण, हे क्षत्रिय, हे देव व हे लोक हे सगळे हा आत्माच होय' मैत्रेयि, तुला फार काय सागू? ओलीं लाकडें पेटविली म्हणजे त्या अग्नीपासून जसा धूर पसरतो तद्वत् हें ज महद्भूत आहे त्या महद्भूतापासून म्हणजे परमात्म्यापासून हा ऋग्वेद, हा यजुर्वेद, हा सामवेद, इतिहास, पुराणें, श्लोक, सूत्र, मत्र, इहलोक, परलोक, हे सगळें भूतजात श्वासरूपानें विस्तार पावलें आहे दुदुभि वाजू लागली म्हणजे जो शब्द होतो, तो दुदुभीहून वेगळा असें समजणं जसें शक्य नाहीं, तद्वतच या आत्म्यासंबधानेंहि समज ज्याप्रमाणें सर्व उदकाच समुद्र हें निवासस्थान आहे, तद्वत् हा आत्माहि या सर्व विश्वाचें एकायन आहे तो जसा समुद्राप्रमाणें घन, अतररहित, बाह्यरहित, पूर्ण, रसपूर्ण असतो तद्वतच हा जीवात्मा झाला तरी अतररहित, बाह्यरहित, पूर्ण व ज्ञानपूर्ण असा आहे हा देहाचा नाश झाला म्हणजे त्यातून निघून मागें राहतो देह सुटल्यावर याला जीवात्मा असें वेगळं नाव राहत नाहीं' तेव्हा मैत्रेयी म्हणाली, 'भग वन्, मला मोह पडेल असें ज्ञान सागू नका हे आपण काय म्हणता त मला समजलें नाही त्याची नीट फोड करून सागा'

'मैत्रेयि,' योगीश्वर म्हणाले, 'मी मोह पडण्यासारखें काहीं सागत नाहीं हा आत्मा अविनाशी आहे असा त्याचा अर्थ (अविनाशी वा अरे अयमात्मा) विनाश हा त्याचा धर्म नाहीं अगे, असें पाहा कीं, जर द्वैत असेल तर एक दुसऱ्याला पाहील, एक दुसऱ्याचा वास घेईल, एक दुसऱ्याचा आस्वाद घेईल, एक दुसऱ्याला बोलेल, एक दुसऱ्याचे ऐकेल, एक दुसऱ्याला स्पर्श करील व एक दुसऱ्याला जाणील परतु हें सर्वच जेथें आत्मा आहे तेथें काय कशानें पाहणार? कशानें वास घेणार? कशानें कोणाला बोलणार? कशानें श्रवण करणार? कशानें मनन करणार? आणि कशानें कोणाला पाहणार?

ज्याच्या योगानें हें सर्व जाणतां येतें त्याला कशानें जाणावयाचें? 'असा नाहीं तसा नाहीं' असें ज्या आत्म्यासंबंधीं म्हणतात तो आत्मा, मैत्रेयि, हा. हा अगृह्य आहे म्हणून ग्रहण करतां येत नाहीं; अशीर्य आहे म्हणून फाडतां येत नाहीं; असंग आहे म्हणून जोडतां येत नाहीं; असित आहे? व्यथा पावत नाहीं-विनाश पावत नाहीं, सर्वांचा जो ज्ञाता, अगे, त्याला कशानें जाणावयाचें बरें? मैत्रेयि, तुला मीं हें आत्मज्ञान सांगितलें. हेंच तें अमृतत्व होय! मैत्रेयि, हेंच तें अमृतत्व!! आतां तुझें समाधान झालें ना!'

हें ऐकून मैत्रेयी शांत व तृप्त झाली आणि योगीश्वर हळूंच तेथून उठून गेले.

---

# हें पाहा मोक्षाचें मुक्तद्वार

पवित्र गंगेचें शुद्ध स्वरूप हरिद्वारांत नितांत पाहावयास सांपडतें तसें तें पुढेंपुढें म्हणजे काशीप्रयागांत मिळत नाहीं. त्याचप्रमाणें पवित्र सनातन धर्माचें उज्ज्वल व उदात्त स्वरूप झालें तरी वैदिक धर्मांत जसें प्रतीत होतें तसें तें आजच्या हिंदुधर्मांत दिसून येत नाहीं, ही गोष्ट कबूल करणें आज कोणालाहि भागच आहे. आजकालच्या हिंदुधर्मावर इतर धर्मांचे संस्कार झाल्यामुळें तो सनातनी जरी असला तरी मूळ सनातन धर्माचें तेज, चैतन्य व सामर्थ्य त्यांत चमकत नाहींत, एवढी गोष्ट मात्र खरी. काशींत वाहणारी गंगा ही गंगाच जरी असली तरी तिच्यांत हरिद्वारचा पवित्रपणा व निर्मलपणा नसून इतर नद्यांचीहि जशी भेसळ आहे तशीच गोष्ट आजच्या आमच्या हिंदुधर्माचीहि झाली आहे, येवढें लक्षांत ठेविलें म्हणजे भागलें. असो.

याज्ञवल्क्य व जनक नेहमींप्रमाणें सहज बोलत बसले होते. अर्थात् त्यांचें बोलणें झालें तरी ज्ञानपरच असावयाचें आणि या खेपेसहि विषय तोच होता. बोलतां बोलतां ओघाच्या भरांत जनकांनीं प्रश्न टाकला कीं, गुरुजी, मोक्षाचा अधिकार सर्वांनाच आहे कां विविक्षित वर्णाला अगर व्यक्तीला आहे?

याज्ञवल्क्य हंसून म्हणाले:—हें काय विचारतोस, जनका! अरे, हा अधिकार प्रत्येक मनुष्याचा आहे. आतांपर्यंत मी जें सांगत आलों, त्याचें मर्म तरी हेंच आहे. ज्ञानानेंच मोक्ष मिळतो आणि मोक्ष म्हणजे प्रत्येकाचें माहेर, प्रकृति

दत्तात्रय यांचा कलियुगांतील अंशावतार म्हणून उपासिले जाणारे श्रीनरसिंह-सरस्वती हे वाजसनेयच आहेत. देवगिरीचे रामदेवराव यांचे श्रेष्ठ मंत्री, गज-सेना-अध्यक्ष, 'चतुर्वर्ग-चिंतामणि' या प्रसिद्ध व प्रचण्ड ग्रंथाचे कर्ते, मोडी लिपीचे प्रणेते, हेमाडपंती शिल्पशास्त्राचे प्रवर्तक, धर्मशास्त्रकोविद व 'सकल-विद्याविशारद' असे हेमाद्रि पंडित ऊर्फ हेमाडपंत हे वाजसनेयच आहेत. महाराष्ट्राचे प्राचीन व सुप्रसिद्ध कवि रंगनाथस्वामी व श्रीधर पंडित हे वाजसनेयच आहेत. त्याचप्रमाणें महाभगवद्भक्त पुंडलीक, चांगदेव महाराज व श्रीसंत भानुदास इत्यादि संतमंडळी वाजसनेयच आहेत. अक्कलकोटचे महाराज, गुर्लहोसूरचे चिदंबर महाराज, बेलापूरकर महाराज, गोन्दवलेकर महाराज वगैरे साधुश्रेष्ठ वाजसनेय आहेत. या विसाव्या शतकांतील महापुरुष म्हणजे हिंदु विश्वविद्यालयाचे संस्थापक, हिंदुमहासभेचे कंठमणि, राष्ट्रीय सभेचे आधारस्तंभ, धर्मात्मा पंडित मदनमोहन मालवीय हे वाजसनेयच आहेत. हिंदु संघटनेचे पुरस्कर्ते व हिंदु युवकाच्या लष्करी शिक्षणाचे आद्य प्रवर्तक व प्रचारक डॉ. बाळकृष्ण शिवराम मुंजे हेहि वाजसनेयच आहेत. सांप्रत शरपंजरीं पटलेल्या हिंदु जनतेमध्यें नवचैतन्य स्फुरविण्याकरितां सूर्यनमस्कारांची नवीन प्रथा पाडून सूर्योपासनेचें पुनरुज्जीवन करून हिंदु बालपिढी भावी नरकेसरी बनविण्याची साधी व सोपी परंतु प्रभावी कला शोधून काढणारे श्रीमंत राजेसाहेब औंधकर हेहि वाजसनेयच आहेत. याप्रमाणें कैक ज्ञानी, योगी, पंडित, साधु, संत, राजकारणी, कर्तबगार व थोर पुरुषांची ही वाजसनेय शाखा मायपोट आहे. असो योगीश्वरांच्या तेजस्वी परंपरेतील या थोर व तेजस्वी विभूतींचा जो येथें उल्लेख केला आहे तो वाजसेनयांची प्रतिष्ठा अगर थोरवी मिरविण्याकरितां नसून त्या परंपरेतील विद्वान् व कर्तृत्ववान् पुरुषांची व त्यांच्या विविध कार्यक्षेत्रांतील महत्त्वाच्या कामगिरीची आजच्या महाराष्ट्र जनतेस अंशतः तरी कल्पना यावी एवढ्याच उद्देशानें केला आहे. म्हणून याविषयीं कोणीहि आपला निरर्थक गैरसमज करून घेऊं नये म्हणजे झालें.

## चरित्रबोध

वाचकहो, येथें योगीश्वरांचें तेजस्वी चरित्र समाप्त झालें. त्यांच्या चरित्रांतील कांहीं ठळक ठळक गोष्टींचें आम्हीं येथें संक्षेपतः दिग्दर्शन केलें आहे. आतां या त्यांच्या दिव्य चरित्रावरून आज आम्हीं हिंदूंना काय बोध घेतां येण्यासारखा आहे याचा थोडा परामर्श घेऊन मग लेखणीला विश्रांति द्यावी हें बरें दिसतें. प्रथम म्हणजे हें कीं, ही विभूति होऊन आज जवळ जवळ पांच हजार वर्षे तरी होत आलीं असतील तरी त्यांची स्मृति हिंदूंमध्यें अद्याप जाज्वल्यतेनें टिकून राहिली आहे हें कांहीं थोडकें नाहीं. या थोर पुण्य पुरुषाचें प्रभावी चरित्र आज आम्हांस अनेक दृष्टींनीं उद्बोधक व अनुकरणीय असें झालें आहे, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होईल असें आम्हांस वाटत नाहीं. तें कसें हें खालील विवेचनावरून दिसून येईल.

---

## ज्ञानकर्मसमुच्चय

आम्हांस आमचा उत्कर्ष व उद्धार करून घ्यावयाचा असेल तर त्यांची उदार व उदात्त शिकवण आज आम्हांस रात्रंदिवस गिरवावयास पाहिजे, हें उघड आहे. त्यांचा पहिला धडा म्हणजे कर्मयोग हा होय. कर्मांशिवाय मनुष्याला दुसरा उद्धारकर्ता नाहीं पण नुसत्या कर्मांतच रंगून बसणें हें मात्र त्यांना पसंत नाहीं. कर्मांबरोबरच ज्ञानाचीहि उपासना चालविली पाहिजे, असें त्यांचें ठाम मत आहे. कर्म व ज्ञान या दोहोंचा सुंदर मिलाफ करून तदनुसार वर्तन केल्यास मनुष्याचा अभ्युदय व निःश्रेयस–प्रपंच व परमार्थ–या दोहोंचीहि प्राप्ति सहज व सरळ करून घेतां येईल असें निक्षून सांगणें आहे. ज्ञानाशिवाय कर्म आंधळें आणि कर्मांशिवाय ज्ञान लंगडें, अशी वस्तुस्थिति असल्यामुळें त्यांनीं ज्ञान व कर्म यांची सुंदर सांगड घालून ठेविली आहे. 'कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतं समाः' असा त्यांचा यजुर्वेद उच्च घोषानें उपदेश करीत आहे! तुम्ही कितीं जरी ज्ञानी असलां तरी जिवंत असे तोंपर्यंत तुम्हांस कर्में हीं केलीं पाहिजेतच, असा ईशावास्याचा दीर्घ कटाक्ष आहे. प्रथम सकाम कर्म, मग

निष्काम कर्म, नंतर चित्तशुद्धि, पुढें आत्मज्ञान आणि शेवटीं आत्मसाक्षात्कार अथवा मोक्ष अशी ही त्यांची सोपानपरंपरा आहे. कर्म सोडून नुसत्या ज्ञानावरच मोक्षाचें गांठोडें मिळवीन म्हणणाऱ्या नैष्कर्म्यवादी शहाण्याविषयीं त्यांची फारशी सहानुभूति दिसून येत नाही, एवढें लक्षांत ठेविलें म्हणजे झालें.

कोरड्या ज्ञानाचा जसा त्यांना तिरस्कार आहे तसाच शुष्क कर्मांतच लुडबुडून राहणाऱ्या शुद्ध कर्मठांचाहि त्यांना मोठा तिटकारा आहे. कर्मांत ज्ञान व ज्ञानांत कर्म पाहणारे असे जे कर्मयोगी त्यांनाच त्यांनीं श्रेष्ठ स्थान दिलें आहे. कर्म श्रेष्ठ कां ज्ञान श्रेष्ठ, याविषयीं काथ्याकूट करीत बसणाऱ्या आळशी व नादान वैराग्यांविषयीं त्यांचा म्हणण्यासारखा आदर दिसून येत नाहीं. ' अन्धंतमः प्रविशन्ति यऽविद्यामुपासते । ततो भूय इव ते तमो य उ विद्यायाꣳ रताः ॥ ईशा. १२ ॥' जे केवळ कर्मांचेच अनुष्ठान करतात ते जन्ममृत्यूच्या भोंवऱ्यांत शिरतात ! आणि जे कर्म सोडून केवळ ज्ञानांतच सदैव गर्क असतात ते तर त्याहूनहि खडतर अशा संसारचक्रांत जाऊन सांपडतात ! ! असा टोमणा मारून शुद्ध कर्मठ व निव्वळ बोलघेवडे पंडित या दोघांचाहि त्यांनीं सारखाच समाचार घेतला आहे.

यावर त्यांनीं आपला निर्णय दिला आहे तो असा :—विद्यां चाविद्यां च यस्तद्वेदोभयꣳ सह । अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्ययाऽमृतमश्नुते ॥ ईशा. १४ ॥ ज्ञान व कर्म हीं दोन्ही जो एकसमयावच्छेदेंकरून जाणतो तो कर्मोपासनेनें कृतकृत्य होऊन आत्मज्ञानानें मोक्षाप्रत जातो ! अहाहा, किती सुंदर उपदेश हा ! या ईशावास्याचा सुंदर पाठ जोंपर्यंत आर्यांच्या अंतःकरणांत जागृत होता तोंपर्यंतच ही भरतभूमि वैभवाच्या अत्युच्च शिखरावर बसून आनंदानें नागाप्रमाणें डुलत होती ! आणि आतां ? हाय हाय ! आतां काय ? तिचा सगळाच बाजार आटोपला आहे ! या ईशावास्याचें जेव्हां विस्मरण झालें, कर्म व ज्ञान यांची जेव्हां फारकत झाली तेव्हां आमचे उच्च ग्रह पार सगळे बदलले आणि दैवगति फिरल्यामुळें कर्मकांडाची पिछेहाट होऊन, शुष्क ज्ञानवादाचें बंड माजून, ही सुसंपन्न भरतभूमि–श्रेष्ठ कर्मभूमि–आळशी व बडबड्या भिक्षूंची, श्रमणांची, संन्याशांची, जंगमांची, साधूंची, मतांची, वैराग्यांची, भिक्षुकांची, एक मोठी खाण होऊन बसली ! आणि यामुळें पुढें होतां होतां

सर्व भारतीय समाजावर अज्ञानाचा व आलस्याचा कीट चढून वैदिक भूमीचा दिव्य इतिहास शेवटीं संपुष्टांत आला आणि तिला शरपंजरीं पडलेली पाहण्याचें महत्पाप व महत्संकट आतां तुमच्या आमच्या नशिबीं आलें आहे !! असो.

---

## गुणकर्मवाद

याज्ञवल्क्यांची आणखी एक गोष्ट म्हटली म्हणजे ते गुणकर्मवादी होते. आज जन्मावरून जसा मनुष्याचा सामाजिक दर्जा ठरविला जातो तसा मनुष्या वेळीं नव्हता. 'दैवायत्त कुले जन्म मदायत्तं च पौरुषम्' अशी त्या वेळच्या वैदिक आर्यांची नीति होती. ' नरका नारायण ' होण्याचा तो प्रभावी व पुण्यकाळ होता. कोणत्याहि कार्यां मनुष्याची स्वाभाविक कर्मप्रवृत्ति त्या वेळीं जातीच्या पोकळ सबबीवर डांबली जात नसे. आज हिंदुसमाजाकडे पाहिलें म्हणजे विचारी मनुष्याला खरोखर अंधेरी येऊन क्षणमात्र तो दिङ्मूढ होऊन जातो. आणि उदार व तेजस्वी अशी ज्याची एकवार दिगंत ख्याति, 'कृण्वन्तो विश्वमार्यं ' अशी ज्याची महत्त्वाकांक्षापूर्वक उच्च घोषणा तोच विश्वसंग्राहकेच्छु समाज आज जुलमी, स्वार्थी, संकुचित व निस्तेज कसा बनला हें पाहून सुज्ञ माणसाचें अंतःकरण दुःखानें व निराशेनें खिन्न होऊन भडभडून येते !

आज कसल्याहि सरळ व सन्मार्गी वैदिक ब्राह्मणेतराला कांहीं करूनहि ब्राह्मणाचा दर्जा मिळवितां येत नाहीं हे पाहून हिंदुधर्माविषयी तो वैतागूं लागला तर त्यात त्याचा काय दोष आहे ? आज ब्राह्मण-ब्राह्मणेतर चळवळीचें अंतस्थ बीज झालें तरी कशांत आहे ? हल्लींचे ब्राह्मण गुणी ' व कर्तृत्ववान् अशा ब्राह्मणेतराला आपल्या मांडीशेजारी घेण्याला तयार नाहींत, हें पाहून त्या प्राचीन आर्य ऋषींना काय वाटत असेल ? एकाच धर्मछत्राखाली नांदत असणाऱ्या भावांभावांमध्यें वेदोक्तासारखी माजलेली अनर्थक भाऊबंदकी अवलोकन करून त्या पुण्यात्म्यांना विषाद वाटत नसेल काय ? आपल्या लाडक्या वंशजांमध्यें चाललेली ही भावनाप्रचुर पण अर्थशून्य कौरवशाही पाहून त्यांच्या तेजस्वी नेत्रांतून दुःखाचे अश्रु ढळत असल्यास त्यांत नवल तें काय ?

तशांत आमच्या याज्ञवल्क्यांना तर ही गोष्ट सहसा रुचली नसती. कर्माच्या व ज्ञानाच्या जोरावर कोणत्याहि कर्मवीराला ब्राह्मणपदाचें शिफारसपत्र देण्यास ते सदैव एका पायावर तयार असत. आणि त्यांचा शतपथ ग्रंथ आजहि पण आहे. पण त्याचा जोरानें पुरस्कार मात्र केला पाहिजे. आमचे हल्लींचे शास्त्रीपंडित काय, बोलून चालून रूढीचे दासानुदास! त्यांना वैदिक ऋषींचें गूढ पण दिव्य अंतःकरण कसें कळणार? याज्ञवल्क्यांचे हितकर बोल त्यांना मुळींच पटावयाचे नाहींत! कर्माच्या जोरावर कोणत्याहि वैदिक ब्राह्मणेतराला ब्राह्मण म्हणण्याविषयीं त्यांनी फर्मानच काढून ठेविलें आहे. पण आम्ही तिकडे डोळे उघडून पाहूं तर! त्यांचें फर्मान आहे तें असें:— अथाग्राह्यो जायते यो ब्रह्मणो यो यज्ञाज्जायते तस्मादपि राजन्यं वैश्यं वा, ब्राह्मण इत्येव ब्रूयाद्ब्रह्मणोहि जायते यो यज्ञाज्जायते (शतपथ, ३, २, १, ४०)— जो ब्राह्मणापासून आणि यज्ञापासून जन्मतो, त्याचा जन्म पवित्रच होय. आणि म्हणून क्षत्रिय अगर वैश्य यास ब्राह्मण असें म्हणावें. जो यज्ञापासून जन्मतो तो ब्राह्मणापासूनच जन्मतो. याचा भावार्थ असा कीं, जो क्षत्रिय *अगर वैश्य यज्ञयागादि वेदोक्तकर्म करतो तो ब्राह्मणासारखाच पवित्र* व आदरणीय आहे. अर्थात् गुण तसें कर्म, कर्म तशी योग्यता आणि योग्यता तसा अधिकार अशी विचारसरणी असून, सर्व कर्तृत्ववान् पुरुषांशीं त्यांचें सहजच मिश्रत्व जडल्यामुळें ते लोकादराम व लोकनेतृत्वास पात्र होते व झाले, याबद्दल शंका घेण्यास मुळींच जागा नाहीं. या वरील बहुमोल श्रुतिवचनाकडे हिंदुमहासभेच्या पुढाऱ्यांचें आज लक्ष जाईल काय?

---

## स्त्रीदाक्षिण्य

त्यांची ध्यानात ठेवण्यासारखी तिसरी गोष्ट म्हणजे ही कीं, स्त्रियांविषयींचा त्यांचा आदरभाव होय. आज हिंदुसमाजाची दृष्टि स्त्रियांविषयीं कांहींहि व कशीहि असली तरी वैदिक ऋषी मात्र त्यांजकडे आदरबुद्धीनें पाहात असत ही गोष्ट अगदीं खरी. विशेषतः याज्ञवल्क्य त्यांच्याविषयीं उदारमनस्क होते, याबद्दल बिल्कुल संशय नाहीं. धर्मसूत्रांत तर त्यांना त्यांनीं कोठेंहि कमी-

पण दाखविलेला नाहीं. या बाबतींत हिंदुधर्मापेक्षां वैदिक धर्म अधिक उदार आहे, हें कबूल केलें पाहिजे. 'स्त्रीशूद्रद्विजबंधूनां न वेदश्रवणं मतं' या वचनाचा विचार करतां आज आमच्या स्त्रिया कानानें वेद ऐकण्यास देखील लायक नाहींत! मग प्रत्यक्ष त्याचा तोंडानें उच्चार करण्याची गोष्ट तर राहिलीच एका बाजूला! फार काय, धर्मकृत्यांत त्यांचें साहचर्य असलें काय नसलें काय सारखेंच! प्रसंग पडल्यास सुपारीचर देखील भागूं शकतें! इतकी आमची तयारी! आणि इतकें आमचें स्त्रीदाक्षिण्य!!

पण ही गोष्ट याज्ञवल्क्यांना रुचली असती काय? सहसा नाहीं. स्त्रीच्या सहकार्याशिवाय त्यांनीं एकट्या पुरुषाला कसलाच धर्माधिकार दिलेला नाहीं. कोणतेंहि वैदिक धर्मकृत्य पाहा, तेथें पत्नीचा हात नाहीं असें तुम्हांस आढळावयाचेंच नाहीं. ज्याला स्त्री नाहीं तो पुरुष अर्धवटच, असें त्यांनीं शतपथांत स्पष्ट बोलून दाखविलें आहे. 'अर्धोह् वा एष आत्मनो यज्जाया। तस्माद्यावज्जायां न विन्दते नैव तावत्प्रजायतेऽसर्वोहि तावद्भवति। अथ यदैव जायां विन्दतेऽथ प्रजायते तर्हि सर्वो भवति' (श. ब्रा. ५, २, १, १०)-पत्नी ही मनुष्याची अर्धांगी आहे! म्हणून जोंपर्यंत तो विवाह करून पत्नी मिळवीत नाहीं तोंपर्यंत तो प्रजावृद्धि करूं शकत नसल्यामुळें तो अर्धवट-अपूर्णच होय! आणि जेव्हां तो पत्नी मिळवितो तेव्हां तो प्रजोत्पादनास-वंशवृद्धीस समर्थ होतो आणि म्हणून तो तेव्हां संपूर्ण होतो! वाहवा, केवढी सरस व सुंदर कल्पना! याहून सुंदर कल्पना जगांत दुसरी असूं शकेल काय? असो. यावरून त्यांनीं स्त्रीला केवढें महत्त्व दिलें आहे याची नीटशी कल्पना येईल. असें एकहि वैदिक कृत्य नाहीं की ज्यांत पत्नीनें भाग घेतला नाहीं.

आजहि आमच्या बायका धर्मकृत्यांत भाग घेत असतात. अगदींच नाहीं असें नाहीं, पण त्यांचा अधिकार केवढा म्हणाल तर भलीं मोठीं दोन अक्षरें –'मम' हीं दोनच अक्षरें–आणि तींहि मनांतच पुटपुटण्यापुरता! पण हे याज्ञवल्क्यांना खपलें असतें काय? बिलकुल नाहीं. धर्मकृत्यांत त्यांच्यासाठीं म्हणून प्रत्यक्ष कांहीं मंत्र मुद्दाम त्यांनीं राखून ठेविले आहेत. स्पष्टच बोलावयाचें म्हणजे पुरुषांप्रमाणेंच त्यांनाहि वेदाधिकार दिला आहे! शुक्लयजुर्वेदांत प्रत्यक्ष स्त्रियांनीं म्हणावयाचे असे किती तरी मंत्र आहेत! 'त्र्यम्बकं

यजामहे सुगन्धि पतिवेदनम्। उर्वारुकमिव बन्धनादितो मुक्षीय मामुतः॥ (शु यं ३–६०)॥' हा महामृत्युंजयमंत्रातील उत्तरार्ध खुद्द यजमान-कन्यकानीं म्हणावयाचा आहे! 'गणानां त्वा गणपतिं हवामहे' हा प्रसिद्ध मंत्र अश्वमेधांत प्रत्यक्ष यजमानपत्नीच्या तोंडी घातला आहे! याप्रमाणें अनेक प्रसंगी असे अनेक मंत्र त्यांनीं स्त्रियांकरितां म्हणून राखून ठेविले आहेत इतकेंच नव्हे, तर काही मंत्राच्या ऋषिहि पण प्रत्यक्ष स्त्रियाच आहेत, हें केवढे आश्चर्य! लोपामुद्रा, विश्ववारा यासारख्या विदुषी स्त्रिया शुक्लयजुर्वेदाच्या ऋषिमंडळात नक्षत्राप्रमाणें चमकत आहेत ऋग्वेदांत देखील स्त्रीऋषींची एक पलटणच आहे! प्रसिद्ध गार्गीनें तर याज्ञवल्क्यासारख्या अतिरथीबरोबर आत्मज्ञानाच्या क्षेत्रात उडी मारून प्रत्यक्ष रणसंग्रामच माजविला होता! हें वर आलेंच आहे मैत्रेयी ही परममंगल असा आत्मोपदेश घेऊन कृतकृत्य झाली, हें वाचक अजून विसरले नसतीलच मग आता आणखी काय पाहिजे! स्त्री, अतएव वेदश्रवणास नालायक म्हणून योगीश्वरानीं तिचा धिक्कार केला नाहीं का, गार्गीला झिडकारून दिलें नाहीं, ही एकच गोष्ट ध्यानांत घेतली असतां त्यांची स्त्रीविषयक आदरबुद्धि व उदार धोरण कशा प्रकारचें होतें हें आतां पुनः पुनः सांगण्याची जरूरी राहिली नाहीं

---

## सामाजिक धोरण

आतां त्यांचें सामाजिक धोरण कशा प्रकारचें होतें याचा थोडा परामर्ष घेऊन मग त्यांच्या तत्वज्ञानाकडे वळावें, हें योग्य दिसतें आज आम्ही हिंदुलोक सामाजिक बाबतींत कितीहि तुटक असलो तरी याज्ञवल्क्यांविषयीं हल्लींच्या दृष्टीनें बोलावयाचें म्हणजे ते उदारमतवादी होते, असेंच म्हणणें भाग आहे आज आम्ही सुधारकांना नांव ठेवतो ही गोष्ट निराळी पण योगीश्वराकडे पाहिलें तर सुधारकांना त्यांचा पूर्ण पाठिंबा आहे, हें तेव्हांच कळून येईल सामाजिक काय किंवा धार्मिक काय कोणत्याहि बाबतीत वैदिक धर्म हा हिंदुधर्मापेक्षा अधिक व्यवहारक्षम व अधिक प्रगतिपर आहे, ही गोष्ट कबूल करणें कोणालाहि भाग आहे त्याची ठेवणच मूळ तशी सुबोधार व ममह

प्रवण आहे. आज सुधारकाना जे काहीं सामाजिक बाबतींत करावेंसे वाटतें व ज्याच्यासाठीं त्यानीं आटोकाट प्रयत्नहि चालविले आहेत त्या गोष्टी त्याकाळीं प्रत्यक्ष कृतींत घडतच होत्या, हें स्पष्ट म्हटलें तरी आता रचण्यासारखें नाहीं

तो काळच तसा तेजस्वी व प्रभावसंपन्न होता की, त्या वेळीं वैदिक समाजाचे आजच्यासारखे वेगळे व स्वतंत्र तुकडे पडलेले नसून, तो एक व अखंड होता तेव्हाही तो आजच्यासारखा भिन्नअवयवी होता हें खरें, पण शरिरानें पाहू जाता तो एक व अखंड होता हें मात्र विसरून चालावयाचें नाहीं सर्व भिन्नभिन्न अवयवांतील रक्त त्या वेळीं सर्व शरीरभर सारखें खेळत होतें आणि म्हणूनच तो तसा सर्वसमर्थ व वैभवसंपन्न असा झाला हल्लीं मात्र आमचें सगळेंच पारडें फिरलें आहे जग दिवसेंदिवस उत्क्रांत होत चाललें आहे, असें म्हणतात. पण ही हिंदभूमि त्याला अपवाद आहे कीं काय न कळे! जग उत्क्रांत होत चाललें आहे तर ही दुर्दैवी भरतभूमि अवक्रांत होत चालली आहे जगदीशाची कृपादृष्टि इकडे कधींकाळीं वळेल तेव्हा खरें! तोंपर्यंत आम्ही असेंच रडत व भांडत बसलें पाहिजे! याशिवाय दुसरें आमचे कपाळीं आणखी काय असणार? असो

आज द्विज म्हणजे फक्त ब्राह्मण एवढाच अर्थ ध्वनित होतो पण वैदिक काळीं त्याचा अर्थ याहून व्यापक होता, हें लक्षात घेतलें पाहिजे तेव्हा द्विज म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य असा अर्थ करण्यात येई दोन वेळा जन्मणारा तो द्विज, असा या शब्दाचा मूळ अर्थ आहे त्या वेळीं ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य हे सगळे द्विजच होते! आणि त्याचा धार्मिक बाबतींत अधिकारहि सगळा सारखाच होता! ते ब्राह्मणाप्रमाणेंच यज्ञोपवीत घालीत, यज्ञयाग करीत, वेदाध्ययन करीत आणि तत्त्वज्ञानाच्या गोष्टी बोलत. अतएव धर्मदृष्ट्या त्याची योग्यता सर्वांची सारखीच असल्यामुळें त्याच्या त्याच्यात रोटीबेटीव्यवहारहि सर्रास चालत असल्यास त्यात आश्चर्य तें कसलें? ब्राह्मण त्या वेळीं क्षत्रियाचें हातचे पाणी पीत असत व वैश्याचे घरीं जाऊन जेवीत असत!

---

# ब्राह्मणक्षत्रिय-ऐक्य

विशेषतः ब्राह्मणक्षत्रियांचा एकोपा व घरोबा अत्यंत जिव्हाळ्याचा होता, याविषयीं शंका घ्यावयास मुळीच जागा नाहीं. ज्ञानकर्मसमुच्चयाशिवाय जसा व्यक्तीला मोक्ष नाहीं तद्वत् ब्राह्मणक्षत्रिय-ऐक्याशिवाय राष्ट्राला स्वातंत्र्य नाहीं, ही महत्वाची गोष्ट वैदिक आर्य उरार्शी बाळगून होते. ब्राह्मण म्हणजे ज्ञान आणि क्षत्रिय म्हणजे कर्म असा त्या वेळीं अर्थ करण्यांत येत होता. आणि तो खरोखर यथायोग्यच होता, हें आज आम्हां हिंदूंस कटु अनुभवावरून पक्कें समजून चुकलें आहे! दुर्दैव आमचें कीं आज ब्राह्मण म्हणजे कढीभातखाऊ आणि क्षत्रिय म्हणजे खुशालचेंडू असा विपर्यस्त अर्थ केला जावा! याज्ञवल्क्य-जनक, वसिष्ट-राम, धौम्य-धर्म, समर्थ-शिवाजी यांचे विस्मरण आम्हांस कसें पडलें आणि कां पडलें हें कोणास ठाऊक! पण हें दृश्य दोघांनाहि अशुभकारक आहे, हें आमच्या समाजाग्रणींना अद्याप कळूं नये, हें महाराष्ट्राचें खडतर दुर्दैवच नव्हे काय?

---

# वैदिकांचे बेटीव्यवहार

वैदिक लोकांचे गोडवे आम्ही ब्राह्मण-ब्राह्मणेतर मिळूनच मुक्तकंठानें गातों, पण त्यांच्या कृतीकडे कोणीच पाहात नाहीं, याचा अर्थ काय? हिंदु लोकांच्या सदसद्विवेकबुद्धीचें आज खरोखरीच ठणठणीत दिवाळें निघालें आहे कीं काय, परमेश्वरच जाणे! वैदिक समाज एक व अखंड राहावा आणि तेथें फूट व तेढ पडूं व वाढूं नये म्हणून त्या वेळीं ब्राह्मण हे वेळप्रसंग पाहून तीनहि वर्णांशीं शरीरसंबंध करीत असत. आणि याज्ञवल्क्यांनीं तर ही गोष्ट प्रत्यक्ष बोलूनच दाखविली आहे! ते खुद्द आपल्या स्मृतींत सांगतात कीं:–तिस्रो वर्णानुपूर्व्येण द्वे तथैका यथाक्रमम्। ब्राह्मणक्षत्रियविशां भार्याः स्वा शूद्रजन्मनः॥ (या. स्मृ. अ. १ श्लो.) ब्राह्मणांनीं ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य या तीन वर्णांतील स्त्रियांशीं, क्षत्रियांनीं क्षत्रिय व वैश्य या दोन वर्णांतील स्त्रियांशीं व वैश्यांनीं वैश्य स्त्रियांशींच विवाह करावा, शूद्रांनीं शूद्र स्त्रीच करावी, असा योगी-

योगीश्वरांचा स्पष्ट अभिप्राय आहे. माध्यंदिन गृह्यसूत्राचे कर्ते पारस्कराचार्य म्हणजे याज्ञवल्क्यांचे प्रमुख अनुयायी आपल्या सूत्रग्रंथांत हाच श्लोक उद्धृत करतात. ' तिस्रो ब्राह्मणस्य वर्णानुपूर्व्येण । द्वे राजन्यस्य । एका वैश्यस्य ॥' कं. ४ सू. ७–१० ॥ याचप्रमाणें वसिष्ट, व्यास, शंख, बोधायन, नारद, पैठनसि वगैरे शास्त्रकार सांगत आहेत. यावरुन हें उघड आहे कीं, याज्ञवल्क्यांना वैदिक आर्यांतील भिन्नभिन्नवर्णीय बेटीव्यवहार पसंत होता. मग आतां महभोजनाची गोष्ट काय आणखी निराळी सांगावयास पाहिजे ?

यज्ञसंस्था आज आम्हांस कडवट व वावडी वाटत असली तरी पूर्वी ती तशी नसून उलट लोकप्रिय व भरभराटीत होती. या यज्ञसंस्थेमुळेंच वैदिक त्रैवर्णिक लोक अग्निनारायणासभोंवतीं एकत्र जमत असत, एकत्र खात असत व एकत्र पीत असत. प्रेमाची म्हणून जीं कांहीं लक्षणें आहेत त्यांपैकीं ' ददाति प्रतिगृह्णाति ' व ' भुंक्ते भोजयते ' हीं दोन लक्षणें तर वैदिक समाजांत यज्ञसंस्थेमुळें प्रत्यक्ष दिसून येत होतीं. आणि म्हणूनच तो समाज प्रेमरज्जूनें एकदा निगडला गेला होता. आज हा रज्जु शिथिल झाल्यामुळें हिंदु लोक मेंढरांप्रमाणें वाट फुटेल तिकडे सैरावैरा वाहवत चालले आहेत ! ना वाली ना शास्ता ! मग इतरांनी या मेंढरांना आपल्या पुढयांत ओढल्यास त्यांत आश्चर्य तें काय ? विशेषतः ब्राह्मणक्षत्रियांचें प्रेमळ व प्रभावी नातें आम्ही दुर्दैवानें विसरून बसल्यामुळें आज महाराष्ट्रांत केवढें तरी वेदोक्ताचें खूळ माजून बसलें आहे ! विचारी ब्राह्मणांनो आणि शूर व उदार मराठ्यांनो, योगीश्वर याज्ञवल्क्य व पुण्यश्लोक जनक, त्रिकालज्ञ वसिष्ठ व सत्यप्रतिज्ञ श्रीरामचंद्र, श्रीसमर्थ रामदास व छत्रपति शिवाजी महाराज, समर्थ गुरु व प्रभावी शिष्य, माय व लेक यांचें सुंदर व जिव्हाळ्याचें नातें विसरून, शत्रूप्रमाणें एकमेकांवर आदळून कोणता धर्म व कोणतें पुण्य तुम्ही जोडणार आहां ? लक्षांत ठेवा कीं, आम्ही सर्वजण एकाच विराट पुरुषाचे–एकाच वटवृक्षाचे निरनिराळे अवयव, वेगवेगळ्या शाखा आहोंत, पण निरनिराळे व स्वतंत्र तुकडे मात्र नव्होंत आणि म्हणून याज्ञवल्क्य ऋषिवर्य सांगत आहेत कीं, बाबांनो, वैदिक हे सगळे संस्कृतीनें व रक्तानें एकच आहेत. अतएव तुमच्या-तुमच्यांतील रोटीबेटीव्यवहार हा अधर्ममूलक व पापप्रद समजूं नका !

मिळून सांगावयाचा मथितार्थ हा कीं, याज्ञवल्क्यांना वैदिक समाजांतील भिन्नभिन्न वर्णांतील रोटीबेटीव्यवहार पूर्ण मान्य होता व त्यांच्या स्मृतीला तो आजहि आहे, एवढें सांगितलें म्हणजे बस्स आहे.

आज हिंदूंचें संघटण करावें म्हणून देशांत केवढी तरी ओरड व धडपड चालली आहे आणि तें जर खरोखर साधावयाचें असेल तर योगीश्वर याज्ञवल्क्यासारख्या श्रेष्ठ विभूतींची प्रभावी शिकवण आम्हांस नित्य डोळ्यांपुढें ठेवावयास नको काय ? जगाच्या पटावर राहून आम्हास डाव टाकावयाचे आहेत तर नेभळ्या व विस्कळीत हिंदुना धीट व सुसंघटित करावयास नको काय ? आणि नेभळटांना धीट करावयाचें तर त्यांचे संघटण झालेंच पाहिजे. त्याचें संघटण व्हावयाचें तर हिंदुधर्माला उजळा दिला पाहिजे. हिंदुधर्माला उजळा द्यावयाचा तर वैदिक धर्माकडे धांव मारली पाहिजे. वैदिक धर्माकडे धाव मारावयाची म्हणजे वैदिक संस्कृतीचें पुनरुज्जीवन केल्यावांचून गत्यतर नाहीं. आणि वैदिक संस्कृतीचे पुनरुज्जीवन करावयाचें तर योगीश्वरांसारख्या थोर व तेजस्वी विभूतीचे प्रभावी बोल अतरंगात सांठवून ते कृतींत उमटविणें हा एवढाच मार्ग मोकळा आहे. मग हिंदूचे कैवारी याचा विचार करणार नाहींत काय ?

---

## कर्मयोग

वैदिक धर्मांत कर्मवादाची उभारणी याज्ञवल्क्यांनीं कशी केली आहे, हें सांगणें आतां ओघासच आलें म्हणून त्याचा थोडासा विस्तार करतो. ' यथा चारी तथा भवति ' बृ. ४, ४, ५-कर्म तसं फळ, भाव तसा देव, हें कर्मवादाचें त्यांचे आद्यसूत्र आहे. मनुष्य ज्या प्रकारचें कर्म करील त्या प्रकारचें त्यास फळ मिळेल. सत्कर्मानें सद्गति आणि दुष्कर्मानें दुर्गति-' पुण्यो वै पुण्येन कर्मणा भवति पापः पापेन ' बृ. ४-४-५. असा कर्मसिद्धांत असून, या जगांत मनुष्यामनुष्यांत जी विषमता व जें स्वभाववैचित्र्य आढळून येतें त्याला कारण हें कर्मच, असें त्यांनीं खणखणीत सांगून टाकलें आहे आणि ही उपपत्ति चूक अथवा अन्यथा आहे, हें दाखविण्याचें धाडस व सामर्थ्य आज

जगांतील कोणत्याहि तत्ववेत्याजवळ नाहीं! त्यांच्या विचारवर्चस्वाचा व सूक्ष्म प्रतिभाशक्तीचा अलौकिकपणा म्हणतात तो हाच! भगवान् बुद्धदेवांनीहि धम्मपदांत याच तत्त्वाचा अनुवाद केला आहे, आणि जगांतील मध्यवर्ती धर्मसंस्था जी थिऑसॉफिकल सोसायटी तिनेंहि अवळजवळ याच तत्वाला मान्यता देऊन ती लोकांना धर्मशिक्षण देऊं लागली आहे, हा केवढा चमत्कार!

शिवाय आणखी असें को, हें कर्म किती जरी चांगलें असलें तथापि तें सकाम व अहंकारयुक्त असेल तर त्यापासून जिवाची बंधमुक्तता कदापि होणार नाहीं, हें तत्त्व त्यांनीं जगापुढें मोठ्या निर्धारानें मांडलें आहे. मुक्ति मिळवयाची ती अखेर निष्काम कर्मानेंच मिळते. तरी चुटकीसरशीं सकामतेचें निष्कामतेंत रूपांतर होईल हें मात्र सहसा शक्य नसून तें आस्ते आस्ते आणि बेतावातानेंच साधत गेलें पाहिजे याचा अर्थ कर्में मुळींच सोडा, असा नव्हे, तर कर्में करावयाचीं तीं करा, संसार थाटावयाचा तो थाटा, जगाचा उपभोग घ्यावयाचा तो घ्या-पण तेथें 'मी-मी' व 'माझें माझें' असा हावरेपणा मात्र नको. विषयोपभोग कांहीं वाईट नाहीं, पण तेथें जहाल ममत्वबुद्धि मात्र नसावी. कामक्रोधादि षड्रिपूंना नीट मर्यादेत ठेवून विवेकदीप पाजळून ठेविला म्हणजे झालें. हें सर्व जग व जगांतील पदार्थ आपले नसून ते परमेश्वरसत्तात्मक आहेत-ईशावास्यमिदं सर्वं (शु. प. ४०-१)-असें समजून त्यांविषयींची फाजील ममत्वबुद्धि टाकून देऊन, त्यांचा खुशाल ज्ञानार्जनार्थ उपभोग घ्या कीं, (तेन त्यक्तेन भुंजीथाः ४०-१) नको कुणी म्हटलें? चढेल अहंकारबुद्धीचा विषारी कांटा तेवढा मोडून टाकला म्हणजे कर्म करूनहि तें बंधनास कारण होत नाहीं-न कर्म लिप्यते नरे (शु. य ४०-२)-असा कर्मयोगाचा महासिद्धांत आहे, व तोच श्रेष्ठ वैदिक तत्त्वज्ञानाचा मूळ गाभा होय!

तेव्हां अर्थात् बायकापोरें टाकून अरण्यांत पळा, अगर भगवीं वस्त्रें परिधान करून दारोदार फिरा, असा पोंचट व पुळपुळीत उपदेश न सांगतां उलट संसार थाटावयाच्या वयांत तो थाटा-उत्तम थाटा-पण त्यांत विवेकदृष्टि जागृत ठेवा; इंद्रियांना योग्य मर्यादेंत ठेवून त्यांचे लाड पुरवा, पण त्यांना स्वैर वहकूं देऊं नका; पैसा मिळवेल तितका मिळवा पण तो सत्कार्यीं लावा; परोपकार होईल तितका करा, पण त्यांत स्वार्थबुद्धीचा फांटा द्या; दानधर्म यथेच्छ आचरा, पण

तेथें कीर्तीची अगर शाबासकीची आशा अजिबात विसरून जा, असा पौरुषवादाचा सडेतोड दिव्य संदेश एकंदर त्यांच्या चरित्रावरून व वचनांवरून ध्वनित होतो. संसार केव्हां थाटावा व संन्यास केव्हां घ्यावा याचें उदाहरण म्हणजे प्रत्यक्ष याज्ञवल्क्य हेच आहेत. मग इतर शास्त्रवचनांकडे पाहा कशाला? उपभोग, वैराग्य आणि त्याग यांचें मूर्तिमंत उदाहरण तुम्हांस कोठें पाहावयाचें असल्यास तें येथेंच पाहावयास मिळेल.

---

# अहं ब्रह्मास्मि !

आतां सरतेशेवटीं सांगावयाची गोष्ट म्हटली म्हणजे त्यांचें तत्त्वज्ञान हें होय. येथें त्यांच्या विचारसौंदर्याचा, प्रतिभाशक्तीचा, विवेचनकौशल्याचा, भाषाप्रभुत्वाचा, निरीक्षणचातुर्याचा मनोहर कळसच झाला आहे! त्यांच्या बृहदारण्यकांत शिरल्यावर मनुष्य ती अगाध विद्वत्ता व तें अप्रतिम ज्ञानभांडार पाहून आश्चर्यानें दंग होऊन जातो. तत्त्वज्ञानांत याज्ञवल्क्य हे अद्वैतवादाचे आद्यप्रवर्तक व प्रमुख पुरस्कर्ते आहेत. 'स्वराज्य माझा जन्मसिद्ध हक्क आहे' हा महामंत्र जसा लोकमान्यांच्या तोंडांतूनच प्रथम जगास जाहीर झाला तद्वत् 'अहं ब्रह्मास्मि' हें अद्वैतपंथाचें महावाक्यहि प्रथम योगीश्वरांच्या मोहक वाणींतूनच जगास ऐकावयास मिळालें! या विश्वकोशांत एकच महावस्तु घनदाट व ओतप्रोत भरली असून, हा जीव म्हणजे त्या सद्वस्तूचाच एक अंश आहे—'अयमात्मा ब्रह्म'—हा सिद्धांत त्यांनीं ठळक रीतीनें जगापुढें मांडला ही गोष्ट वेदांतवेत्त्यांस काय नवीनच सांगावयास पाहिजे? ब्रह्म व जीव व्यवहारतः भिन्न दिसले तथापि वस्तुतः व परमार्थतः तीं एकच आहेत हें विस्तव व ठिणगी यांचें सुंदर व समर्पक उदाहरण देऊन त्यांनीं सामान्य मनुष्याचीहि समजूत व समाधान होईल असा सुटसुटीत युक्तिवाद पुढें केला. जें इंद्रियगोचर तें नाशवंत व जें नाशवंत तें मिथ्या, जें इंद्रियातीत तें अमर व जें अमर तें सत्य अशी सत्यासत्याची शास्त्रीय व सुंदर व्याख्या देऊन शेवटीं 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः' असा अद्वैतवादाचा सर्वश्रेष्ठ व सर्वांगसुंदर धडा मुमुक्षूंस पाठ करण्यास घालून दिला. वरील सर्व गोष्टींचें

सार शेवटीं एकाच वाक्यांत सांगावयाचें म्हणजे त्यांनीं जी धर्मक्षेत्रांत, व्यवहारांत, तत्त्वज्ञानांत स्पृहणीय कामगिरी केली तशी त्यांच्यापूर्वी व नंतर वैदिक इतिहासांत कोणींहि केलेली दिसून येत नाहीं, ही गोष्ट पूर्ण शोधाअंतीं कोणालाहि सहज कळून येईल. असो.

---

# याज्ञवल्क्य-कालासंबंधीं दोन शब्द

आतां याज्ञवल्क्यांच्या कालासंबंधीं दोन शब्द सांगून मग वाचकांची रजा घेतों. याज्ञवल्क्यांचा काळ ठरविण्याचा प्रयत्न आजच कांहीं नव्यानें करावयाचा आहे, अशांतला भाग नाहीं. आतांपर्यंत असे किती तरी प्रयत्न झाले आहेत. अनेक मोठमोठ्या पाश्चात्य व पौर्वात्य विद्वान् पंडितांनीं या बाबतींत अत्यंत परिश्रमपूर्वक ज्योतिषशास्त्राचें मंथन करून व प्राचीन भारत-इतिहासाचें चिकित्सापूर्वक संशोधन करून अनेक अश्रुतपूर्व शोध लाविले आहेत. आणि ते वाचून पाहिले म्हणजे त्या त्या विद्वान् पंडितांच्या शोधक बुद्धीची, दीर्घ अभ्यासाची, अपूर्व विद्वत्तेची, चौरस व खोल विचारसरणीची तारीफ करावी तितकी थोडीच, ही गोष्ट खरी. पण खेदाची गोष्ट इतकीच कीं, ते सर्व शोध एकत्र करून पाहिले म्हणजे सामान्य वाचकांची दिशाभूल होऊन बुद्धि गोंधळून व भांबावून जाते. इतके ते विचित्र व विलक्षण आहेत! अशा स्थितींत आमच्या पांडित्याचें आणखी प्रदर्शन करणें म्हणजे गोंधळांतच पुन्हां गोंधळ घालणें येवढें मात्र होणार आहे. म्हणून त्या भरीस न पडतां सामान्य व सर्वसम्मत अशा कांहीं ठळक गोष्टींचा उल्लेख करून मग आतांपर्यंत झालेल्या शोधांची संक्षेपरीत्या माहिती देतों म्हणजे झालें.

या अनंत काळाच्या अगाध उदरांत खोल बुडी मारून तेथील ऐतिहासिक सत्यरत्नें शोधून काढण्याची या धाडसी तर्कबुद्धीची विलक्षण हांव मोठी अजबच खरी आणि तशीच ती मोठी प्रशंसनीयहि पण आहे! आधुनिक विद्वान् लेखकांच्या अपूर्व शोधाचे विलक्षण मासले वाचकांच्या पुढें ठेवावयाच्या अगोदर कांहीं सर्वमान्य अशा प्रसिद्ध गोष्टींची ओळखतीच कां होईना पण

थोडीशी माहिती करून देणें हें अवश्य असल्यामुळें त्यासंबंधीं दोन शब्द लिहून मग त्या चक्रव्यूहांत शिरणें हें अम्मळ बरें दिसलें. म्हणून आतां भारत-इतिहासाकडे थोडीशी नजर वळवूं.

याज्ञवल्क्य हे वैशंपायनांचे शिष्य होते ही गोष्ट आज विश्वसंमत आहे आणि वैशंपायन हे व्यासांचे शिष्य, हेंहि कोणाला नाकबूल नाहीं. आणि हेच व्यास–यांना कोणी वेदव्यास म्हणतात, कोणी कृष्ण द्वैपायन व्यास म्हणतात, कोणी पाराशरव्यास असेंहि म्हणतात–पांडवांचे पितामहहि होत. जनमेजय हे या पांडवांचे म्हणजे अर्जुनाचे पणतू असून ते व याज्ञवल्क्य हे समकालीन होते, याविषयींहि आतां फारसा मतभेद नाहीं. कारण जनमेजयांच्या अश्वमेधयज्ञांत हे ब्रह्माच्या जागीं होते, असें मागें सांगितलेंच आहे. म्हणजे आतां असें कीं, वंशपरंपरेनें पाहतां जनमेजय हे व्यासांच्या नातूचे पणतू म्हणजे सहाव्या पिढींतले पुरुष असून, शिष्यपरंपरेनें पाहतां याज्ञवल्क्य हे त्यांचेच नात शिष्य-म्हणजे शिष्यांचे शिष्य ठरतात. अर्थात् व्यासांची वंशतः सहावी पिढी व शिष्यतः तिसरी पिढी ही समकालीन ठरते. हीच गोष्ट पुढील वंशावळीवरून स्पष्ट होणारी आहे.




आतां जनमेजयांच्या वेळीं वृद्ध पुरुष व्यास व त्यांचे शिष्य वैशंपायन हे हयात असून, त्यांच्या सर्पसत्रांत हे दोघेहि उपस्थित होते व त्या प्रसंगीं

व्यासाच्या आज्ञेवरून वैशंपायनानीं व्यास भारतग्रंथाचें निरुपण केलें, असा महाभारतांतच उल्लेख आहे जनमेजयाचे आजे वीर अभिमन्यु हे भारतीय युद्धांत फक्त सोळा वर्षांचे असून, त्यांचा विराटराजकन्या उत्तरा हिच्याशीं फारच थोड्या महिन्यापूर्वी विवाह झाला होता आणि ती या युद्धसमयीं गरोदर होती लग्न झाल्यावर पुढें पाच महिन्यातच महायुद्धाचा वणवा पेटून त्यात बालवीर अभिमन्यु हे चक्रव्यूहात कपटानें मारले गेले अभिमन्यूच्या मरणानंतर उत्तरा प्रसूत झाली आणि तिला परीक्षित हा मुलगा झाला

महायुद्ध संपल्यावर धर्मराजे छत्तीस वर्षे राज्य करून पुढें परीक्षितास राज्यावर बसवून आपण पांडवांसहित महाप्रस्थानाकडे निघून गेले या परीक्षित राजास जनमेजय, श्रुतसेन, उग्रसेन व भीमसेन असे चार मुलगे झाले व त्यात जनमेजय हे ज्येष्ठ होते पुढें परीक्षितास शमीक ऋषीच्या शापानं सर्पदंश होऊन ते गतप्राण झाले त्याच्या पश्चात् जनमेजय हे राज्यावर बसले आणि आपल्या बापाला दंश करून प्राण घेणाऱ्या सर्पजातीचा फडशा पाडण्याकरितां म्हणून त्यानीं सर्पसत्र आरंभिलें व तें पार पडल्यावर एक अश्वमेध सुरू केला आणि या अश्वमेधातच वैशंपायनांकडून आपल्या पूर्वजांचा इतिहास म्हणजे भारतपुराण श्रवण केलें म्हणजे भारतयुद्ध पाहिलेले व्यास, वैशंपायन, कृपाचार्य अशांसारखे वृद्ध लोक अजून जनमेजयाच्या वेळीं हयात होते, हें येथें सांगण्याचा उद्देश

आता मुद्यावर यावयाचें म्हणजे हा जनमेजयाचा जो काळ तोच याज्ञवल्क्याचाहि काळ, असें आतां ओघानेंच म्हणणें प्राप्त होतें आणि हें भारतीय युद्ध कधीं झालें हें ठरविलें म्हणजे त्यात कमी अधिक शंभर वर्षांची भर घातली कीं, हा याज्ञवल्क्याचा काळहि आपोआपच सिद्ध होतो त्याचें निराळें विवेचन करण्याचें कारण राहत नाहीं पण या बाबतींत इतकीं झालेली मत मताची खिचडी पाहता हा प्रश्न वाटतो तितका सोपा व साधा वाटत नाहीं या मुद्यावर आज केवढाली तरी रणें माजलीं आहेत त्यात शिरून सत्य शोधून काढण्याचा प्रयत्न करणें म्हणजे समुद्रांत बुडून सुई शोधण्यासारखेंच समजसपणाचें आहे आणि तेवढें धाडस करण्याचें हें स्थळहि नव्हे तथापि या प्रश्नावर आज विद्वान् लोकांत केवढी खडाजंगी माजली आहे, याचा शोध घेणें मोठें मनोरंजक असल्यामुळें त्याचें येथें थोडक्यातच दिग्दर्शन करतों

हें भारतीय युद्ध कधीं झालें याचा निर्णय आधुनिक पंडितांनी निरनिराळ्या मार्गांनी निरनिराळा केला आहे तो असा रा विसाजीपंत लेले यांच्या मतें हें युद्ध श पू ६३०६ सालीं झालें असावें रा जनार्दन बाळाजी मोडक म्हणतात त श पू ५०७८त झालें असलें पाहिजे इतिहासाचार्य चिंतामण राव वैद्य याचा अभिप्राय असा, की तें श पू ३१८० सालीं लढलें गेलें असावें केसरीचे संपादक श्रीयुत जनार्दन सखाराम करंदीकर आग्रहानें सुच वितात की, तें श पू २०१४ सालीं घडलें असावें लो टिळकांचा कटाक्ष पाहावा तर तो श पू १५७८ सालावर पडतो ! रं मेशचंद्र दत्त यांचा विचार घेतला तर ते श पू १४७८ साल म्हणून चापून सांगतात ! त्र्यंबक गुरुनाथ काळे म्हणतात की तो संग्राम श पू १२६३ च्या सुमारास चमकून गेला ! आणि केशवराव दप्तरी यांचा कौल पाहावा तर तो श पू ११९७ सालांत येऊन पडतो ! ! हे सर्व तज्ज्ञ व यदे लेखकच ! ! पण फरक पाहावा तर किती विलक्षण ! आता अशा या गहन अरण्यांत शिरून सत्याचा मार्ग शोधणारांना तरी कसा शोधावा ? आणि शोधला म्हणून तो मापडणार व मानवणार तरी कोणाला ?

पुन आणखी एक गम्मत सांगावयाची राहिली तीहि याच हातानें सांगून टाकतां वेदग्रंथ हे पूर्वी सरमिसळ असे समिश्र ग्रंथ होते विषयवारीने व्यासा नीच त्यांच्या निरनिराळ्या संहिता पाडल्या म्हणजे तैत्तिरीय संहिता ही व्यास अगर वैशंपायन यांच्या वळची आहे आधीची नाही व्यास हे भारतीय युद्धांत हजर होते आता गम्मत पाहा की, भारतीय युद्धाचा काळ शकपूर्व १५७८ म्हणून आग्रहानें सांगणारे लोकमान्य टिळक तेच दुसऱ्या क्षणीं तैत्ति रीय संहितेचा काळ इ स पू २३५० च्या सुमारास म्हणून ठासून सांग ण्यास मुळींच कचरत नाहींत (प्राचीन चरित्रकोश, पा ६६०-६६१) संहिताकाळ व भारतयुद्धकाळ जवळ जवळ एकच असतांना दोन्हींमध्ये धडधडीत ७०० वर्षांचा फरक पडावा, हें किती आश्चर्य आहे ! त्याचप्रमाणे प्राचीन भारतज्योतिषशास्त्रकर्ते रा शंकर बाळकृष्ण दीक्षित यांचीहि अशीच घसरगुंडी झाली असें म्हणावयास काहीं हरकत दिसत नाहीं शतपथ ब्राह्मण हें भारतयुद्धानंतर झालें आहे, ही गोष्ट आता सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट झाली !

आहे. पण पाहावें तों या शतपथाच्या व भारतयुद्धाच्या काळांत त्यांनीं केवढा तरी विसंगतपणा आणून ठेविला आहे. भारतीय युद्ध त्यांच्या मतें ग्र. पू. १५७८ त झालें असून शतपथाचा काळ पाहावा तर तो ग्र. पू. ३१०० च्या सुमारास जाऊन पडतो! म्हणजे भारतीय युद्धाच्या पूर्वीं शतपथ ब्राह्मण हें दीडहजार वर्षें मागें रेटलें गेलें! पण हें कसें संभवनीय आहे, हें कोणास ठाऊक! (प्राचीन चरित्रकोश, पा. ६६१–६६२.) एकंदरीत काय तर वरील-प्रमाणें मोठमोठ्या जाडया विद्वानांच्या मतामतांतील हा गलबला व विसंगतपणा पाहिला म्हणजे सामान्य माणसाची बुद्धि गडबडून जाऊन ती भ्रमिष्टासारखी व्हावी यांत कांहींच आश्चर्य नाहीं. मग आतां हा प्रश्न सोडविण्याच्या फंदांत पडणें म्हणजे स्वतःस हास्यास्पद मात्र करून घेण्यासारखें आहे, नव्हे काय? म्हणून विस्तारभयास्तव हा नाद येथेंच सोडून देऊन मोकळें व्हावें हें आम्हांस रास्त दिसतें. तथापि सांगण्याची गोष्ट इतकीच की, याज्ञवल्क्याच्या काळाची अधिक चर्चा करीत बसण्यापेक्षां इतिहासाचार्य चिंतामणराव वैद्य यांचेंच मत म्हणजे ग्र. पू. ३१०० चा काळ आम्हांस विशेष पसंत आहे, असें एकदमच सांगून टाकून पुढील कामास लागतों म्हणजे झालें. असो.

---

## गुरुमाउलीला आतां कौल लावा !

आतां रजा घेण्याची वेळ आली. पण त्यापूर्वीं सांगावयाचें तात्पर्य म्हणजे हें कीं, या महर्षीचें पौरुषप्रधान चरित्र आम्हां हिंदूंना आज देखील अनेक दृष्टींनें मोठें उद्बोधक व उत्तेजक असेंच आहे. अगाध तत्वज्ञान, प्रचंड कर्मयोग व अलौकिक व्यवहारचातुर्य या गुणत्रयांची त्यांचे ठिकाणीं अखंड एकरूपता झाली असल्यामुळें ते तेव्हांच काय पण आजमितीसहि आणि पुढें केव्हांहि लोकादरास पात्र होतीलच होतील, याविषयीं दुमत असणें संभवनीय नाहीं. आज आपला समाज सर्वस्वीं दीन व दुबळा होऊन अगदीं पिळपिळीत झाला आहे, ही गोष्ट प्रत्येक हिंदूस मान्य असून त्याला पूर्ववत् सुव्यवस्थित व सुदृढ कसा करतां येईल याविषयीं शेंकडों लोक शेंकडों उपाय सुचवूं लागले आहेत. पण त्यांत कोणाचें ऐकावें व कोणाचें सोडावें याविषयीं लोकांना भ्रम पडला असून समाजाची मति सर्वस्वीं कुंठित झाल्यासारखी दिसत आहे.

| विषय | मंत्रविनियोग* |
|---|---|
| पुण्याहवाचन | १ पुनस्त्वादित्या ( ८७ ) २ यथेमां वाचं ( २१८ ) ३ सवस्य ऋद्धि ( ६४ ) ४ स्वस्ति न इन्द्रो ( २१३ ) ५ दीर्घायुस्त्व ओषधे (९२) ६ श्रीश्च ते ( २४७ ) |
| पुरुषसूक्त | सहस्रशीर्षा ( २२६ ) ते 'श्रीश्च ते' ( २४७ ) |
| पुष्पार्पण | श्रीश्च ते लक्ष्मीश्च ( २४७ ) |
| पृथ्वीमंत्र | स्योना पृथिवि ( ३२५ ) |
| पृष्ठोदिविविधान | १ पृष्ठो दिवि ( १४१ ) २ तत्सवितुः ( २५ ) ३ तां सवितुः ( १२६ ) ४ विश्वानि देव ( २२५ ) |
| प्रजापति–आवाहन | प्रजापते न त्वदेता ( २०५ ) |
| प्रदक्षिणा | सप्तास्यासन्परिधयः ( २४० ) |
| प्रातःस्मरण | १ प्रातरग्निं ( २९२ ) २ प्रातर्जितं ( २९३ ) ३ भग प्रणेत ( २९४ ) ४ उतेदानीं (२९५) ५ भग एव भगवान् ( २९६ ) ६ समध्वरायो-षसो ( २९७ ) ७ अश्वावती ( २९८ ) |
| प्रातर्होम | १ इदं विष्णु ( ४२ ) २ तद्विष्णोः ( ४७ ) ३ तद्विप्रासो ( ३०० ) |
| प्राणप्रतिष्ठा | मनो जूति ( ८ ) |
| प्राणायाम | तत्सवितुर्वरेण्य ( २५ ) |
| प्रेताचिताप्रोक्षण | इदमापः प्रवहता ( ४८ ) |
| प्रेतचिति–अप्रदक्षिणा | परं मृत्योऽनुपरेहि ( ३१३ ) |
| प्रेतदहनस्थानशोधन | परीमे गाम ( ३२२ ) |
| प्रेताग्निसंस्कार | क्रव्यादमग्निं ( ३२३ ) |
| प्रेतपूर्णाहुति | अस्मात्त्वमधिजातोसि ( ३२६ ) |
| फलार्पण | याः फलिनीर्या अफला ( ८९ ) |
| बिल्वार्पण | शिवो भव ( ७६ ) |

* मंत्रापुढील कंसातील आकडे शुक्लयजुर्वेद-माध्यंदिन-मालेतील मंत्रांचे आहेत.

| विषय | मंत्रविनियोग* |
|---|---|
| बृहस्पतिग्रह | बृहस्पतेऽतियदर्यो ( २१९ ) |
| ब्रह्म–आवाहन | ब्रह्म जज्ञान ( ९४ ) |
| भस्म–अभिमंत्रण | त्र्यम्बक यजामहे ( ३२ ) |
| भस्मधारण | त्र्यायुष जमदग्ने ( ३३ ) |
| भुक्तपाचन | अग्निरस्मिजन्मना ( १४० ) |
| भूशुद्धि | भूरसि भूमिरसि ( १०३ ) |
| भैरवनमस्कार | यो भूतानामधिपति ( १९४ ) |
| भोजनसंकल्प | प्रजापत न त्वदेतानि ( २०५ ) |
| मंगळग्रह | अग्निर्मूधा ( २१ ) |
| मंगलोच्चारण | १ स्वस्ति न इंद्रो ( २१३ ) २ भद्रं कर्णेभिः ( २१५ ) ३ तं पत्नीभि ( १०९ ) |
| मंत्रपुष्पांजलि | यज्ञेन यज्ञमयजन्त ( २४१ ) |
| मधुपर्क / मधुस्नान | १ मधुवाता ( १०५ ) २ मधुनक्त ( १०६ ) ३ मधुमान्नो ( १०७ ) |
| मनुष्यपितरावाहन | उशन्तस्त्वा ( १७८ ) |
| मार्जन | १ आपो हि ष्ठा ( ७७ ) २ यो वः शिवतमः ( ७८ ) ३ तस्मा अरं गमाम ( ७९ ) |
| मुखविमार्जन | स वर्चसा पयसा ( ९ ) |
| मृत्तिकामंत्र | स्योना पृथिवि ( ३२५ ) |
| मृत्तिकालेपन | इदं विष्णुर्विचक्रमे ( ४२ ) |
| मृत्युदेवताहोम | परमृत्योऽनु परेहि ( ३१३ ) |
| यम आवाहन | सुगावो देवा ( ५८ ) |
| यज्ञोपवीतसूत्रत्रिगुणीकरण | इदं विष्णुर्विचक्रमे ( ४२ ) |
| यज्ञोपवीत प्रक्षालन | १ आपो हि ष्ठा ( ७७ ) २ यो वः शिवतमो ( ७८ ) ३ तस्मा अरं ( ७९ ) |
| रक्षाविधान | १ परीत्य भूतानि (२५८) २ परिद्यावा (२५९) |

* मंत्रापुढील कंसातील आकडे शुक्ल-यजुर्मणि-मालेतील मण्यांचे आहेत.

| विषय | मंत्रविनियोग* |
| --- | --- |
| रक्षोघ्नमंत्र | १ कृणुष्व पाजः ( ९८ ) २ तवभ्रमास ( ९९ ) ३ प्रति स्पशो (१००) ४ उदग्ने तिष्ठ (१०१) ५ ऊर्ध्वो भव ( १०२ ) |
| रात्रसूक्त | १ आनो भद्रा ( २०८ ) २ देवानां भद्रा ( २०९ ) ३ तान्पूर्वया ( २१० ) ४ तन्नो वातो (२११) ५ तमीशानं (२१२) ६ स्वस्ति न इंद्रो ( २१३ ) ७ पृषदश्वा (२१४) ८ भद्रं कर्णेभिः ( २१५ ) |
| रात्रिस्मरण | १ आ रात्रि पार्थिव ( २९० ) २ उपस्तचित्र-माभर ( २९१ ) |
| राष्ट्रभृत्-होम | १ ऋताषाड् ( १३२ ) २ संहितो विश्वसामा ( १३३ ) ३ सुषुम्णः ( १३४ ) ४ इषिरो ( १३५ ) ५ भुज्युः सुपर्णो ( १३६ ) |
| राष्ट्रीय प्रार्थना | आ ब्रह्मन् ( २०१ ) |
| राहुग्रह | कयानश्चित्र ( ३२९ ) |
| रुद्राक्षधारण | त्र्यम्बकं यजामहे ( ३२ ) |
| रुद्र-आवाहन | त्र्यम्बकं यजामहे ( ३२ ) |
| लक्ष्मीमंत्र | श्रीश्च ते लक्ष्मीश्च ( २४७ ) |
| वरुण-आवाहन | विश्वेदेवास आगत ( ५५ ) |
| विश्वेदेव-आवाहन | तत्त्वायामि ( १३८ ) |
| शर्करास्नान | अपां रसमुद्वयसं ( ६५ ) |
| शान्ति-अभिषेक | १ द्यौः शान्ति ( ३३८ ) २ यतो यतो समीहसे ( ३४२ ) |
| शिखाबंधन | मानस्तोके ( ११२ ) |
| शिव-आवाहन | नमः शम्भवाय ( ११४ ) |
| शिव-ध्यान | नमस्ते रुद्र मन्यव ( १११ ) |

* मंत्रापुढील कंसांतील आंकडे शुक्ल-यजुर्मणि-मालेतील मण्यांचे आहेत.

| विषय | मंत्रविनियोग* |
| --- | --- |
| शिवसंकल्प | १ 'यज्जाग्रतो' ( २८१ ) ते 'सुषारथिः ( २८६ ) पर्यंत |
| षडंगन्यास | १ मनोजूति ( ८ ) २ अबोध्यग्नि ( १०८ ) ३ मूर्धानं दिवो (५४) ४ मर्माणि ते (११९) ५ विश्वतश्चक्षुः (११८) ६ मा नस्तोके( ११२) |
| षड्दालमंत्र | १ ब्रह्म जज्ञानं ( ९४ ) २ इदं विष्णु ( ४२ ) ३ नमस्ते ( ११६ ) ४ तत्सवितु ( २५ ) ५ मित्रस्य चर्षणी (८०) ६ इमं मे वरुण (१९६) |
| समिधा–आधान | १ अग्निर्ज्योति ( १९ ) २ सजूर्देवेन ( २० ) |
| सूर्य–अर्घ्यदान | तत्सवितु ( २५ ) |
| सूर्य–आवाहन | आकृष्णेन रजसा ( २७६ ) |
| सूर्य–ध्यान | सूर्यरश्मि ( १२२ ) |
| सूर्य–पुष्पार्पण | सविता त्वा सवानां ( ७० ) |
| सूर्य–पूजन | १ उद्वयतमसस्परि (१९३) २ उदु त्य (५६) ३ चित्रं देवानां ( ५७ ) ४ तत्सवितु ( २५ ) |
| सूर्य–प्रदक्षिणा | विश्वतश्चक्षुरुत ( ११८ ) |
| सूर्योपस्थान | ( अ ) १ उद्वयतमसस्परि ( १९३ ) २ उदु त्य जातवेदस ( ५६ ) ३ चित्रं देवानां (५७) ४ तच्चक्षुर्देवहितं ( ३४३ ) ( ब ) अदृश्रमस्य ( ६२ ) २ हंसः शुचिषत् ( ७४ ) ( क ) 'विभ्राड्बृहत्पिबतु' ( २६४ ) ते 'आकृष्णेन रजसा' ( २७६ ) पर्यंत. |
| सौभाग्यद्रव्यार्पण | अहिरिवभोगैः ( २२४ ) |
| स्तनपान | १ इमं स्तन ( १२८ ) २ यस्ते स्तनः (३४४) |

* मंत्रापुटील कंसांतील आंकडे शुक्ल-यजुर्मणि-मालेंतील मण्यांचे आहेत.



श्रीमद्वाजसनेयिमाध्यंदिन

# शुक्ल-यजुर्मणि-माला.



( शुक्ल-यजुर्वेदांतील निवडक सार्थ मंत्रसंग्रह. )

## मणि १ ला.

परमेष्ठी प्रजापति ऋषि, शाखा-वायु-इंद्र-देवता, अनुष्टुप्-छंद.

हरिः ॐ । इषे त्वोर्जे त्वा वायवं स्थ देवो वः सविता प्रार्पयतु श्रेष्ठतमाय कर्मण अप्यायध्वमघ्न्या इन्द्राय भागं प्रजावतीरनमीवा अयक्ष्मा मा वस्तेन ईशत माघशंसो ध्रुवा अस्मिन्गोपतौ स्यात बह्वी-र्यजमानस्य पशून्पाहि ॥ १-१ ॥

अर्थः--हे शाखे, वृष्टीसाठीं मी तुझें छेदन करतों, आणि बळासाठीं मी तुला तासून सरळ व स्वच्छ करितों. हे वासरांनो, तुम्ही आपापल्या मातांपासून दूर अन्यत्र चरावयास चला; हे गाईंनो, कर्मानुष्ठानास प्रेरणा करणारा असा जो परमेश्वर तो तुम्हांला तृणसंपन्न अशा वनाकडे नेवो. हे अवध्यांनो, इंद्राचा दधिरूप भाग, त्याचे वनांत चोहोंकडे चरून दुग्धरूपानें वर्धन करा. सवत्स, व्याधिहीन, रोगहीन अशा तुम्हांना चोर वगैरे दुष्ट लोक अपहरून नेण्यास समर्थ न होवोत ! तसेंच व्याघ्रादिक हिंस्रप्राणी तुम्हांस भक्षण करण्यास समर्थ न होवोत ! या तुमच्या यजमानाजवळ तुम्ही चिरायु व बहुविध होऊन रहा. हे शाखादेवते, तूं उंच प्रदेशावर राहून या यजमानाच्या गाईगुरांचें चोर-व्याघ्रादिकांच्या भयापासून रक्षण कर । ॥ १ ॥

## मणि २ रा

परमेष्ठी प्रजापति–ऋषि, पयो–देवता, यजु –छंद

वसोः पवित्रमसि शतधारं वसोः पवित्रमसि सहस्रधारम् । देवस्त्वा सविता पुनातु वसोः पवित्रेण शतधारेण सुप्वा कामधुक्षः ॥ १–३ ॥

अर्थ – हे पवित्रा ! शतछिद्रयुक्त व सहस्रछिद्रयुक्त असा जो तू तो दुधाला निर्मल करणारा गाळणीस्वरूप आहेस हे दुधा ! सवितादेव अनतछिद्रयुक्त अशा उत्तम गाळणीवजा पवित्रानें तुला शुद्ध करो ! हे दोहनकर्त्या ! कोणत्या गाईची धार तू आता धार काढलीस ! ॥ २ ॥

## मणि ३ रा

परमेष्ठी प्रजापति–ऋषि, अग्नि–देवता, यजु –छंद

अग्ने व्रतपते व्रतं चरिष्यामि तच्छकेयं तन्मे राध्यताम् । इदमहमनृतात्सत्यमुपैमि ॥ १–५ ॥

अर्थ – हे व्रतपालका ! हे अग्निदेवा ! तुझ्या अनुज्ञेनें मी व्रतानुष्ठान करितों. तें यज्ञकर्म साग करण्यास मी समर्थ होइन असें कर ! तुझ्या प्रसादानें तें माझें यज्ञकर्म निर्विघ्नपणें पार पडो ! या नाशवत मनुष्यजन्मांतून मुक्त होऊन नाशरहित असें देवताशरीर मला प्राप्त होवो ! ॥ ३ ॥

## मणि ४ था

परमेष्ठी प्रजापति–ऋषि, लिंगोक्त–देवता, यजु–छंद

देवस्य त्वा सवितुः प्रसवेऽश्विनोर्बाहुभ्यां पूष्णो हस्ताभ्याम् । अग्नये जुष्टं गृण्हाम्यग्नीषोमाभ्यां जुष्टं गृण्हामि ॥ १–१० ॥

अर्थ – हे हवि ! सूर्यदेवाच्या प्रेरणेवरून अग्निदेवाला व अग्नीषोमांना प्रिय अशा तुला मी अश्विनींच्या बाहूंनीं व पूषाच्या हस्तांनीं ग्रहण करितों ॥ ४ ॥

### मणि ५ वा.

परमेष्ठी प्रजापति–ऋषि, लिंगोक्त–देवता, यजुः–छंद.

पवित्रे स्थो वैष्णव्यौ सवितुर्वः प्रसव उत्पुनाम्यच्छिद्रेण पवित्रेण सूर्यस्य रश्मिभिः। देवीरापो अग्रेगुवो अग्रेपुवोऽग्र इममद्य यज्ञं नयताग्रे यज्ञपतिᳬ सुधातुं यज्ञपतिं देवयुवम् ॥ १–१२ ॥

अर्थः– हे पवित्रांनो। तुम्ही यज्ञसंबंधी आहां. हे जलांनो। सवितादेवाच्या प्रेरणेवरून मी तुम्हांला वायुरूप पवित्रानें व सूर्याच्या किरणांनी अत्युत्तम रीतीनें शुद्ध करितों. हे जलांनो। सखल प्रदेशाकडे वाहत जाणारे व प्रथम सोमरसाचें पान करणारे असे तुम्ही आज रोजी आरंभिलेला हा दर्शपूर्णमास यज्ञ निर्विघ्न पार पाडा. यज्ञाचें उत्तम तऱ्हेनें पोषण करणारा, यज्ञाचें रक्षण करणारा व देवाची इच्छा करणारा, हा जो यजमान त्याला स्वर्ग प्राप्त करून घेण्यासाठीं प्रेरणा करा ॥ ५ ॥

### मणि ६ वा.

परमेष्ठी प्रजापति–ऋषि, विष्णु–देवता, यजुः–छंद.

गायत्रेण त्वा छंदसा परिगृण्हामि त्रैष्टुभेन त्वा छंदसा परिगृण्हामि जागतेन त्वा छंदसा परिगृण्हामि। सुक्ष्मा चासि शिवा चासि स्योना चासि सुषदा चास्यूर्जस्वती चासि पयस्वती च ॥ १–२७ ॥

अर्थः– हे विष्णुदेवा, गायत्री छंदानें मी तुझा परिग्रह करितों. त्रिष्टुभ छंदानें मी तुझा परिग्रह करितों. जगती छंदानें मी तुझा परिग्रह करितों. हे वेदि, तूं सुंदर भूमि आहेस. शांत आहेस. सुखरूप आहेस. देवादिकांना बसावयास सुखकर आहेस. तूं अन्नसंपन्न आहेस. तशीच पण उत्तम रसवतीहि आहेस. ॥ ६ ॥

### मणि ७ वा.

परमेष्ठी प्रजापति–ऋषि, आज्य–देवता, यजुः–छंद.

सवितुस्त्वा प्रसव उत्पुनाम्यच्छिद्रेण पवित्रेण सूर्यस्य रश्मिभिः। सवितुर्वः प्रसव उत्पुनाम्यच्छिद्रेण पवित्रेण वसोः सूर्यस्य रश्मिभिः। तेजोऽसि शुक्रमस्यमृतमसि धाम नामासि प्रियं देवानामनाधृष्टं देवयजनमसि ॥ १–३१ ॥

अर्थः– हे घृता! सवितादेवाच्या आज्ञेत राहणारा मी तुला वायुरूप पवित्रानें व सूर्याच्या किरणांनीं शुद्ध करितों. हे जलानो! सूर्यदेवाच्या प्रेरणेवरून मी तुम्हाला वायुरूप पवित्रानें व सूर्यकिरणांनीं निर्मल करितों. हे आज्य! तू तेज आहेस. तू दीप्तिमान आहेस. तू नाशरहित आहेस. तू देवाचें मन स्थिर करण्याचें स्थान आहेस तू सर्व प्राणिमात्राला आपल्याकडे आकर्षण करून घेणारा आहेस. तूं देवांना प्रिय आहेस राक्षसाना दुर्दम आहेस. आणि देवांना प्रसन्न करण्याचें उत्तम साधनही पण तूच आहेस! ॥ ७ ॥

मणि ८ वा.

आंगिरस बृहस्पति–ऋषि, बृहस्पति–देवता, बृहती–छंद.

मनो॑ जू॒तिर्जु॑षता॒माज्य॑स्य॒ बृह॒स्पति॑र्य॒ज्ञमि॒मं त॑नो॒त्वरि॑ष्टं य॒ज्ञ॑ꣳ स॒मि॒मं द॑धातु। विश्वे॑दे॒वास॑ इ॒ह मा॑दयन्ता॒मो ३ प्रति॑ष्ठ ॥२–१३॥

अर्थः– हे सवितादेवा! भूतभविष्यवर्तमान कालीन गोष्टींचें आकलन करणारें असें जें तुझें मन तें या यज्ञांतील तुपाचें सेवन करो! बृहस्पति हा यज्ञ विस्तार करो! त्याचप्रमाणें तो यज्ञ हिंसारहित करून साग करो! विश्वेदेव या यज्ञांत संतुष्ट होवोत! सवितादेव या यज्ञाचा 'ठीक आहे' अशा शब्दांनीं स्वीकार करून 'आतां जा' असें म्हणून यजमानास जाण्यास परवानगी द्यो. ॥ ८ ॥

मणि ९ वा.

परमेष्ठी प्रजापति–ऋषि, त्वष्टा–देवता, त्रिष्टुप्–छंद.

सं वर्च॑सा॒ पय॑सा॒ सं त॒नूभि॒रग॑न्महि॒ मन॑सा॒ सꣳ शि॒वेन॑। त्वष्टा॑ सु॒दत्रो॒ विद॑धातु॒ रायो॒ऽनु॑मार्ष्टु त॒न्वो॒ यद्विलि॑ष्टम् ॥ २–२४ ॥

अर्थः– आम्ही ब्रह्मतेजानें युक्त होऊं. क्षीरादि रसांनीं युक्त होऊं. भार्यापुत्रादिकांनीं युक्त होऊं. उदारधी विश्वकर्मा आम्हांला उत्तम ऐश्वर्य देवो. आणि आमच्या शरीरांत जें कांहीं व्यंग असेल तें नाहींसें करो! ॥ ९ ॥

मणि १० वा.

परमेष्ठी प्रजापति–ऋषि, सूर्य–देवता, यजुः–छंद.

स्व॒यं॒भूर॑सि॒ श्रेष्ठो॑ र॒श्मिर्व॑र्चो॒दा अ॑सि॒ वर्चो॑ मे देहि। सूर्य॑स्या॒वृत॒मन्वाव॑र्ते ॥ २–२६ ॥

अर्थः– हे सूर्यदेवा ! तूं स्वयंभू आहेस ! तूं श्रेष्ठ असा हिरण्यगर्भरश्मि आहेस. तूं ब्रह्मतेज देणारा आहेस. अतएव मला ब्रह्मतेज दे ! सूर्यदेवान्या वर्तुलगतीचें अनुकरण करून मीही प्रदक्षिणारूपानें आवर्तन करितों. ॥ १० ॥

### मणि ११ वा.

परमेष्ठी प्रजापति–ऋषि, अग्नि–देवता, यजुः–छंद.

अग्ने गृहपते सुगृहपतिस्त्वयाग्नेऽहं गृहपतिना भयास२ सुगृहपतिस्त्वं मयाग्ने गृहपतिना भूयाः । अस्थूरिणौ गार्हपत्यानि सन्तु शत२ हिमाः सूर्यस्यावृतमन्वावर्ते ॥ २–२७ ॥

अर्थः– हे गृहपालका ! हे अग्निदेवा ! गृहाचें संरक्षण करणारा जो तूं, त्य तुझ्या प्रसादानें मी उत्तम गृहपालक होईन असें घडो ! आणि हे भगवन् अग्निदेवा ! गृहस्वामी जो मी त्या माझ्या सेवेनें प्रसन्न होऊन तूंही आमचा उत्तम गृहपालक हो ! याप्रमाणें आमचीं गृहकृत्यें शंभर वर्षेपर्यंत अव्याहत चालोत ! सूर्याच्या आवर्तनाप्रमाणें मीही प्रदक्षिणारूपानें आवर्तन करितों. ॥ ११ ॥

### मणि १२ वा.

प्रजापति–ऋषि, अग्निसोम–देवता, यजुः–छंद.

अग्नये कव्यवाहनाय स्वाहा सोमाय पितृमते स्वाहा । अपहता असुरा रक्षा२सि वेदिषदः ॥ २–२९ ॥

अर्थः– पितरांचें अन्न वाहून नेण्याचा अधिकार ज्याला आहे, अशा त्या कव्यवाहन अग्निदेवाला सुहुत असो ! पितृमान सोमदेवाला सुहुत असो ! वेदिमध्यें राहणारे व पितरांना विरोध करणारे असे जे राक्षस आहेत ते वेदिपासून पार निघून जावोत ! ॥ १२ ॥

### मणि १३ वा.

प्रजापति–ऋषि, कव्यवाहन अग्नि–देवता, त्रिष्टुप्–छंद.

ये रूपाणि प्रतिमुंचमाना असुराः संतः स्वधया चरन्ति । पुरापुरो निपुरो ये भरन्त्यग्निष्टाँल्लोकात्प्रणुदात्यस्मात् ॥ २–३० ॥

अर्थः– पितरांना दिलेल्या अन्नाचें आपण भक्षण करावें अशा हेतूनें स्वतःचें रूप बदलून, पितरांचें सोंग घेऊन जें असुर पितृयज्ञस्थानीं फिरतात, व जे असुर आपलें असुरत्व लपविण्यासाठीं स्थूल अगर सूक्ष्म शरीर धारण करितात अशा चोरट्या असुरांना अग्निदेव पितृयज्ञस्थानापासून दूर पिटाळून देवो। ॥ १३ ॥

### मणि १४ वा.

प्रजापति–ऋषि, पितर–देवता, बृहती–छंद.

अत्र॑ पितरो मादयध्वं यथाभा॒गमावृ॑षायध्वम् । अमीमदन्त पि॒तरो॑ यथाभा॒गमावृ॑षायिषत ॥ २–३१ ॥

अर्थः– अहो पितरांनो। या दर्भासनावर बसून आराम पावा। तुमचा जो कव्यभाग आहे, तो वृषभाप्रमाणें आवृत्त सेवन करा। पितर सुखी झाले. आणि आपापल्या भागाचें ते वृषभाप्रमाणें आवृत सेवन करते झाले. ॥ १४ ॥

### मणि १५ वा.

प्रजापति–ऋषि, लिंगोक्त–देवता, यजुः–छंद.

नमो॑ वः पितरो॒ रसा॑य॒ नमो॑ वः पितरः॒ शोषा॑य॒ नमो॑ वः पितरो जी॒वाय॒ नमो॑ वः पितरः स्व॒धायै॒ नमो॑ वः पितरो घोराय॒ नमो॑ वः पितरो म॒न्यवे॒ नमो॑ वः पितरः॒ पित॑रो नमो॑ वो गृहान्नः पितरो दत्त स॒तो वः॑ पितरो देष्मै॒तद्वः पितरो॒ वास॒ आर्धत्त ॥ २–३२ ॥

अर्थः– हे पितरांनो, तुमच्या रसवर्धक वसंतास नमस्कार. तुमच्या शोषणात्मक ग्रीष्मास नमस्कार. तुमच्या वृष्टिदायक वर्षाऋतूस नमस्कार. तुमच्या अन्नोत्पादक शरदऋतूस नमस्कार. तुमच्या शीतमधुर हेमंत ऋतूस नमस्कार. तुमच्या औषधिदाहक शिशिर ऋतूस नमस्कार. हे पितरांनो, याप्रमाणें वसंतादि षड्-ऋतु-रूपी तुम्हांस नमस्कार असो। हे पितरांनो, आम्हांस भार्यापुत्रादि या व सर्वेच अन्नदानहि करा। आम्ही तुम्हांस आमच्या जवळ असलेलें द्रव्य अर्पण करतों. आणि हें जें सूत्र आहे तें तुम्हांस परिधानार्थ असो. ॥ १५ ॥

## मणि १६ वा

प्रजापति–ऋषि, पितर–देवता, गायत्री–छंद

आधत्त पितरो गर्भं कुमारं पुष्करस्रजम् । यथेह पुरुषोऽसत्
॥ २–३३ ॥

**अर्थ.**– अहो पितरानो ! याच ऋतुमध्ये देव-पितर-मनुष्य यांचे मनोरथ पूर्ण करणारा असा अश्विनीकुमारासारखा सुंदर व निरोगी पुत्ररूपी गर्भ तुम्ही आम्हांस द्या ! ॥ १६ ॥

## मणि १७ वा

प्रजापति–ऋषि, आपो–देवता, विराट्–छंद.

ऊर्जं वहन्तीरमृतं घृतं पयः कीलालं परिस्रुतम् । स्वधा स्थ तर्पयत मे पितॄन् ॥ २–३४ ॥

**अर्थ.**– हे जलानो, मधुर अन्नरस, तूप, दूध, व सुरा, सोमरस यांना वाटून नेणारे असे तुम्ही पितरांचें अन्नस्वरूप आहां म्हणून माझ्या पितरांना तृप्त करा ! ॥ १७ ॥

## मणि १८ वा

सार्पराज्ञी–ऋषि, अग्नि–देवता, गायत्री–छंद

आयं गौः पृश्निरक्रमीदसदन्मातरं पुरः । पितरं च प्रयन्त्स्वः
॥ ३–६ ॥

**अर्थ**– यजमानगृही जाणारा, व विविध रंगाच्या ज्वालांनीं सुशोभित असा हा अग्निदेव सर्वत्र पादविक्षेप करता झाला, पूर्वदिशेकडे तो आहवनीय रूपानें या पृथ्वीवर प्राप्त झाला आहे आणि आदित्यरूपानें स्वर्गावर संचार करीत असल्यामुळें तो द्युलोकावरही प्राप्त झाला आहे ॥ १८ ॥

### मणि १९ वा.

मजापति–ऋषि, लिंगोक्त–देवता, गायत्री–छंद

अग्निर्ज्योतिर्ज्योतिरग्निः स्वाहा सूर्यो ज्योतिर्ज्योतिः सूर्यः स्वाहा। अग्निर्वर्चो ज्योतिर्वर्चः स्वाहा सूर्यो वर्चो ज्योतिर्वर्चः स्वाहा। ज्योतिः सूर्यः सूर्यो ज्योतिः स्वाहा ॥ ३–९ ॥

**अर्थः**–हा जो अग्नि तोच तेजस्वरूप होय. हें जें तेज तेंच अग्निस्वरूप होय. ज्योतिरूप अग्निदेवाला सुहुत असो ! हा जो सूर्यनारायण तोच तेजस्वरूप होय. हे जें तेज तेंच सूर्यनारायण होय. या तेजस्वरूपी सूर्यनारायणाला सुहुत असो ! हा जो अग्निदेव तोच ब्रह्मतेज होय. आणि या अग्निदेवाचें जें तेज तेंही ब्रह्मतेजच होय ब्रह्मतेजस्वरूपी अग्निदेवाला सुहुत असो ! हा जो सूर्यनारायण तोच ब्रह्मतेज होय आणि या सूर्यनारायणाचें जें तेज तेंही ब्रह्मतेजच होय. ब्रह्मतेजस्वरूपी सूर्यनारायणाला सुहुत असो ! तेज तेंच सूर्य आणि सूर्य तोच तेज. या तेजस्वरूपी सूर्यदेवाला सुहुत असो ! ॥ १९ ॥

### मणि २० वा.

मजापति–ऋषि, अग्नि–देवता, गायत्री–छंद, यजुः–छंद

सजूर्देवेन सवित्रा सजू रात्र्येन्द्रवत्या। जुषाणो अग्निर्वेतु स्वाहा। सजूर्देवेन सवित्रा सजूरुषसेन्द्रवत्या । जुषाणः सूर्यो वेतु स्वाहा ॥ ३–१० ॥

**अर्थ.**–सर्व जगाला प्रेरणा करणाऱ्या सविता देवासमवेत, इंद्रासह रात्रिदेवतेसमवेत, आम्हावर प्रेम करणारा अग्निदेव आमचें हविरन्न भक्षण करो ! अग्निदेवाला सुहुत असो ! सवितादेवासमवेत, इंद्रयुक्त उषादेवतेसमवेत आम्हावर प्रेम करणारा सूर्यदेव आमचें हविरन्न भक्षण करो! सूर्यनारायणाला सुहुत असो!॥२०॥

### मणि २१ वा.

गौतम–विरूप–ऋषि, अग्नि–देवता, गायत्री–छंद.

अग्निर्मूर्धा दिवः ककुत्पतिः पृथिव्या अयम् । अपा॑ रेता॑सि जिन्वति ॥ ३–१२ ॥

अर्थः-हा अग्निदेव आदित्यरूपानें स्वर्गावर असतो तोच महानात्मा जगाचें कारण आहे. तोच पृथ्वीचा पालनकर्ता आहे आणि तोच व्रीहियवादि धान्याचें वर्धन करणाराही पण आहे. ॥ २१ ॥

### मणि २२ वा.

देव-ऋषि, अग्नि-देवता, यजुः-छंद.

तनूपा अ॑ग्नेऽसि त॒न्वं॑ मे पाह्यायु॒र्दा अ॑ग्ने॒ऽस्यायु॑र्मे देहि वर्चो॒दा अ॑ग्नेसि वर्चो॑ मे देहि । अग्ने॒ यन्मे॑ त॒न्वा॑ ऊ॒नं तन्म॒ आपृ॑ण ॥३-१७॥

अर्थः- हे अग्निदेवा! तूं शरीरपालन करणारा आहेस. अतएव माझे शरीराचें रक्षण कर! हे भगवन्! तूं आयुष्य देणारा आहेस. मला उदंड आयुष्य दे! हे देवा! तूं ब्रह्मतेज देणारा आहेस. मला ब्रह्मतेज दे! हे अग्निदेवा! माझ्या शरीरामध्यें जें कांहीं व्यंग असेल तें तूं भरून काढ! ॥ २२ ॥

### मणि २३ वा.

देव-ऋषि, अग्नि-देवता.

सं त्वम॑ग्ने॒ सूर्य॑स्य॒ वर्च॑साग॒थाः समृ॑षी॒णाᳪ स्तु॒तेन॑ । सं प्रि॒येण॒ धाम्ना॒ सम॒हमायु॑षा॒ सं वर्च॑सा॒ सं प्र॒जया॒ सᳪ रा॒यस्पोषे॑ण ग्मिषीय ॥ ३-१९ ॥

अर्थः- हे अग्निदेवा! तूं सूर्यतेजानें संपन्न आहेस. ऋषींच्या स्तोत्रानें मंडित आहेस. प्रिय आहुतीनें युक्त आहेस. अतएव, हे भगवन्! तुझ्या प्रसादानें मीही अपमृत्युदोषरहित अशा उदंड आयुष्यानें युक्त होईन असें कर! विद्या-ऐश्वर्यादि प्रयुक्त दिव्यतेजानें संपन्न होईन असें कर! पुत्रपौत्रादि संततीनें युक्त होईन असें कर! ऐश्वर्यादिकानें समृद्ध होईन असें कर! ॥ २३ ॥

### मणि २४ वा.

बंधु-ऋषि, अग्नि-देवता, द्विपदा-विराट्-छंद.

अग्ने॒ त्वं नो॒ अन्त॑म उ॒त त्रा॒ता शि॒वो भ॑वा वरू॒थ्यः॑ । वसु॑र॒ग्निर्वसु॑श्रवा॒ अच्छा॑ नक्षि द्यु॒मत्त॑मᳪ र॒यिं दाः ॥ ३-२५ ॥

अर्थ – हे अग्निदेवा! भक्तजनावर प्रेम करणारा, आहवनीयरूपानें यज्ञगृहांत गमनकरणारा, औदार्यांत लोकविख्यात असा जो तू तो आमच्या अगदीं सन्निध रहा आमचें रक्षण करणारा हो। आमच्यावर सुप्रसन्न हो। आमच्या पुत्रादिकांना हितकारक हो! हे भगवन्! अग्ने! आमच्या सभोंवती तू व्यापून रहा! आणि आम्हास अत्यंत प्रभासपन्न असें ज्ञानरूपी धन बहाल कर! ॥ २४ ॥

## मणि २५ वा

विश्वामित्र–ऋषि, सविता–देवता, गायत्री–छंद

तत्सवितुर्वरेण्य भर्गो देवस्य धीमहि। धियो यो नः प्रचोदयात्
॥ ३–३५ ॥

अर्थ – जो आमच्या बुद्धीला कर्मानुष्ठानास प्रेरणा करितो अशा त्या आदित्य मंडलस्थ परमेश्वराच्या सर्वश्रेष्ठ तेजाचें आम्ही ध्यान करितों ॥ २५ ॥

## मणि २६ वा

आसुरि–ऋषि, अग्नि–देवता, यजु–छंद

भूर्भुवः स्वः सुप्रजा प्रजाभिः स्या२ सुवीरो वीरैः सुपोषः पोषैः।
नर्य प्रजा मे पाहि श२स्य पशून्मे पाह्यथर्य पितु मे पाहि ॥३–३७॥

अर्थ – हे अग्निदेवा! तू पृथ्वीअंतरिक्ष–स्वर्ग या तीनही लोकामध्यें स्थित आहेस तुझ्या प्रसादानें मीं बधुमृत्यादि प्रजेनें मोठा प्रजावान होउन असें घडो! वीर पुत्रांनीं सपन्न होऊन मोठा वीर्यवान् होइन असे कर! सुवर्णादि धनानें सपन्न होऊन मोठा श्रीमान् होइन असें घडो। हे गार्हपत्य अग्निदेवा! माझ्या पुत्रपौत्रादिकांचें तू रक्षण कर! हे आहवनी या देवा! माझ्या अश्वगवादि पशुचें रक्षण कर! हे दक्षिणाग्ने! माझे अन्नाचें रक्षण कर! ॥ २६ ॥

## मणि २७ वा

प्रजापति–ऋषि, यज्ञ–देवता, यजु–छंद

अवभृथ निचुम्पुण निचेरुरसि निचुम्पुणः। अव देवैर्देवकृतमेनो–
ऽयासिषमव मर्त्यैर्मर्त्यकृत पुरुराव्णो देव रिषस्पाहि ॥ ३–४८ ॥

अर्थः– हे अवभृत यज्ञ देवा ! हे मंदगमनशीला ! यद्यपि तूं शीघ्रगमन करणारा आहेस तरी तूं येथें मंदगामी हो ! आमच्या इंद्रियांनीं देवताविषयक जें कांहीं पातक केलें असेल तें सर्व मी या जलप्रवाहांत सोडून देतों. आमच्या ऋत्विजादिकांनीं यज्ञदर्शनार्थ आलेल्या प्रेक्षकांची निंदा अपमानादि कृत्यानें जो कांहीं अपराध केला असेल तो सर्व मी या जलप्रवाहांत सोडून देतों. हे यज्ञनारायणा ! संसाररूपी बंधनापासून आमचें रक्षण कर ! ॥ २७ ॥

## मणि २८ वा.

प्रजापति–ऋषि, इंद्र–देवता, अनुष्टुप्–छंद.

देहि मे ददामि ते नि मे धेहि नि ते दधे । निहारं च हरासि मे निहारं निर्हराणि ते स्वाहा ॥ ३–५० ॥

अर्थः– ( इंद्र म्हणतो कीं हे यजमाना ! ) तूं मला प्रथम हवि अर्पण कर. म्हणजे मीही तुला अपेक्षित फल देईन. मला तूं पुष्कळ हवि मिळवून दे, म्हणजे मीही तुझे मनोरथ पूर्ण करीन. ( यजमान इंद्र देवाला म्हणतो कीं ) हे इंद्रदेवा ! हविरूप किम्मत दिल्यानें जें फल विकत मिळतें तें तूं मला विकत दे ! आणि मीही तुला त्या फलाची योग्य किम्मत हविरूपानें देतों. सुहुत असो ॥ २८ ॥

## मणि २९ वा.

गोतम–ऋषि, इंद्र–देवता, पंक्ति–छंद.

अक्षन्नमीमदन्त ह्यव प्रिया अधूषत । अस्तोषत स्वभानवो विप्रा नविष्ठया मती योजा न्विन्द्र ते हरी ॥ ३–५१ ॥

अर्थः– आमचे पितृपक्षस्थानीय पितर भोजन करते झाले. कारण ते आनंदभरित झालेले दिसतात. आमची पितृभक्ति पाहून प्रसन्न होत्साते त्यांनीं आपली मान डोलविली. आणि तेजःपुंज व प्रतिभासंपन्न अशा त्यांनीं अपूर्व बुद्धिकौशल्यानें आमची मोठी वाहवा केली. हे इंद्रदेवा ! आतां निघण्याची वेळ झाली. अतएव हरी नांवाचे तुझे पिवळ्या रंगाचे घोडे लवकर रथास जुंप. ॥ २९ ॥

## मणि ३० वा

बंधु–ऋषि, सोम–देवता, गायत्री–छंद.

व॒यं सो॑म व्र॒ते तव॒ मन॑स्त॒नूषु॒ बिभ्र॑तः । प्र॒जाव॑न्तः सचे-
-महि ॥ ३–५६ ॥

**अर्थ.**– हे सोमदेवा! आम्ही तुझ्या व्रतानुष्ठानात रत राहून तुझ्या स्वरूपाचें मनात चिंतन करीत पुत्रपौत्रादिकांनी संपन्न होत्साते भोग्य वस्तूंचा उपभोग घेत राहूं। ॥ ३० ॥

## मणि ३१ वा.

वसिष्ठ–ऋषि, रुद्र–देवता, ककुभ्–छंद.

भे॒ष॒जम॑सि भेष॒जं गवेऽश्वा॑य॒ पुरु॑षाय भेष॒जम् । सु॒खं मे॒षाय॑ मे॒ष्यै ॥ ३–५९ ॥

**अर्थः**– हे रुद्रदेवा, तू औषधाप्रमाणें सर्व व्याधिनिवारक आहेस. अतएव आमच्या गवाश्वादिक पशूंना व आमच्या लोकांना सर्वरोगनिवारक असें औषध दे। व आमच्या मेंढ्यामेंढींना सुख दे। ॥ ३१ ॥

## मणि ३२ वा.

वसिष्ठ–ऋषिः, रुद्र–देवता, अनुष्टुप्–छंद.

त्र्य॑म्बकं यजामहे सुग॒न्धिं पु॑ष्टि॒वर्ध॑नम् । उ॒र्वा॒रु॒कमि॑व॒ बन्ध॑नान्मृ-
-त्योर्मु॑क्षीय॒ माऽमृता॑त् । त्र्य॑म्बकं यजामहे सुग॒न्धिं प॑ति॒वेद॑नम् ।
उ॒र्वा॒रु॒कमि॑व॒ बन्ध॑नादि॒तो मु॑क्षीय॒ मामु॒तः ॥ ३–६० ॥

**अर्थः**– दिव्यगंधसंपन्न, धनधान्यसवर्धक, अशा त्रिनेत्र रुद्र देवाचें आम्ही पूजन करितों काकडीचें फळ पक्क झालें म्हणजे जसें तें देंठापासून आपोआप गळून पडतें तद्वत् त्या रुद्रदेवाच्या प्रसादानें आम्ही जन्ममृत्यूच्या बंधनापासून मुक्त व्हावें पण मोक्षाला कधींही न अंतरावें. दिव्यगंधसंपन्न व पति प्राप्त करून देणारा अशा त्रिनेत्र रुद्र देवाचें आम्ही पूजन करितों. काकडीचें फळ पक्क झालें म्हणजे जसें तें देंठापासून सुटून वेगळें होतें तद्वत् आम्ही यजमानकन्यका त्या रुद्र देवाच्या प्रसादानें लग्नानंतर आईबापाच्या गोत्रांतून सुटून मुक्त होवूं. पण पतीपासून कधींही अंतर न पावूं असें घडो। ॥ ३२ ॥

### मंत्र ३३ वा

नारायण–ऋषि, आशी–देवता, उष्णिक्–छंद

त्र्यायुषं जमदग्नेः कश्यपस्य त्र्यायुषम्। यद्देवेषु त्र्यायुषं तन्नो अस्तु त्र्यायुषम् ॥ ३–६२ ॥

**अर्थ** – जमदग्नि व काश्यप या ऋषींनीं व तसेंच इंद्रादिदेवांनीं आपापल्या बाल्ययौवनवार्धक्यांत जसें जसें आचरण केलें, तसें तसें आचरण आमच्याकडून त्या त्या वयांत घडो ॥ ३३ ॥

### मंत्र ३४ वा

प्रजापति–ऋषि, आपो–देवता, अत्यष्टि–छंद

आपो अस्मान्मातरः शुन्धयन्तु घृतेन नो घृतप्वः पुनन्तु। विश्वꣳहि रिप्रं प्रवहन्ति देवीरुदिदाभ्यः शुचिरा पूत एमि। दीक्षातपसोस्तनूरसि तां त्वा शिवाꣳ शग्मां परिदधे भद्रं वर्णं पुष्यन् ॥ ४–२ ॥

**अर्थ** – मातेप्रमाणें पालन करणाऱ्या जलदेवता आम्हांस पुनीत करोत! प्रवाहानें पुनीत करणाऱ्या देवता आम्हांस प्रवाहमलानें पुनीत करोत! तेजस्वी उदक आमचें सर्वही पातक वाहून नेवो! स्नान व आचमन या दोहोंनीं बाह्यांतर शुचिर्भूत झालेला मी आतां उदकांतून बाहेर येतों. हे क्षौमवस्त्रा! दीक्षणीयेष्टि व उपसदिष्टि यांच्या देवतांना तू शरीराप्रमाणें प्रिय आहेस. दीक्षा व तप या देवतांच्या शरीरस्थानीं असणारा, तसाच मंगलप्रद, व सुखकर असा जो तू, त्या तुला माझें सौंदर्य वाढविण्याकरितां मी परिधान करितों ॥ ३४ ॥

### मंत्र ३५ वा

प्रजापति–ऋषि, नवनीत–देवता, यजु–छंद

महीनां पयोऽसि वर्चोदा असि वर्चो मे देहि। वृत्रस्यासि कनीनकश्चक्षुर्दा असि चक्षुर्मे देहि ॥ ४–३ ॥

**अर्थ**– हे नवनीता! तू गाईचें दूध आहेस तसाच तू कांतिप्रद आहेस. अतएव तू मला उत्तम कांति दे। हे अंजना! तू वृत्रासुराच्या डोळ्यांतील बाहुली आहेस. तूं दृष्टिप्रद आहेस. अतएव मला उत्तम दृष्टि दे। ॥ ३५ ॥

### मणि ३६ वा.

प्रजापति-ऋषि, प्रजापति देवता, यजुः- छंद.

चित्पतिर्मा पुनातु वाक्पतिर्मा पुनातु देवो मा सविता पुनात्वच्छिद्रेण पवित्रेण सूर्यस्य रश्मिभिः । तस्य ते पवित्रपते पवित्रपूतस्य यत्कामः पुने तच्छकेयम् ॥ ४-४ ॥

अर्थः- प्रजापति देव छिद्ररहित वायुरूप पवित्रानें व सूर्यकिरणांनीं मला पुनीत करो। बृहस्पति देव मला पुनीत करो। सवितादेव मला पुनीत करो। हे पुण्यजन पालका, तुझ्या पवित्रानें पुनीत झालेला जो मी-हा यजमान-त्याचे मनोरथ सफल होवोत। यज्ञानुष्ठान करण्याची इच्छा करणारा हा मी, या माझ्या शरीरास, पुनीत करितों. यज्ञानुष्ठान यथासांग करण्यास मी समर्थ होईन असें घडो। ॥ ३६ ॥

### मणि ३७ वा.

प्रजापति-ऋषि, आपो-देवता, जगती-छंद.

श्वात्राः पीता भवत यूयमापो अस्माकमन्तरुदरे सुशेवाः । ता अस्मभ्यमयक्ष्मा अनमीवा अनागसः स्वदन्तु देवीरमृता ऋतावृधः ॥ ४-१२ ॥

अर्थः- हे जला, मीं तुझें प्राशन केलें आहे. तर तू माझ्या उदरात लवकर जीर्ण हो. आमच्या उदरांत तूं चांगला सुखी रहा. महारोगरहित, व्याधिनिवारक, पापहारक, यज्ञवर्धक, तेजस्वी, मृत्युनिवारक असें तें उदक आम्हासाठीं माधुर्ययुक्त होवो. ॥ ३७ ॥

### मणि ३८ वा.

प्रजापति-ऋषि, अग्नि-देवता, अनुष्टुप्-छंद.

अग्ने त्वꣳसुजागृहि वयꣳ सुमन्दिषीमहि । रक्षा णो अप्रयुच्छन्प्रबुधे नः पुनस्कृधि ॥ ४-१४ ॥

अर्थः- हे अग्निदेवा! तूं चांगला जागृत रहा! आम्ही निद्रावश होतों, आम्ही झोपी गेलों म्हणजे तू आमचें सावध राहून रक्षण कर। आणि हे अग्निदेवा, तूं पुन्हा आम्हांस जागृत कर! ॥ ३८ ॥

## मणि ३९ वा.

प्रजापति-ऋषि, अग्नि-देवता, यजुः-छंद.

पुनर्मनः पुनरायुर्म आगन्पुनः प्राणः पुनरात्मा म आगन्पुनश्चक्षुः पुनः श्रोत्रं म आगन् । वैश्वानरो अदब्धस्तनूपा अग्निर्नः पातु दुरितादवद्यात् ॥ ४-१५ ॥

अर्थः- सुषुप्तकाळीं विलीन झालेलें माझें मन पुनः आतां माझ्या शरीरांत जागृत झालें. नष्टप्राय झालेलें माझें आयुष्य पुनः आतां माझ्या शरीरांत प्राप्त झालें. माझा प्राण पुनः माझ्या शरीरांत जागृत झाला. माझा जीव पुनः माझ्या शरीरांत प्रविष्ट झाला. माझी दृष्टि पुनः मला प्राप्त झाली. माझें श्रोत्र पुनः मजकडे प्राप्त झालें. सर्व जगाचा मित्र, अजिंक्य, आमच्या शरीराचें रक्षण करणारा, असा हा अग्निदेव निंद्य पापापासून आमचें रक्षण करो ! ॥ ३९ ॥

## मणि ४० वा.

सूर्य-ऋषि, सूर्य-देवता, जगती-छंद.

नमो मित्रस्य वरुणस्य चक्षसे महो देवाय तदृतꣳ सपर्यत । दूरेदृशे देवजाताय केतवे दिवस्पुत्राय सूर्याय शꣳसत ॥ ४-३५ ॥

अर्थः-सर्व जगाला पाहणारा, अत्यंत तेजस्वी, दूरचें पाहणारा, देवांना अनुग्रह करण्याकरितां जन्मलेला, विज्ञानघन, स्वर्गलोकाचें रक्षण करणारा, असा जो सूर्यनारायण, त्या सूर्यनारायणाला नमस्कार असो ! हे ऋत्विजांनो, त्या सत्यस्वरूपी सूर्यनारायणाची उपासना करा ! आणि त्याची स्तुति करा ! ॥ ४० ॥

## मणि ४१ वा.

श्यावाश्व-ऋषि, सविता-देवता, जगती-छंद.

युञ्जते मन उत युञ्जते धियो विप्रा विप्रस्य बृहतो विपश्चितः । वि होत्रा दधे वयुनाविदेक इन्मही देवस्य सवितुः परिष्टुतिः स्वाहा ॥ ५-१४ ॥

अर्थः- थोर व बुद्धिमान अशा यजमानाचे यज्ञपुरोहित मन लौकिक विचारांतून काढून यज्ञविचारांत नियत करितात. व त्याचप्रमाणें इंद्रियें लौकिक कृत्यांतून काढून यज्ञकार्यांत नियमन करितात, हें विप्राचें मनोनियमनसामर्थ्य जो सर्वथी साक्षी आहे अशा त्या एकट्या सविता देवानेंच निर्माण केलें आहे. सविता देवाची स्तुति मोठी आहे. त्याला सुहुत असो ! ॥ ४१ ॥

मणि ४२ वा.

मेधातिथि-ऋषि, विष्णु-देवता, गायत्री-छंद.

इदं विष्णुर्विचक्रमे त्रेधा निदधे पदम् । समूढमस्य पाꣳसुरे स्वाहा ॥ ५-१५ ॥

अर्थः- भगवान विष्णुदेवानें हें सर्व विश्व व्यापून सोडिलें आहे. अग्निरूपानें या पृथिवीवर, वायुरूपानें द्युलोकावर, व सूर्यरूपानें स्वर्गावर याप्रमाणें तीनवेळां त्यानें पदक्षेपण केलें. या विष्णुदेवाच्या त्रैलोक्यव्यापक पादामध्यें हें संपूर्ण विश्व समाविष्ट झालें आहे ! त्या विष्णुदेवाला सुहुत असो ! ॥ ४२ ॥

मणि ४३ वा.

दीर्घतमा-ऋषि, विष्णु-देवता, त्रिष्टुप् छंद.

विष्णोर्नुकं वीर्य्याणि प्रवोचं यः पार्थिवानि विममे रजाꣳसि । यो अस्कभायदुत्तरꣳ सधस्थं विचक्रमाणस्त्रेधोरुगायो विष्णवे त्वा ॥ ५-१८ ॥

अर्थः- ज्यानें पृथ्वी, अंतरिक्ष व स्वर्गलोक निर्माण केले, ज्यानें वर असलेला द्युलोक अंतराळींच सांवरून धरिला, ज्यानें अग्नि-वायु-सूर्य या तीन रूपानें सगळें त्रैलोक्य पादाक्रांत केलें व ज्याला महर्षि स्तुति करून भक्तीनें आळवितात अशा त्या विष्णुदेवाच्या प्रचंड शौर्यकथांचें मी मोठ्या भक्तीनें वर्णन करतों. हे काष्ठ ! विष्णुदेवप्रीत्यर्थ मी तुला खणून काढतों. ॥ ४३ ॥

मणि ४४ वा.

प्रजापति-ऋषि, औदुम्बरी-देवता, यजुः-छंद.

ध्रुवासि ध्रुवोऽयं यजमानोऽस्मिन्नायतने प्रजया पशुभिर्भूयात् । घृतेन द्यावापृथिवी पूर्येथामिन्द्रस्य छदिरसि विश्वजनस्य छाया ॥ ५-२८ ॥

अर्थः- हे औदुंबर शाखे, तूं स्थिर आहेस. तुझ्याप्रमाणेंच हा यजमानही आपल्या पुत्रादिकांसह व पश्वादिकांसह आपल्या घरामध्यें स्थिर असो ! घृतानें द्यावापृथिवी पूर्ण होवोत. हे कटा, तूं इंद्राचें छत्र आहेस. अतएव या यज्ञमंडपातील लोकांना तूं छायारूप हो ॥ ४४ ॥

### मणि ४५ वा.

अगस्त्य-ऋषि, अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद.

अग्ने नय सुपथा राये अस्मान्विश्वानि देव वयुनानि विद्वान् । युयोध्यस्मज्जुहुराणमेनो भूयिष्ठां ते नम उक्तिं विधेम ॥ ५-३६ ॥

अर्थः-हे अग्निदेवा ! सर्व कर्मांचें तूं रहस्य जाणणारा आहेस. अतएव कर्मांचें अनुष्ठान करणाऱ्या आम्हास तूं यज्ञफलरूप स्वर्ग-संपत्तीकडे देवयानमार्गानें घेवून जा ! आमच्या यज्ञक्रियेस अडथळा आणणारें असें जें पाप असेल तें आम्हांपासून दूर कर ! तुला आम्ही पुष्कळ नमस्कार करितों ॥ ४५ ॥

### मणि ४६ वा.

मेधातिथि-ऋषि, विष्णु-देवता, गायत्री-छंद.

विष्णोः कर्माणि पश्यत यतो व्रतानि पस्पशे । इन्द्रस्य युज्यः सखा ॥ ६-४ ॥

अर्थः- हे ऋत्विजांनो ! यज्ञाचा अधिष्ठाता असा जो भगवान विष्णुदेव त्या विष्णुदेवाचीं सृष्टिसंहारादि अद्भुत कर्में तुम्ही अवलोकन करा. त्या आपल्या कर्मांनीं त्यानें तुमचीं लौकिक व वैदिक कर्में बद्ध केलीं आहेत. तो देव इंद्राचा अगदीं अनुरूप सखा आहे ॥ ४६ ॥

### मणि ४७ वा.

मेधातिथि-ऋषि, विष्णु-देवता, गायत्री-छंद.

तद्विष्णोः परमं पदꣳ सदा पश्यन्ति सूरयः । दिवीव चक्षुराततम् ॥ ६-५ ॥

अर्थः- चक्षुप्रमाणे आकाशांत प्रसारित असलेलें असें जें विष्णुदेवाचें सर्वरूपी श्रेष्ठ स्वरूप, त्याचें विद्वान लोक सदैव ध्यान करीत असतात ॥ ४७ ॥

## मणि ४८ वा.

मेधातिथि–ऋषि, आपो–देवता, महापंक्ति–छंद.

इ॒दमा॑पः॒ प्रव॑हताव॒द्यं च॒ मलं॑ च॒ यत्। यच्चा॑भिदु॒द्रोहानृ॑तं॒ यच्च॑ शे॒पे अ॑भी॒रुण॑म्। आपो॑ मा॒ तस्मा॒देन॑सः॒ पव॑मानश्च मुञ्चतु ॥६-१७॥

अर्थः– हे जलानो! आमच्या हातून जें पातक घडलें असेल, तें दूर वाहून न्या। अश्लील असे जे आमचे निंदा शापादि असतील आणि आमच्या शरीरास जो मळ लागलेला असेल तो सर्व साफ धुवून काढा! खोटेंनाटें बोलून अगर चाहडीचुगली करून आम्हीं जो दुसऱ्याचा अपराध केला असू अथवा निरपराध्याला जे शिव्याशाप दिले असतील, त्या सर्व दोषापासून जलदेवता व वायुदेव आम्हांस मुक्त करोत! ॥ ४८ ॥

## मणि ४९ वा.

प्रजापति–ऋषि, लिंगोक्त–देवता, यजुः–छंद.

स॒मु॒द्रं ग॑च्छ॒ स्वाहा॒न्तरि॑क्षं गच्छ॒ स्वाहा॑ दे॒वꣳ स॑वि॒तारं॑ गच्छ॒ स्वाहा॑ मि॒त्रावरु॑णौ गच्छ॒ स्वाहा॑होरा॒त्रे ग॑च्छ॒ स्वाहा॒ छंदा॑ꣳसि गच्छ॒ स्वाहा॒ द्यावा॑पृथि॒वी ग॑च्छ॒ स्वाहा॑ य॒ज्ञं ग॑च्छ॒ स्वाहा॒ सोमं॑ गच्छ॒ स्वाहा॑ दि॒व्यं नभो॑ गच्छ॒ स्वाहा॒ग्निं वै॑श्वान॒रं ग॑च्छ॒ स्वाहा॒ मनो॑ मे॒ हार्दि॑ यच्छ॒ दिवं॑ ते धू॒मो ग॑च्छतु॒ स्व॒र्ज्योतिः॑ पृथि॒वीं भस्म॒नापृ॑ण॒ स्वाहा॑ ॥ ६–२१ ॥

अर्थः– हे हवि! तृप्त करण्याकरितां तूं समुद्रदेवाप्रत जा। सुहुत असो! अंतरिक्ष देवाप्रत जा! सुहुत असो! सूर्य देवाप्रत जा, सुहुत असो! अहोरात्र देवाकडे जा! सुहुत असो! छंदो देवाकडे जा! सुहुत असो! द्यावापृथिवी देवताकडे जा! सुहुत असो! विष्णु देवाकडे जा! सुहुत असो! सोमदेवाकडे जा! सुहुत असो! दिव्य आकाशदेवतेकडे जा! सुहुत असो! वैश्वानर अग्निदेवाकडे जा! सुहुत असो! हे देवांनो! माझें मन माझ्या अंतःकरणांतच वाढून ठेवा. हे हवी! तुझा धूर स्वर्गाप्रत जावो! तुझी ज्वाला आदित्याप्रत जावो! आणि भस्मानें पृथ्वीला तूं सर्वबाजूनें व्यापून टाक! सुहुत असो॥४९॥

### मणि ५० वा.

प्रजापति–ऋषि, लिंगोक्त–देवता, अनुष्टुप्–छंद.

हविष्मतीरिमा आपो हविष्माँ२ आ विवासति । हविष्मान्देवो अध्वरो हविष्माँ२ ॥ अस्तु सूर्यः ॥ ६–२३ ॥

अर्थः– हवीनें सपन्न असा हा यजमान हवीनें संपन्न अशा या जलदेवतेची परिचर्या करितो. तेजस्वी यज्ञनारायण हवीनें संपन्न असो ! आणि सूर्यदेवही पण हविष्मान् असो ! ॥५०॥

### मणि ५१ वा.

प्रजापति–ऋषि, आपो–देवता, पंक्ति–छंद.

देवीरापो अपांनपाद्यो व ऊर्मिर्हविष्य इन्द्रियावान्मदिन्तमः । तं देवेभ्यो देवत्रा दत्त शुक्रपेभ्यो येषां भाग स्थ स्वाहा ॥ ६–२७ ॥

अर्थः– हे जलदेवतांनो ! शुद्ध, वीर्यवर्धक, आणि अत्यंत हर्षकारक असा हा तुमचा अपत्य रूप तरंग आहे. तो देवाकडे जाणारा असून, ज्या देवांचा तुम्ही भाग आहा, त्या शुभ्र सोमरसाचें पान करणाऱ्या देवांना अर्पण करा ! ॥५१॥

### मणि ५२ वा.

प्रजापति–ऋषि, आज्य–देवता, अनुष्टुप्–छंद.

कर्षिरसि समुद्रस्य त्वाक्षित्या उन्नयामि । समापो अद्भिरग्मत समोषधीभिरोषधीः ॥ ६–२८ ॥

अर्थः– हे आज्य ! तुला देवानो भक्षण केलें आहे. हे जला ! समुद्र क्षीण न व्हावा म्हणून मी तुला ग्रहण करितो. (मैत्रावरुणचमसांतील) उदक (वसतीवरी) उदकाशीं संयुक्त होवो ! आणि मुग-मसुरादि धान्यें व्रीहियवादि धान्याशी संयुक्त होवोत ! ॥५२॥

### मणि ५३ वा.

परुच्छेप-ऋषि, विश्वदेव-देवता, त्रिष्टुप्-छंद.

ये देवासो दिव्येकादश स्थ पृथिव्यामध्येकादश स्थ । अप्सुक्षितो महिनैकादश स्थ ते देवासो यज्ञमिमं जुषध्वम् ॥ ७–१९ ॥

अर्थः–हे देवासदेवानो! जे तुम्ही आपल्या महाभाग्यानें स्वर्गलोकांत अकराच आहा, पृथ्वीवरही अकराच आहां, अंतरिक्षामध्यें अकराच आहा, ते तुम्ही या यज्ञाचें सेवन करा! ॥ ५३ ॥

### मणि ५४ वा.

भरद्वाज–ऋषि, वैश्वानर–देवता, त्रिष्टुप्–छंद.

मूर्धानं दिवो अरतिं पृथिव्या वैश्वानरमृत आजातमग्निम्। कविꣳ सम्राजमतिथिं जनानामासन्ना पात्रं जनयन्त देवाः ॥७–२४॥

अर्थः– द्युलोकाच्या शिरोभागीं सूर्यरूपानें राहून प्रकाशणारा, विश्वाचा नियामक, जगन्मित्र, यज्ञासाठीं उत्पन्न झालेला, प्रतिभासपन्न, सकलैश्वर्यसंपन्न, जगद्वंद्य, मुखांत चमस पात्र धरलेला अशा अग्निदेवास इन्द्रादि देवांनीं निर्माण केला! ॥ ५४ ॥

### मणि ५५ वा.

गृत्समद–ऋषि, वैश्वदेव–देवता, गायत्री–छद.

विश्वेदेवास आगत शृणुता म इमꣳ हवम्। एदं बर्हिर्निषीदत। उपयामगृहीतोऽसि विश्वेभ्यस्त्वा देवेभ्य एष ते योनिर्विश्वेभ्यस्त्वा देवेभ्यः ॥ ७–३४ ॥

अर्थः–हे विश्वे देवानो! तुम्ही या आमच्या यज्ञात आगमन करा. येथें आल्यावर आमची प्रार्थना ऐकून घ्या या दर्भासनावर अधिष्ठित व्हा. हे सोमा! मी तुला या उपयाम पात्रात धरलें आहे हे ग्रहा सर्व देवाकरिता म्हणून मी तुला ग्रहण करितों हें तुझें बसावयाचें स्थान आहे. सर्व देवाकरितां मी तुला त्या स्थानावर अधिष्ठित करितों. ॥ ५५ ॥

### मणि ५६ वा.

प्रस्कण्व–ऋषि, सूर्य–देवता, गायत्री–छंद

उदु त्यं जातवेदसं देवं वहन्ति केतवः। दृशे विश्वाय सूर्यꣳ स्वाहा ॥ ७–४१ ॥

अर्थ–सूर्याचे किरण ज्ञानाचा जनक जो सूर्य देव, त्या लोकप्रसिद्ध सूर्य देवाला जगद्दर्शनार्थ वर आकाशांतून वाहून नेतात. त्या सूर्यनारायणास सुहुत असो! ॥ ५६ ॥

### मणि ५७ वा.

कुत्स-ऋषि, सूर्य-देवता, त्रिष्टुप्-छंद.

चित्रं देवानामुदगादनीकं चक्षुर्मित्रस्य वरुणस्याग्नेः । आप्रा द्यावापृथिवी अन्तरिक्ष५ सूर्यं आत्मा जगतस्तस्थुषश्च स्वाहा ॥ ७-४२ ॥

अर्थः-किरणाचा पुंज, व मित्र, वरुण अग्नि यांचा नेत्र असा हा सूर्यदेव उदयाचलावर उदय पावता झाला आणि आश्चर्य हें कीं स्वर्ग, पृथ्वी व नभोमंडल हीं त्यानें आपल्या देदीप्यमान तेजानें कोंडून सोडलीं! सूर्यदेव हा चराचर सृष्टीचा आत्मा आहे. त्या सूर्यदेवाला सुहुत असो। ॥ ५७ ॥

### मणि ५८ वा.

प्रजापति-ऋषि, देव-देवता, त्रिष्टुप्-छंद.

सुगा वो देवाः सदना अकर्म य आजग्मेद५ सवनं जुषाणाः । भरमाणा वहमाना हवी५ष्यस्मे धत्त वसवो वसूनि स्वाहा ॥८-१८॥

अर्थः- हे दिव्यविबुधांनो! हा यज्ञ सेवन करण्याकरितां म्हणून जे तुम्हीं येथें आलां आहा त्या तुमचीं स्थानें आम्हीं सुगम करून ठेविलीं आहेत. हे वसुदेवांनो। हा यज्ञ समाप्त झाला म्हणजे रथांतून व खांद्यावरून तुम्ही हविरन्न वाहून घेऊन चला व जातांना आम्हांस कृपा करून उत्तमोत्तम संपत्ति अर्पण करा! तुम्हांस सुहुत असो। ॥ ५८ ॥

### मणि ५९ वा.

मनसस्पति-ऋषि, वायु-देवता, विराट्-छंद.

देवा गातुविदो गातुं वित्त्वा गातुमित । मनसस्पत इमं देव यज्ञ५ स्वाहा वाते धाः ॥ ८-२१ ॥

अर्थः- हे यज्ञ जाणणाऱ्या देवांनो! आमचा हा यज्ञ समाप्त झाला असें समजून या यज्ञांत संतुष्ट झालेले तुम्ही आपल्या मार्गानें प्रयाण करा! हे प्रजापति देवा। हा समाप्त झालेला यज्ञ मी तुझ्या स्वाधीन करितों. आणि तूं तो वायुदेवाला पोंचव ॥ ५९ ॥

### मणि ६० वा.

प्रजापति–ऋषि, यज्ञ–देवता, यजुः–छंद.

यज्ञं य॒ज्ञं ग॑च्छ य॒ज्ञप॑तिं गच्छ॒ स्वां योनिं॒ ग॑च्छ॒ स्वाहा॑ । ए॒ष ते॑ य॒ज्ञो य॑ज्ञपते स॒हसू॑क्तवाकः॒ सर्ववी॑र॒स्तं जु॑षस्व॒ स्वाहा॑ ॥ ८-२२ ॥

**अर्थः–** हे यज्ञदेवा ! तू विष्णुदेवाप्रत जा ! फलरूपानें तूं यजमानाप्रत जा ! आपल्या जन्मस्थानभूत वायुदेवाकडे जा ! तुला सुहुत असो ! हे यजमाना ! विविध स्तोत्रांनीं व सोमपुरोडाशादिकांनी युक्त असा हा यज्ञ तो तुझाच आहे. त्याचा फलरूपानें तूं उपभोग कर ! सुहुत असो ! ॥ ६० ॥

### मणि ६१ वा.

मेधातिथि–ऋषि, द्यावापृथिवी–देवता, गायत्री–छंद.

म॒ही द्यौः पृ॑थि॒वी च॑ न इ॒मं य॒ज्ञं मि॑मिक्षताम् । पि॒पृ॒तां नो॒ भरी॑मभिः ॥ ८–३२ ॥

**अर्थः–** सर्वोत्कृष्ट असा हा स्वर्गलोक व पृथिवीलोक हा आमचा यज्ञ आपापल्या परीनें समृद्ध करोत ! आणि त्याचप्रमाणें आमचीं घरें सुवर्ण–पशु–धन–धान्यादिकांनीं समृद्ध करोत ! ॥ ६१ ॥

### मणि ६२ वा.

प्रस्कण्व–ऋषि, सूर्य–देवता, गायत्री–छंद.

अदृ॑श्रमस्य के॒तवो॒ वि र॒श्मयो॒ जनाँ॒२ऽ अनु॑ । भ्राज॑न्तो अ॒ग्नयो॑ यथा । उ॒प॒या॒मगृ॑हीतोऽसि॒ सूर्या॑य त्वा भ्राजा॒यैष ते॒ योनिः॒ सूर्या॑य त्वा भ्राजा॒य । सूर्य॑ भ्राजिष्ठ भ्राजि॑ष्ठ॒स्त्वं दे॒वेष्व॑सि भ्राजि॑ष्ठो॒ऽहं म॑नु॒ष्ये॑षु भूयासम् ॥ ८–४० ॥

**अर्थः–** तेजःपुंज अग्नीप्रमाणें तळपणारे असे या सूर्यदेवाचे जे पदार्थ प्रकाशक किरण आहेत, ते प्राणिमात्राला व्यापून टाकितात. हे उपयामपात्रा, तूं ग्रहण केलें गेलेलें आहेस. अत्यंत देदीप्यमान अशा सूर्यदेवाकरितां मी तुझें ग्रहण करितों. हा सूर्य तुझें जन्मस्थान आहे. त्या तेजस्वी सूर्यदेवाकरता मी तुझी स्थापना करतों. हे तेजःपुंज सूर्यदेवा ! सर्व देवांमध्यें तू जसा अत्यंत प्रभावसंपन्न आहेस तद्वतच मीहि तुझ्या कृपेनें अखिलमानवकोटीत अत्यंत तेजस्वी होऊन असें घडो ! ॥ ६२ ॥

### मणि ६३ वा.

कुसुरुविंदु–ऋषि, गो–देवता, महापंक्ति–छंद.

आजिंघ्र कलशं मह्या त्वा विशन्त्विन्दवः । पुनरूर्जा निवर्तस्व सा नः सहस्रं धुक्ष्वोरुधारा पयस्वती पुनर्माविशताद्रयिः ॥८–४२॥

अर्थः–हे धेनू! या द्रोणकलशांतील सोमरस तूं पान कर. हा सोमरस तुझ्या उदरांत प्रविष्ट होवो! तो दुग्धरूपानें पुन्हा आमचेकडेच पाठव! तूं आम्हांस विपुल संपत्ति दे! तुझ्या रूपानें विपुल दूध देणारी अशी सुंदर गाय आम्हांस पुन्हा प्राप्त होवो! आणि तसेंच आम्हांस पुष्कळ संपत्तीचाही लाभ घडो! ॥ ६३ ॥

### मणि ६४ वा.

देष–ऋषि, आत्मस्तुति–देवता, बृहती–छंद.

सत्रस्य ऋद्धिरस्यगन्म ज्योतिरमृता अभूम । दिवं पृथिव्या अध्यारुहामाविदाम देवान्स्वर्ज्योतिः ॥ ८–५२ ॥

अर्थः–हे सोमा! तूं यज्ञसमृद्धि आहेस. म्हणून आम्ही यजमान आदित्यरूप ज्योतिप्रत प्राप्त झालों. आम्ही अमर झालों. पृथ्वीलोकांतून वर स्वर्ग लोकावर आरूढ झालों. आतां आम्ही इन्द्रादि देवांचें दर्शन घेऊं. आणि तेजस्वी स्वर्गाचेंही पण अवलोकन करूं. ॥ ६४ ॥

### मणि ६५ वा.

बृहस्पति–इंद्र, ऋषी, रस–देवता, अनुष्टुप्–छंद.

अपा॑ᳪ रसमुद्वयसᳪ सूर्ये सन्तᳪ समाहितम् । अपा॑ᳪ रसस्य यो रसस्तं वो गृण्हाम्युत्तममुपयामगृहीतोऽसीन्द्राय त्वा जुष्टं गृण्हाम्येष ते योनिरिन्द्राय त्वा जुष्टतमम् ॥ ९–३ ॥

अर्थः–सूर्यमंडलामध्यें स्थापन झालेला व अन्नाचा उत्पादक असा जो उदकांचा रस म्हणजे वायु त्या वायूला मी ग्रहण करितों. आणि वायूचा जो अत्युत्तम रस म्हणजे प्रजापति त्या प्रजापतीला, हे देवानों! मी तुम्हांकरितां ग्रहण करितों. हे सोमा! तूं उपयाम पात्रानें धरला गेला आहेस; इंद्राला प्रिय असा तूं त्या तुला ग्रहण करितों. ही जागा तुझें स्थान आहे. इंद्राला अत्यंत प्रिय अशा तुला त्या स्थानावर बसवितों. ॥ ६५ ॥

### मणि ६६ वा.

वसिष्ठ–ऋषि, अश्व–देवता, विराट्–छंद

श नो भवन्तु वाजिनो हवेषु देवताता मितद्रवः स्वर्काः । जम्भ-
यन्तोऽहिं वृक॑ रक्षांसि सनेम्यस्मद्युयवन्नमीवाः ॥ ९–१६ ॥

अर्थ – यज्ञांत आव्हान केल्यावेळीं, मितगमन करणारे, अत्यंत तेजस्वी, सर्प, लांडगे, राक्षस इत्यादि दुष्ट प्राण्यांचा संहार करणारे असे अश्व देव आम्हांस सुखरूप होवोत। आणि ते आमच सकल व्याधींचें लवकर निरसन करोत।॥६६॥

### मणि ६७ वा

वसिष्ठ–ऋषि, अश्व–देवता त्रिष्टुप्–छंद

वाजे वाजेऽवत वाजिनो नो धनेषु विप्रा अमृता ऋतज्ञाः । अस्य
मध्वः पिबत मादयध्वं तृप्ता यात पथिभिर्देवयानैः॥ ९ –१८ ॥

अर्थ – अहो अश्वदेवांनो। प्रतिभासपन्न, अमर, सत्यज्ञ असे तुम्ही आम्हास अन्न व संपत्ति प्राप्त झाली असतां आमचें रक्षण करा। हा मध प्राशन करा। मधुपान करून तृप्त व्हा। आणि तृप्त झालां म्हणजे देवयान मार्गानें परत चला ॥ ६७ ॥

### मणि ६८ वा

प्रजापति–ऋषि, प्रजापति–देवता, यजु –छंद

आयुर्यज्ञेन कल्पतां प्राणो यज्ञेन कल्पतां चक्षुर्यज्ञेन कल्पताᳬ
श्रोत्रं यज्ञेन कल्पतां पृष्ठं यज्ञेन कल्पतां यज्ञो यज्ञेन कल्पताम् ।
प्रजापतेः प्रजा अभूम स्वर्देवा अगन्मामृता अभूम ॥ ९–२१ ॥

अर्थ – माझें आयुष्य या यज्ञानें वृद्धिंगत होवो। माझा प्राण या यज्ञानें कार्यक्षम होवो। माझा डोळा या यज्ञानें कार्यक्षम होवो। माझा कान या यज्ञानें कार्यक्षम होवो। माझी पाठ या यज्ञानें कार्यक्षम होवो। विष्णुदेव या माझ्या यज्ञानें तृप्त होवो। आम्ही प्रजापतींची प्रजा होवू। हे देवांनों। आम्ही स्वर्गारोहण करूं आणि अमर होवू। ( ९–२१ ) ॥ ६८ ॥

### मणि ६९ वा.

तापस–ऋषि, अर्यमा–बृहस्पति–इंद्रादि–देवता, अनुष्टुप्–छंद.

अर्यमणं बृहस्पतिमिन्द्रं दानाय चोदय । वाचं विष्णुꣳ सरस्वतीꣳ सवितारं च वाजिनꣳ स्वाहा ॥ ९–२७ ॥

अर्थः–हे ईश्वरा ! अर्यमा, बृहस्पति, इंद्र, वाग्देवी, विष्णु, सरस्वती, सविता, देवाश्व इत्यादि देवप्रभृतींना आम्हांस धनधान्य व पुत्रपौत्रादि देण्याकरितां प्रेरणा कर ! सुहुत असो ! ॥ ६९ ॥

### मणि ७० वा.

वरुण–ऋषि, यजमान–देवता, अतिजगती–छंद.

सविता त्वा सवानाꣳ सुवतामग्निर्गृहपतीनाꣳ सोमो वनस्पतीनाम् । बृहस्पतिर्वाच इन्द्रो ज्यैष्ठ्याय रुद्रः पशुभ्यो मित्रः सत्यो वरुणो धर्मपतीनाम् ॥ ९–३९ ॥

अर्थः–हे राजन् ! सविता देव सर्वांवर वर्चस्व गाजविण्याचा अधिकार प्राप्त करून घेण्याकरितां तुला प्रेरणा करो ! अग्निदेव गृहस्थांवर आधिपत्य मिळविण्याकरितां तुला प्रेरणा करो ! सोमदेव वृक्षादिकांवर स्वामित्व मिळविण्याकरितां तुला प्रेरणा करो ! बृहस्पतिदेव पांडित्य मिळविण्याकरितां तुला प्रेरणा करो ! इंद्रदेव मोठी योग्यता मिळविण्याकरितां तुला प्रेरणा करो ! मित्रदेव सत्यभाषण करण्याकरितां तुला प्रेरणा करो ! वरुण देव धार्मिक लोकांवर आधिपत्य मिळविण्याकरितां तुला प्रेरणा करो ! ॥ ७० ॥

### मणि ७१ वा.

वरुण–ऋषि, आपो–देवता, त्रिष्टुप्–छंद.

अपो देवा मधुमतीरगृभ्णन्नूर्जस्वती राजस्वश्चितानाः । याभिर्मित्रावरुणावभ्यषिञ्चन्याभिरिन्द्रमनयन्नत्यरातीः ॥ १०–१ ॥

अर्थः– इंद्रादि देव मधुर, बलवर्धक, नृपोत्पादक चैतन्यदायक असें जें मंगल उदक ग्रहण करते झाले, ज्या पवित्र उदकानें इंद्रादि देवांनीं मित्रावरुणास अभिषेक केला, व ज्या उदकाच्या सहाय्यानें इंद्राला त्या देवांनीं शत्रूपासून निभावून नेलें असें तें भगवती सरस्वती नदीचें पवित्र उदक मी ग्रहण करितों. ॥ ७१ ॥

### मणि ७२ वा

वरुण–ऋषि, यजमान–देवता, त्रिष्टुप्–छंद

सोमस्य त्वा द्युम्नेनाभिषिञ्चाम्यग्नेर्भ्राजसा सूर्यस्य वर्चसेन्द्रस्येन्द्रियेण । क्षत्राणां क्षत्रपतिरेध्यति दिद्यून्पाहि ॥ १०–१७ ॥

**अर्थ**–हे राजन् ! मी तुला चंद्राच्या धवलयशानें अभिषेक करितो-अग्नीच्या तेजानें अभिषेक करितों सूर्याच्या कांतीनें अभिषेक करितों इंद्राच्या वीर्यानें अभिषेक करितो येणेंप्रमाणें तू अभिषिक्त होत्साता सर्व क्षत्रियांमध्यें तू क्षत्रियेश्वर हो ! हे सामदेवा ! शत्रूचे बाण दूर सारून तू या राजाचें रक्षण कर ! ॥ ७२ ॥

### मणि ७३ वा

वरुण–ऋषि यजमान–देवता अत्यष्टि–छंद

इम देवा असपत्न१५ सुवध्व महते क्षत्राय महते ज्यैष्ठ्याय महते जानराज्यायेन्द्रस्येन्द्रियाय । इममुमुष्य पुत्रममुष्यै पुत्रमस्यै विश एष वोऽमी राजा सोमोऽस्माकं ब्राम्हणाना१५ राजा ॥ १०–१८ ॥

**अर्थ**–अहो देवहो ! अमुकाचा ( येथें यजमानाच्या बापाचें नाव घालणें ) मुलगा, अमुकीचा ( येथें यजमानाच्या आईचें नाव घालणें ) मुलगा, अमुक देशाच्या ( येथें देशाचें नांव घालणें ) प्रजेचा अधिपति, असा हा ( येथें यजमानाचें म्हणजे राजाचें नांव घालणें ) याला शत्रुरहित करून मोठी क्षत्रिय पदवी प्राप्त करून घेण्याकरितां, मोठी योग्यता प्राप्त करून घेण्यासाठीं व मनुष्यानीं वसलेलें असें मोठें राज्य प्राप्त करून घेण्यासाठीं तुम्ही प्रेरणा करा अहो, ( येथें देशाचें नांव घालून ) लोकहो हा यजमान तुमचा राजा असो ! आणि आम्हा ब्राह्मणाचा सोम हा राजा असो ! ॥ ७३ ॥

### मणि ७४ वा

वामदेव–ऋषि सूर्य–देवता, अतिजगती–छंद

हꣳस शुचिषद्वसुरन्तरिक्षसद्धोता वेदिषदतिथिर्दुरोणसत् । नृषद्वरसदृतसद्व्योमसदब्जा गोजा ऋतजा अद्रिजा ऋतं बृहत् ॥ १०–२४॥

अर्थः-जो आदित्यरूपानें तेजामध्यें राहतो, जो मनुष्याच्या अन्तर्यामीं राहून प्रेरणा करितो, जो वायुरूपानें अंतरिक्ष लोकावर असतो, जो देवाना यज्ञात आवाहन करितो, जो अग्निरूपानें वेदिमध्यें असतो, जो अतिथीप्रमाणें सर्वांना पूज्य, जो आहवनीय रूपानें यज्ञगृहात असतो, जो प्राणरूपानें सर्वमनुष्यामध्यें राहतो, जो उत्कृष्ट स्थानामध्ये असतो, जो यज्ञगृहात असतो, जो आकाशात असतो, जो मत्स्यादिरूपानें पाण्यांत जन्म पावतो, जो भूतग्रामरूपानें पृथ्वीवर जन्म घेतो, जो सत्यामध्ये जन्म पावतो, जो दगडात अग्निरूपानें जन्म घेतो, जो मेघात जलरूपानें जन्म घेतो, जो सर्व ठिकाणी व्यापून आहे, जो अनंत स्वरूप आहे असा हा अहङ्कारनाशक भगवान् सूर्यनारायण, त्या सूर्यनारायणाजवळ येऊन मी रथातून खाली उतरतो ॥ ७४ ॥

### मणि ७५ वा

सिंधुद्वीप-ऋषि, आपो-देवता, बृहती-छंद.

अपो देवीरुपसृज मधुमतीरयक्ष्माय प्रजाभ्यः । तासामास्थानादुज्जिहतामोषधयः सुपिप्पलाः ॥ ११-३८ ॥

अर्थ - हे अग्निदेवा । मधुर व तेजस्वी असें उदक आमच्या प्रजेच्या आरोग्यासाठी वृष्टिरूपानें तू पृथ्वीवर सिंचन कर. आणि आम्ही नांगरून पेरून ठेविलेल्या सुपीक शेतातून भात, जोंधळा, गहू इत्यादि उत्तम धान्यांची सुंदर पिकें वृष्टिजलानें सर्वत्र जोमानें उगवतील असें होवो । ॥ ७५ ॥

### मणि ७६ वा

प्रजापति-ऋषि, अज-देवता, पथ्याबृहती-छंद

शिवो भव प्रजाभ्यो मानुषीभ्यस्त्वमङ्गिरः । मा द्यावापृथिवी अभि शोचीर्मान्तरिक्षं मा वनस्पतीन् ॥ ११-४५ ॥

अर्थ - हे अंगिरा । मानवी प्रजेला तू मंगलप्रद हो । स्वर्ग व पृथ्वीच्या लोकांना तू संताप करू नकोस अंतरिक्ष लोकाला ताप देऊ नकोस. आम्रादि वृक्षांनाही अभिताप करू नकोस । ॥ ७६ ॥

### मणि ७७ वा

सिंधुद्वीप-ऋषि, आपो-देवता, गायत्री-छंद

आपो हि ष्ठा मयोभुवस्ता न ऊर्जे दधातन । महे रणाय चक्षसे ॥ ११-५० ॥

अर्थः- हे जलानो! तुम्ही आम्हास क्षेमकारक असे व्हा! तुमच्यांत भोग्य असा जो रस आहे त्याचा उपभोग घेऊं असें करा! अत्यंत सुंदर असें जें परब्रह्मस्वरूप त्याच्या साक्षात्कारास आम्ही योग्य होऊं असें करा ॥ ७७ ॥

### मणि ७८ वा.

सिंधुद्वीप-ऋषि, आपो-देवता, गायत्री-छंद,

यो वः शिवतमो रसस्तस्य भाजयतेह नः। उशतीरिव मातरः ॥ ११-५१ ॥

अर्थः- हे जलदेवतांनो! प्रेमळ माता ज्या प्रमाणें आपुल्या तान्हुल्या बाळास स्तनपान करवितात त्या प्रमाणें तुम्हीही आपला अत्यंत सुखकारक असा रस आम्हास या लोकीं पान करावयास द्या। ॥ ७८ ॥

### मणि ७९ वा.

सिंधुद्वीप-ऋषि, आपो-देवता, गायत्री-छंद.

तस्मा अरं गमाम वो यस्य क्षयाय जिन्वथ। आपो जनयथा च नः ॥ ११-५२ ॥

अर्थः-हे अब्देवतानो! तुमच्या त्या मधुर रसाचें सेवन करून आम्ही सदैव संतुष्ट राहूं! आणि त्या तुमच्या जगदाधारभूत रसानें तुम्ही ब्रह्मादिस्तंबपर्यंत सर्व प्राणिमात्राला तृप्त करा! हे जलानो! आम्ही प्रजोत्पादन-समर्थ होऊं असें करा! ॥ ७९ ॥

### मणि ८० वा.

विश्वामित्र-ऋषि, मित्र-देवता, गायत्री-छंद.

मित्रस्य चर्षणीधृतोऽवो देवस्य सानसि। द्युम्नं चित्रश्रवस्तमम् ॥ ११-६२ ॥

अर्थः-मानव जातीची धारणा करणान्या तेजस्वी सूर्यनारायणाचें पुराणप्रसिद्धज्ञान-धन व त्याचें अत्यंत श्रवणीय असें यश यांची आम्ही याचना करतों ॥ ८० ॥

### मणि ८१ वा.

प्रजापति–ऋषि, अग्नि–देवता, बृहती–छंद

अन्नपतेऽन्नस्य नो देह्यनमीवस्य शुष्मिणः । प्रप्र दातारं तारिष ऊर्जं नो धेहि द्विपदे चतुष्पदे ॥ ११–८३ ॥

अर्थः–हे अन्नपालका, हे भगवन् अग्निनारायणा ! रोगनाशक व बलवर्धक असें अन्न आम्हांस दे ! आमच्या अन्नदात्याची चांगली भरभराट कर ! आमच्या मुलांबाळांना व गाईघोड्यांना पुष्टिकारक असें अन्न दे ! ॥ ८१ ॥

### मणि ८२ वा.

प्रजापति–ऋषि, गरुत्मत्–देवता, कृति–छंद.

सुपर्णोऽसि गरुत्माँस्त्रिवृत्ते शिरो गायत्रं चक्षुर्बृहद्रथन्तरे पक्षौ । स्तोम आत्मा छन्दाᳬस्यङ्गानि यजूᳬषि नाम । साम ते तनूर्वामदेव्यं यज्ञायज्ञियं पुच्छं धिष्ण्याः शफाः । सुपर्णोऽसि गरुत्मान्दिवं गच्छ स्वः पत ॥ १२–४ ॥

अर्थः– हे अग्निदेवा ! गरुडाप्रमाणें तूं सुंदर पंखाचा पक्षिराज आहेस. त्रिवृत् स्तोम तुझें शिरस्थानीं आहे. गायत्री तुझे नेत्रस्थानी आहे. बृहद्रथंतर साम तुझे पंख आहेत. पंचदशस्तोम तुझें अंतःकरण आहे. गायत्र्यादि छंद तुला अवयवरूप आहेत. यजु हें तुझें नांव आहे. वामदेव्य साम तुझें शरीर आहे. यज्ञायज्ञिय नांवाचें साम तुझ्या पुच्छस्थानी आहे. धिष्ण्यामध्यें असलेले अग्नी तुला खुरस्थानीं आहेत. हे अग्निदेवा ! एवंविशिष्ट असा तूं खरोखर गरुडाप्रमाणें अत्यंत सुंदर पक्षिराज आहेस । अतएव तूं आकाशांत उड्डाण कर. देवा ! तेथून पुढें स्वर्गलोकाप्रत जा. ॥ ८२ ॥

### मणि ८३ वा.

शुनःशेप–ऋषि, वरुण–देवता, त्रिष्टुप्–छंद.

उदुत्तमं वरुण पाशमस्मदवाधमं वि मध्यमं श्रथाय । अथा वयमादित्य व्रते तवानागसो अदितये स्याम ॥ १२–१२ ॥

अर्थ –हे वरुणदेवा ! आमच्या शिरस्थानावर स्थापन केलेला तुझा पाश आम्हापासून परचावरून ओढून काढून त्याचा नाश कर ! पायात अडकविलेला तुझा पाश खालचा खालून ओढूनकाढून त्याचा नाश कर ! आमच्या कमरेत अडकविलेला तुझा पाश आम्हापासून ओढून काढून त्याचा विच्छेद कर ! हे आमचे पाश नाश झाले म्हणजे हे आदित्यदेवा ! निष्पाप झालेले आम्ही तुझ्या व्रतानुष्ठानात सदैव रत राहून मोक्षास योग्य होवू असें घडो ! ॥ ८३ ॥

### मणि ८४ वा

प्रजापति–ऋषि, अग्नि–देवता, अनुष्टुप्–छंद

गर्भो अस्योषधीना गर्भो वनस्पतीनाम् । गर्भो विश्वस्य भूतस्याग्ने गर्भो अपामसि ॥ १२–३७ ॥

अर्थ – हे अग्निदेवा ! भेषजरूपानें तू औषधीचा गर्भ आहेस अरणापासून तू उत्पन्न होत असल्यामुळें तू वृक्षाचा गर्भ आहेस जठराग्निरूपानें तू सर्व प्राणिमात्रामध्यें वास करीत असल्यामुळें तू सर्व प्राणिमात्राचा गर्भ आहेस विद्युत् व वडवा या रूपानें तू पाण्याचाही पण गर्भ आहेस ॥ ८४ ॥

### मणि ८५ वा

दीर्घतमा–ऋषि अग्नि–देवता, त्रिष्टुप्–छंद

बोधा मे अस्य वचसो यविष्ठ मंहिष्ठस्य प्रभृतस्य स्वधाव । पीयति त्वो अनु त्वो गृणाति वन्दारुष्टे तन्वं वन्दे अग्ने ॥१२–४२॥

अर्थ – हे अन्नवता ! हे यौवनाढ्या अत्यंत थोर व विनयपूर्वक वाणीनें बोलणारा जो मी त्या माझें बोलणें ऐक हे अग्निदेवा कोणी तुझी निंदा करितात व कोणी तुझी स्तुति करितात, पण विनयशील असा मी मात्र, हे देवा, ! तुझ्यासुंदर मूर्तीला सदैव वंदनच करितों, ॥ ८५ ॥

### मणि ८६ वा

सोमाहुति–ऋषि, अग्नि–देवता, गायत्री–छंद

स बोधि सूरिर्मघवा वसुपते वसुदावन् । युयोध्यस्मद्द्वेषांसि विश्वकर्मणे स्वाहा ॥ १२–४३ ॥

अर्थः– हे धनपते ! हे धनदायका ! विद्वान् व धनवान् असा तू आमची प्रार्थना ऐकून घे ! आमच्या भक्तींनें संतुष्ट होवून आमचीं जीं संकटें आहेत तीं आम्हापासून दूर कर ! विश्वकर्त्याला सुहुत असो ! ॥ ८६ ॥

### मणि ८७ वा.

प्रजापति–ऋषि, अग्नि–देवता, त्रिष्टुप्–छंद.

पुनस्त्वादित्या रुद्रा वसवः समिन्धतां पुनर्ब्रह्माणो वसुनीथ यज्ञैः । घृतेन त्वं तन्वं वर्धयस्व सत्याः सन्तु यजमानस्य कामाः ॥ १२–४४ ॥

अर्थः–हे अग्निदेवा ! आदित्य, रुद्र, आणि वसुदेव हे तुला पुन्हा संदीप्त करोत ! हे धनवंता ! ब्राह्मण यज्ञयागादि करून तुला पुन्हा संदीप्त करोत ! तूं आपलें शरीर हवन केलेल्या घृतानें सुपुष्ट कर ! आणि हे देवा ! या आमच्या यजमानाच्या मनीषा तुझ्या प्रसादानें परिपूर्ण होवोत ! ॥ ८७ ॥

### मणि ८८ वा.

प्रजापति–ऋषि, निर्ऋति–देवता, त्रिष्टुप्–छंद.

असुन्वन्तमयजमानमिच्छ स्तेनस्येत्यामन्विहि तस्करस्य । अन्यमस्मदिच्छ सा त इत्या नमो देवि निर्ऋते तुभ्यमस्तु ॥ १२–६२ ॥

अर्थः–हे निर्ऋति देवते, सोमयाग न करणाऱ्या लोकांकडे तूं जा. चोर व दरोडेखोर ज्या वाटेनें गेले असतील त्या वाटेनें तूं जा. सोमयाग करणारे जे आम्ही त्या आम्हा देवभक्तांना सोडून तूं दुसऱ्या दुष्ट लोकांची इच्छा कर. हीं तुझी वाट आहे. हे देवि निर्ऋते, तुला, आमचा नमस्कार असो ! ॥ ८८ ॥

### मणि ८९ वा.

अथर्वपुत्रभिषग्–ऋषि, ओषधि–देवता, अनुष्टुप्–छंद.

याः फलिनीर्या अफला अपुष्पा याश्च पुष्पिणीः । बृहस्पतिप्रसूतास्ता नो मुञ्चन्त्वꣳ हसः ॥ १२–८९ ॥

अर्थः–ज्या ओषधी फलसंपन्न आहेत, व ज्या फलरहित आहेत, तसेंच ज्या पुष्परहित आहेत व ज्या पुष्पसंपन्न आहेत त्या सर्व ओषधी बृहस्पतिप्रेरित होवून आम्हास सर्व रोगांपासून मुक्त करोत ! ॥ ८९ ॥

### मणि ९० वा

बधु–ऋषि, ओषधि–देवता, अनुष्टुप्–छंद

मुञ्चन्तु मा शपथ्या॒दथो॑ वरु॒ण्या॒दु॒त । अथो॑ य॒मस्य॒ पड्वी॑शा॒त्सर्व॑स्माद्देवकिल्बि॒षात् ॥ १२–९० ॥

**अर्थ**–ओषधी शपथजन्य पापापासून मला मुक्त करोत। वरुणापराध निमित्त पापापासून मला मुक्त करोत। यमाच्या बधननिमित्त पापापासून मला मुक्त करोत आणि सर्व देवापराधनिमित्त पापापासून मला मुक्त करोत। ॥९०॥

### मणि ९१ वा

बधु–ऋषि, ओषधि–देवता, अनुष्टुप्–छंद

या ओष॑धीः॒ सोम॑राज्ञी॒र्बह्वीः॑ श॒तवि॑चक्षणाः । तासा॑मसि॒ त्वमु॑त्त॒मारं॒ कामा॑य॒ शं हृ॒दे ॥ १२–९२ ॥

**अर्थ**–सोमराजाच्या राण्या, अनंत व बहुवीर्या अशा ज्या ओषधी आहेत त्यांमध्ये हे ओषधे, तू सर्वश्रेष्ठ आहेस आणि म्हणून तू आमचे मनोरथ पूर्ण कर। आमच्या अंतःकरणास सुखप्रद अशी हो। ॥ ९१ ॥

### मणि ९२ वा.

बधु–ऋषि, ओषधि–देवता, अनुष्टुप्–छंद

दी॒र्घायु॑स्त ओषधे ख॒नि॒ता यस्मै॑ च त्वा॒ खना॑म्य॒हम् । अथो॑ त्वं दी॒र्घायु॑र्भू॒त्वा श॒तव॑ल्शा॒ वि रो॑हतात् ॥ १२–१०० ॥

**अर्थ**–हे ओषध। तुला खणून काढणारा दीर्घायु होवो। ज्याच्या करिता मी तुला खणून काढतो तोही दीर्घायु होवो। आणि हे ओषधे। तूही पण दीर्घायु हो। आणि शतांकुरांनी विस्तार पाव। ॥ ९२ ॥

### मणि ९३ वा.

गोतम–ऋषि, सोम–देवता, गायत्री–छंद.

आप्या॑यस्व॒ सम॑तु ते वि॒श्वतः॑ सोम॒ वृष्ण्य॑म् । भवा॒ वाज॑स्य संग॒थे ॥ १२–११२ ॥

अर्थः– हे सोमदेवा ! सर्वभूतांना उत्पन्न करणारें असें वीर्य तुला सर्व बाजूनें प्राप्त होवो । त्या वीर्यानें तूं वृद्धिंगत हो । आणि आम्हांस अन्न प्राप्त करून दे ! ॥ ९३ ॥

## मणि ९४ वा.

प्रजापति-ऋषि, आदित्य देवता, त्रिष्टुप्-छंद.

ब्रह्म॑ ज॒ज्ञा॒नं प्र॑थ॒मं पु॒रस्ता॒द्वि सी॑म॒तः सु॒रुचो॑ वे॒न आ॑वः । स बु॒ध्न्या॑ उप॒मा अ॑स्य वि॒ष्ठाः स॒तश्च॒ योनि॒मस॑तश्च॒ विवः॑ ॥१३–३॥

अर्थः– सूर्यदेव प्रथम पूर्वेस उदय पावतो. नंतर शाहणा असा तो देव पृथ्वीच्या मध्य प्रदेशापासून सीमेपर्यंत शोभायमान दिसणाऱ्या भूरादि लोकांस आपल्या प्रकाशानें अभिव्यक्त करितो. तोच सावकाश व विविधस्थानभूत अशा पूर्वादि दिशांना प्रकाशित करितो, आणि तोच घटपटादि मूर्त पदार्थ व वायुप्रभृति सूक्ष्म पदार्थ यांचें स्थान प्रकाशानें अभिव्यक्त करितो. ॥ ९४ ॥

## मणि ९५ वा.

प्रजापति–ऋषि, सर्प–देवता, अनुष्टुप्–छंद.

नमो॑ऽस्तु स॒र्पेभ्यो॒ ये के च॑ पृथि॒वीमनु॑ । ये अ॒न्तरि॑क्षे॒ ये दि॒वि तेभ्यः॑ स॒र्पेभ्यो॒ नमः॑ ॥ १३–६ ॥

अर्थः– जे कोणी सर्प पृथिवीचा आश्रय करून असतील. त्या सर्पांना नमस्कार असो ! जे अंतरिक्षांत असतील व जे स्वर्गलोकांत असतील त्या सर्पांनाहि नमस्कार असो ! ॥ ९५ ॥

## मणि ९६ वा.

प्रजापति–ऋषि, सर्प–देवता, अनुष्टुप्–छंद.

या इष॑वो यातु॒धाना॑नां॒ ये वा॒ वन॒स्पतीँ॒१रनु॑ । ये वा॑ऽव॒टेषु॒ शेर॑ते॒ तेभ्यः॑ स॒र्पेभ्यो॒ नमः॑ १३–७ ॥

अर्थः– दुःख देणाऱ्या राक्षस प्रभृतींना ज्या सर्पजाति बाणरूपानें असतील, जे सर्प चंदनादि वृक्षांचा आश्रय करून असतील, व जे बिळामध्यें वास करणारे असतील अशा सर्पांना नमस्कार असो ! ॥ ९६ ॥

### मणि ९७ वा.

प्रजापति–ऋषि, सर्प–देवता, अनुष्टुप्–छंद.

ये वामी रोचने दिवो ये वा सूर्यस्य रश्मिषु । येषामप्सु सदस्कृतं तेभ्यः सर्पेभ्यो नमः ॥ १३–८ ॥

अर्थः– द्युलोकाच्या प्रकाशमय स्थानामध्यें जे सर्प वास करून असतील, सूर्याच्या किरणामध्यें जे अदृश्यरूपानें राहत असतील आणि पाण्यांत जे वास करून असतील त्या सर्पांना नमस्कार असो । ॥ ९७ ॥

### मणि ९८ वा.

वामदेव–ऋषि, अग्नि–देवता, त्रिष्टुप्–छंद.

कृणुष्व पाजः प्रसितिं न पृथ्वीं याहि राजेवामवाँऽइभेन । तृष्वीमनु प्रसितिं द्रूणानोऽस्तासि विध्य रक्षसस्तपिष्ठैः ॥ १३–९ ॥

अर्थः– हे अग्निदेवा । पक्ष्यांना धरण्याकरितां पसरलेल्या विशाल जाळ्याप्रमाणें शत्रूंना धरण्याकरितां तूं आपल्या ज्वालारूप शक्तीचा प्रसार कर ! हत्तीवर बसून व सैन्य बरोबर घेवून राजा जसा शत्रूवर चाल करून जातो तद्वत् तुम्ही आमच्या शत्रूवर चाल करून जा । हे अग्निदेवा ! लवचिक पाशाच्या सहायानें शत्रूला मारणारा असा तूं आमच्या शत्रूचा फडशा पाडणारा आहेस. अतएव तुझ्या अत्यंत तप्त आयुधांनीं राक्षसांना चांगला चोप दे । ॥ ९८॥

### मणि ९९ वा.

वामदेव–ऋषि, अग्नि–देवता, त्रिष्टुप–छंद.

तव भ्रमास आशुया पतन्त्यनुस्पृश धृषता शोशुचानः । तपूंष्यग्ने जुह्वा पतङ्गानसंन्दितो विसृज विष्वगुल्काः ॥ १३–१० ॥

अर्थः– हे अग्निदेवा । शीघ्रगमन करणारे असे जे तुझे ज्वालासमूह आहेत, त्या ज्वालासमूहांनीं आम्हास ताप देणाऱ्या राक्षसांना व पिशाचांना होरपळून काढ । हे अग्ने ! प्रगल्भ ज्वालासमूहानें तूं देदीप्यमान आहेस. घृतानें हवन केला जात आहेस. तूं सर्वांना अगदीं दुर्दम्य आहेस. अतएव खालीं वर, उभे, आडवे असे पसरणारे तुझे प्रखर ज्वालासमूह राक्षसादिकांचा नाश करण्याकरितां सर्व ठिकाणीं प्रसार कर । ॥ ९९ ॥

## मणि १०० वा.

वामदेव–ऋषि, अग्नि–देवता, त्रिष्टुप्–छंद.

प्रति स्पशो वि सृज तूर्णितमो भवा पायुर्विशो अस्या अदब्धः ।
यो नो दूरे अघशंसो यो अन्त्यग्ने मा किष्टे व्यथिरादधर्षीत्
॥ १३–११ ॥

अर्थः– हे अग्निदेवा ! आमचा जो द्रोह करूं पाहणारा आहे–मग तो दूर असो वा जवळ असो.–त्याजकडे तुझे ज्वालारूप दूत पाठीव. अत्यंत वेगवान् व सर्वांना अजिंक्य असा तूं आमच्या प्रजेचा पालनकर्ता हो ! हे अग्ने ! आमच्यावर अनुग्रह करण्यास सिद्ध झालेला असा तूं, त्या तुजवर कोणताही शत्रु उलटून तुटून पडण्याचें धारिष्ट न करो ! ॥ १०० ॥

## मणि १०१ ला.

वामदेव–ऋषि, अग्नि–देवता, त्रिष्टुप्–छंद.

उदग्ने तिष्ठ प्रत्यातनुष्व न्यमित्राँ ऽओषतात्तिग्महेते । यो नो
अरातिꣳ समिधान चक्रे नीचा तं धक्ष्यतसं न शुष्कम्॥१३–१२॥

अर्थः– हे अग्निदेवा ! ऊठ ! तुझे प्रखर ज्वालासमूह विस्तार कर ! हे तीक्ष्ण शस्त्र धारण करणाऱ्या देवा! राक्षसांना पार जाळून टाक! हे देदीप्यमान अग्ने ! वठून गेलेल्या वृक्षाप्रमाणें जो राक्षस आमच्या दानाला प्रतिबंध करील त्याला खालीं सेंचून पार जाळून खाक कर ! ॥ १०१ ॥

## मणि १०२ रा.

वामदेव–ऋषि, अग्नि–देवता, त्रिष्टुप्–छंद.

ऊर्ध्वो भव प्रति विध्याध्यस्मदाविष्कृणुष्व दैव्यान्यग्ने । अव स्थिरा तनुहि यातुजूनां जामिमजामिं प्रमृणीहि शत्रून् । अग्नेष्ट्वा तेजसा सादयामि ॥ १३–१३ ॥

### मणि ९७ वा.

प्रजापति–ऋषि, सर्प–देवता, अनुष्टुप्–छंद.

ये वामी रोचने दिवो ये वा सूर्यस्य रश्मिषु । येषामप्सु सदंस्कृतं तेभ्यः सर्पेभ्यो नमः ॥ १३–८ ॥

*अर्थः– द्युलोकाच्या प्रकाशमय स्थानामध्ये जे सर्प वास करून असतील, सूर्याच्या किरणामध्ये जे अदृश्यरूपानें राहत असतील आणि पाण्यांत जे वास करून असतील त्या सर्पांना नमस्कार असो । ॥ ९७ ॥*

### मणि ९८ वा.

वामदेव–ऋषि, अग्नि–देवता, त्रिष्टुप्–छंद.

कृणुष्व पाजः प्रसितिं न पृथ्वीं याहि राजेवामवाँऽइभेन । तृष्वीमनु प्रसितिं द्रूणानोऽस्तासि विध्य रक्षसस्तपिष्ठैः ॥ १३–९ ॥

अर्थः– हे अग्निदेवा । पक्ष्यांना धरण्याकरतां पसरलेल्या विशाल जाळ्याप्रमाणें शत्रूंना धरण्याकरितां तू आपल्या ज्वालारूप शक्तीचा प्रसार कर । हत्तीवर बसून व सैन्य बरोबर घेवून राजा जसा शत्रूवर चाल करून जातो तद्वत् तुम्ही आमच्या शत्रूवर चाल करून जा । हे अग्निदेवा । लवचिक पाशाच्या सहायानें शत्रूला मारणारा असा तू आमच्या शत्रूचा फडशा पाडणारा आहेस. अतएव तुझ्या अत्यंत तप्त आयुधांनीं राक्षसांना चांगला चोप दे । ॥ ९८॥

### मणि ९९ वा.

वामदेव–ऋषि, अग्नि–देवता, त्रिष्टुप्–छंद.

तव भ्रमास आशुया पतन्त्यनुस्पृश धृषता शोशुचानः । तपूꣳष्यग्ने जुह्वा पतङ्गानसंदितो विसृज विष्वगुल्काः ॥ १३–१० ॥

अर्थः– हे अग्निदेवा । शीघ्रगमन करणारे असे जे तुझे ज्वालासमूह आहेत, त्या ज्वालासमूहांनीं आम्हास ताप देणाऱ्या राक्षसांना व पिशाचांना होरपळून काढ । हे अग्ने । प्रगल्भ ज्वालासमूहानें तूं देदीप्यमान आहेस. स्रुचेनें हवन केला जात आहेस. तूं सर्वांना अगदीं दुर्दम्य आहेस. अतएव चारी बर, उभे, आढवे असे पसरणारे तुझे प्रखर ज्वालासमूह राक्षसादिकांचा नाश करण्याकरितां सर्व ठिकाणीं प्रसार कर । ॥ ९९ ॥

### मणि १०० वा.

वामदेव–ऋषि, अग्नि–देवता, त्रिष्टुप्–छंद.

प्रति स्पशो विसृज तूर्णितमो भवा पायुर्विशो अस्या अदब्धः। यो नो दूरे अघशंसो यो अन्त्यग्ने मा किष्टे व्यथिरादधर्षीत् ॥ १३–११ ॥

अर्थः– हे अग्निदेवा ! आमचा जो द्रोह करूं पाहणारा आहे–मग तो दूर असो वा जवळ असो.–त्याजकडे तुझे ज्वालारूप दूत पाठीव. अत्यंत वेगवान् व सर्वांना अजिंक्य असा तूं आमच्या प्रजेचा पालनकर्ता हो। हे अग्ने ! आमच्यावर अनुग्रह करण्यास सिद्ध झालेला असा तूं, त्या तुजवर कोणताही शत्रु उलटून तुटून पडण्याचें धारिष्ट न करो ! ॥ १०० ॥

### मणि १०१ ला.

वामदेव–ऋषि, अग्नि–देवता, त्रिष्टुप्–छंद.

उदग्ने तिष्ठ प्रत्यातनुष्व न्यमित्राँ ओषतात्तिग्महेते । यो नो अरातिं समिधान चक्रे नीचा तं धक्ष्यतसं न शुष्कम्॥१३–१२॥

अर्थः– हे अग्निदेवा ! ऊठ ! तुझे प्रखर ज्वालासमूह विस्तार कर ! हे तीक्ष्ण शस्त्र धारण करणाऱ्या देवा ! राक्षसांना पार जाळून टाक। हे देदीप्यमान अग्ने ! वठून गेलेल्या वृक्षाप्रमाणें जो राक्षस आमच्या दानाला प्रतिबंध करील त्याला खालीं खेंचून पार जाळून खाक कर ! ॥ १०१ ॥

### मणि १०२ रा.

वामदेव–ऋषि, अग्नि–देवता, त्रिष्टुप्–छंद.

ऊर्ध्वो भव प्रतिविध्याध्यस्मदाविष्कृणुष्व दैव्यान्यग्ने । अव स्थिरा तनुहि यातुजूनां जामिमजामिं प्रमृणीहि शत्रून् । अग्नेष्ट्वा तेजसा सादयामि ॥ १३–१३ ॥

अर्थः- हे अग्निदेवा ! उभा रहा ! आमच्यावर टपलेल्या शत्रूंना खूप मार दे ! यज्ञयागादि देवसंबंधी कर्मांना प्रकट कर ! राक्षसांचीं स्थिर धनुष्यें गुण सोडून शिथिल कर ! ताडण केलेल्या आणि ताडण न केलेल्या शत्रूंना पुनः पुनः ताडण कर ! हे स्रुचे, अग्नीसंबंधीं तेज मी तुजमध्यें स्थापन करतो ॥ १०२ ॥

### मणि १०३ रा

प्रजापति-ऋषि, स्वयमातृण्णा-देवता, प्रस्तारपंक्ति-छंद.

भूर॑सि भूमि॒र॒स्यदि॑तिरसि वि॒श्वधा॑या॒ विश्व॑स्य॒ भुव॑नस्य ध॒र्त्री । पृ॒थि॒वीं य॑च्छ पृथि॒वीं दृ॑ꣳह पृथि॒वीं मा हि॑ꣳसीः ॥ १३-१८ ॥

अर्थः- हे स्वयमाण्णे ! तू सुखाची जननी आहेस. तू भूदेवता आहेस ! तूं विश्वाची पोषणकर्त्री आहेस. तू सकल प्राणिमात्रांची धारणकर्त्री आहेस. अतएव तू पृथ्वीला स्थिर कर ! पृथ्वीला दृढ कर ! आणि तिला उपद्रव करूं नकोस ! ॥ १०३ ॥

### मणि १०४ था.

अग्नि-ऋषि, दूर्वा-देवता, अनुष्टुप्-छंद.

काण्डा॑त्काण्डात्प्र॒रोह॑न्ती॒ परु॑षः परुष॒स्परि॑ । ए॒वा नो॑ दूर्वे॒ प्रत॑नु स॒हस्रे॑ण श॒तेन॑ च ॥ १३-२० ॥

अर्थः- हे दुर्वे ! प्रत्येक कांडापासून व प्रत्येक पेरापासून तू जशी अंकुररूपानें सर्वांवती पसरत जातेस तद्वत तू आमचा वंशवृक्ष पुत्रपौत्रादि रूपानें शतशः व सहस्रशः म्हणजे अनंतपटीनें विस्तार कर ! ॥ १०४ ॥

### मणि १०५ वा.

गोतम-ऋषि, विश्वेदेव-देवता, गायत्री-छंद

मधु॒ वाता॑ ऋताय॒ते मधु॑ क्षरन्ति॒ सिन्ध॑वः । माध्वी॑र्नः स॒न्त्वोष॑धीः ॥ १३-२७ ॥

अर्थः- देवभक्त असा जो यजमान त्या यजमानाकरितां वायु सुखकर वाहो ! नद्या मधुर उदक स्रवोत ! औषधी आम्हांकरितां मधुरसयुक्त होवोत ! ॥ १०५ ॥

### मणि १०६ वा.

गोतम-ऋषि, विश्वदेव-देवता, गायत्री छंद.

मधु नक्तमुतोषसो मधुमत्पार्थिवꣳ रजः । मधु द्यौरस्तु नः पिता ॥ १३-२८ ॥

**अर्थः**- रात्र आम्हास सुखकर होवो ! दिवस आम्हास क्षेमकर होवोत ! माता पृथ्वी आम्हाकरितां मधुररससंपन्न होवो आणि पिता स्वर्ग आम्हासाठीं मधु(जल)वृष्टि करो ! ॥ १०६ ॥

### मणि १०७ वा.

गोतम-ऋषि, विश्वदेव-देवता, गायत्री-छंद.

मधुमान्नो वनस्पतिर्मधुमाँऽअस्तु सूर्यः । माध्वीर्गावो भवन्तु नः ॥ १३-२९ ॥

**अर्थः**- वनस्पती आम्हासाठीं मधुररससंपन्न होवोत । भगवान् सूर्यदेव आम्हांस आल्हादप्रद होवो ! गाई आम्हाकरितां मधुर दूध देणाऱ्या अशा होवोत ! ॥ १०७ ॥

### मणि १०८ वा.

परमेष्ठी-ऋषि, अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद.

अबोध्यग्निः समिधा जनानां प्रतिधेनुमिवायतीमुषासम् । यह्वाऽइव प्रवयामुज्जिहानाः प्रभानवः सिस्रते नाकमच्छ ॥ १५-२४ ॥

**अर्थः**- आपल्याकडे धावत येणाऱ्या धेनूला पाहून वत्स जसा सावध होतो, अथवा उषादेवि उगवली म्हणजे लोक जसे जागृत होतात, तद्वत अग्निहोत्री लोकांच्या समिधनानें अग्निदेव हा सावध होतो. मोठेपक्षी झाडावरून उठले म्हणजे जसे ते आकाशांत उडत जातात तद्वत् मग त्या अग्निदेवाचे वर जाणारे किरण स्वर्गा भोंवती प्रसार पावतात ॥ १०८ ॥

### मणि १०९ वा.

परमेष्ठी-ऋषि, अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद.

तं पत्नीभिरनुगच्छेम देवाः पुत्रैर्भ्रातृभिरुत वा हिरण्यैः । नाकं गृभ्णानाः सुकृतस्य लोके तृतीये पृष्ठे अधि रोचने दिवः ॥१५-

अर्थः- पुण्यकर्म करणारे महात्मे जेथें राहत असतात अशा प्रकाशमय सूर्यमंडळातील दुःखरहित सुखस्थानाप्रत जावूं इच्छिणारे असे आम्ही आमच्या भार्या पुत्र-बंधु-मित्रादि समवेत सुवर्णादि द्रव्याच्या सहायानें लोकप्रसिद्ध अशा या अग्निनारायणाची उपासना करितो ॥ १०९ ॥

मणि ११० वा.

परमेष्ठी-ऋषि, अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद

उर्द्बुध्यस्वाग्ने प्रतिजागृहि त्वमिष्टापूर्ते सꣳसृजेथामयं च । अस्मिन्त्सधस्थे अध्युत्तरस्मिन्विश्वेदेवा यजमानश्च सीदत ॥ १५-५४ ॥

अर्थः- हे अग्निदेवा, तू सावधान हो. आणि या यजमानालाही नित्य जागृत कर. त्यानंतर श्रौतस्मार्त कर्मांचा विस्तार कर. तुझ्या प्रसादानें हा यजमान श्रौतस्मार्त कर्माचें अनुष्ठान करो हे विश्वेदेवांनों, तुम्ही व हा कृतकृत्य झालेला यजमान असे दोघेही मिळून या सर्वोत्कृष्ट अशा स्वर्ग लोकांत चिरकाल रहा. ॥ ११० ॥

मणि १११ वा.

परमेष्ठीदेवप्रजापति-ऋषि, रुद्र-देवता, गायत्री-छंद.

नमस्ते रुद्र मन्यव उतो त इषवे नमः । बाहुभ्यामुत ते नमः ॥ १६-१ ॥

अर्थः- हे रुद्रदेवा ! तुझ्या क्रोधाला नमस्कार असो ! तुझ्या बाणाला नमस्कार असो ! आणि तुझ्या बाहूंना नमस्कार असो ! ॥ १११ ॥

मणि ११२ वा

कुत्स-ऋषि, रुद्र-देवता, जगती-छंद

मा नस्तोके तनये मा न आयुषि मा नो गोषु मा नो अश्वेषु रीरिषः । मा नो वीरान् रुद्र भामिनो वधीर्हविष्मन्तः सदमित्त्वा हवामहे ॥ १६-१६ ॥

अर्थः-,हे भगवान् रुद्रदेवा! आमच्या पुत्राला व नातवाला रुपाकरून तूं मारूं नकोस। आमच्या आयुष्याला मारूं नकोस। आमच्या गाईंगुरांना मारूं नकोस। आमच्या घोड्यांना मारूं नकोस! आमच्या वीरांना-यद्यपि देवा! ते रागीट असले तरी-मारूं नकोस.। हविसंपन्न असे आम्ही-तुझे भक्त सदैव तुला यज्ञामध्यें आमंत्रण करूं. ॥ ११२ ॥

### मणि ११३ वा.

परमेष्ठीदेवप्रजापति-ऋषि, रुद्र-देवता, यजुः-छंद.

नमो गणेभ्यो गणपतिभ्यश्च वो नमो नमो व्रातेभ्यो व्रातपतिभ्यश्च वो नमो नमो गृत्सेभ्यो गृत्सपतिभ्यश्च वो नमो नमो विरूपेभ्यो विश्वरूपेभ्यश्च वो नमः ॥ १६-२५ ॥

अर्थः- देवदूतांस नमस्कार। देवदूतांचे पालक असे जे तुम्ही त्या तुम्हा रुद्रदेवांसही नमस्कार। नानाजातिसंघास नमस्कार! नानाजातिसंघांचे पालक असे जे तुम्ही त्या तुम्हा रुद्रदेवांस नमस्कार। प्रज्ञावानास नमस्कार। प्रज्ञावानाचे पालक असे जे तुम्ही त्या तुम्हा रुद्रदेवांस नमस्कार! नग्नमुंडजटिलादि विरूपांस नमस्कार! विविधरूप धारण करणारे असे जे तुम्ही त्या तुम्हां बहुरूपी रुद्रदेवांस नमस्कार! ॥ ११३ ॥

### मणि ११४ वा.

परमेष्ठीदेवप्रजापति-ऋषि, रुद्र-देवता, यजुः-छंद.

नमः शंभवाय च मयोभवाय च नमः शंकराय च मयस्कराय च नमः शिवाय च शिवतराय च ॥ १६-४१ ॥

अर्थः- सुखदायकास नमस्कार! संसारसुखप्रदास नमस्कार! लौकिक सुखदायकास नमस्कार! मोक्षसुखदायकास नमस्कार! मंगलमूर्तीस नमस्कार! प्रशांतरूपास नमस्कार! ॥ ११४ ॥

### मणि ११५ वा.

परमेष्ठीदेवप्रजापति-ऋषि, रुद्र-देवता, अनुष्टुप्-छंद.

या ते रुद्र शिवा तनूः शिवा विश्वाहा भेषजी। शिवा रुतस्य भेषजी तया नो मृड जीवसे ॥ १६-४९ ॥

अर्थः- हे रुद्रदेवा, सुशांत, सदैव कल्याणकारक, संसारव्याधिनिवर्तक, शारीरिक व मानसिक आधिव्याधि निवारक असें जें तुझें परमंगल शरीर आहे त्या शरीरानें आम्ही दीर्घकाल जगावें म्हणून आम्हास सुखी ठेव ! ॥ ११५ ॥

### मणि ११६ वा.

लोपामुद्रा-ऋषि, अग्नि-देवता, बृहती-छंद.

नमस्ते हरसे शोचिषे नमस्ते अस्त्वर्चिषे । अन्यांस्ते अस्मत्तपन्तु हेतयः पावको अस्मभ्यं शिवो भव ॥ १७-११ ॥

अर्थः- हे अग्निदेवा ! तुझ्या त्या प्रदीप्त ज्वालेला नमस्कार असो । तसेंच तुझ्या त्या पदार्थप्रकाशक तेजाला नमस्कार असो ! हे अग्निनारायणा ! तुझ्या ज्या प्रखर ज्वाला आहेत त्या आमच्या शत्रूंला संताप उत्पन्न करोत ! आणि हे देवा ! तूं आमचा उद्धारकर्ता व मंगलदाता हो ! ॥ ११६ ॥

### मणि ११७ वा.

प्रजापति-ऋषि, अग्नि-देवता, बृहती-छंद.

प्राणदा अपानदा व्यानदा वर्चोदा वरिवोदाः । अन्याँस्ते अस्मत्तपन्तु हेतयः पावको अस्मभ्यं शिवो भव ॥ १७-१५ ॥

अर्थः- हे अग्निदेवा ! मकाला तूं प्राण देणारा आहेस. अपान देणारा आहेस. व्यान देणारा आहेस. सामर्थ्य देणारा आहेस. संपत्ति देणारा आहेस. अतएव हे देवा ! तूं आमचा पावनकर्ता हो ! आम्हांस मंगलप्रद हो ! हे भगवन् तुझ्या ज्या प्रखर ज्वाला आहेत त्या आमच्या शत्रूंस अतिशय संताप उत्पन्न करोत ! ॥ ११७ ॥

### मणि ११८ वा.

विश्वकर्मा-ऋषि, विश्वकर्मा-देवता, त्रिष्टुप्-छंद.

विश्वतश्चक्षुरुत विश्वतोमुखो विश्वतोबाहुरुत विश्वतस्पात् । सं बाहुभ्यां धमति सं पतत्रैर्द्यावाभूमी जनयन्देव एकः ॥ १७-१९ ॥

अर्थः– ज्याला सर्व बाजूनें नेत्र आहेत, ज्याला सर्व बाजूनें मुखें आहेत, ज्याला सर्व बाजूनें हात आहेत, आणि ज्याला सर्व बाजूनें पाय आहेत असा हा एकमेवाद्वितीय परमेश्वर स्वर्ग व पृथिवी निर्माण करून बाहुस्थानीं असणाऱ्या धर्म–अधर्मांशीं संयोग पावता झाला. आणि त्याचप्रमाणें अनित्य अशा पंचमहाभूतांशींही संयुक्त झाला ॥ ११८ ॥

मणि ११९ वा.

प्रजापति–ऋषि, सोमवरुण–देवता, त्रिष्टुप्–छंद.

मर्माणि ते वर्मणा छादयामि सोमस्त्वा राजाऽमृतेनानुवस्ताम् । उरोर्वरीयो वरुणस्ते कृणोतु जयन्तं त्वानु देवा मदन्तु ॥१७–४९॥

अर्थः– हे क्षत्रियश्रेष्ठ राजन् ! तुझीं जेवढीं म्हणून जिव्हाळ्याचीं स्थानें आहेत तीं सर्व मी अभेद्य अशा कवचानें आच्छादन करितों. ब्राह्मणांचा राजा जो सोमदेव त्या सोमदेवानें तुझीं मर्मस्थानें मृत्युनिवारक अशा या कवचानें आच्छादन करो ! त्याच प्रमाणें तुझें हें कवच विशाल असलें तरी वरुण देव तें त्याहीपेक्षां अधिक विशाल करो ! आणि सर्व देव विजय प्राप्त करून घेवूं इच्छिणाऱ्या तुला अनुकूल होऊन उत्साहभरित करोत ! ॥ ११९ ॥

मणि १२० वा.

प्रजापति–ऋषि, इंद्र–देवता, अनुष्टुप्–छंद.

इन्द्रेमं प्रतरां नय सजातानामसद्वशी । समेनं वर्चसा सृज देवानां भागदा असत् ॥ १७–५१ ॥

अर्थः– हे इंद्र देवा ! या राजाला परमैश्वर्य प्राप्त करून दे ! तो सर्व क्षत्रिय कुलाला आपल्या वचनांत ठेवण्यास समर्थ होईल असे कर ! त्याला विद्यादि तेजानें अलंकृत कर आणि तो देवादिकांना हविर्भाग देणारा होईल असें घडो ! ॥ १२० ॥

मणि १२१ वा.

प्रजापति–ऋषि, लिंगोक्त–देवता, अनुष्टुप्–छंद.

यस्य कुर्मो गृहे हविस्तमग्ने वर्धया त्वम् । तस्मै देवा अधिब्रवन्नयं च ब्रह्मणस्पतिः ॥ १७–५२ ॥

अर्थ- हे अग्निदेवा। ज्या यजमानाच्या घरीं आम्ही पुरोहित हव्य करूं त्या यजमानाला विपुल संततिसंपत्ति देऊन सुसमृद्ध कर। देव त्याची हा यजमान मोठा थोर व उदार आहे असें म्हणून मोठी प्रशंसा करोत. आणि हे देवा। हा यजमान वैदिक धर्माचा पुरस्कर्ता होवो। ॥ १२१ ॥

### मणि १२२ वा.

प्रजापति-ऋषि, अग्नि-देवता, त्रिष्टुप्-छंद

सूर्यरश्मिर्हरिकेशः पुरस्तात्सविता ज्योतिरुदयाँ२॥ अजस्रम् । तस्य पूषा प्रसवे याति विद्वान् संपश्यन्विश्वा भुवनानि गोपाः ॥ १७-५८ ॥

अर्थ:- सूर्याप्रमाणें झगझगीत असें ज्याचें उज्ज्वल तेज, आहे, सोन्यासारखे तकतकीत असे ज्याचे सुंदर केस आहेत, जो अखिल प्राणिकोटीला आपापलीं कर्तव्यें करण्यास प्रेरणा करितो व जो प्रकाशस्वरूप आहे असा हा अग्निनारायण दररोज आहवनीय रूपानें होमाकरितां पूर्व दिशेस उदय पावत असतो. अशा या अग्निदेवाच्या आज्ञेंत राहून आपला अधिकार जाणणारा, सर्व भूतमात्रांना पाहणारा व धर्माचें रक्षण करणारा असा हा भगवान् सूर्यदेव नित्य उदयास्त करीत भ्रमण करीत असतो. ॥ १२२ ॥

### मणि १२३ वा.

प्रजापति-ऋषि, अग्नि-देवता, बृहती-छंद

पृथिव्या अहमुदन्तरिक्षमारुहमन्तरिक्षाद्दिवमारुहम् । दिवो नाकस्य पृष्ठात् स्वर्ज्योतिरगामहम् ॥ १७-६७ ॥

अर्थ.- मी म्हणजे हा जो यजमान तो पृथिवी वरून वर चढून अंतरिक्ष लोकावर प्राप्त झालों आहे. अंतरिक्ष लोकापासून पुढें द्युलोकावर आलों आहे. द्युलोकाच्या दुःखरहित अशा पृष्ठ प्रदेशापासून वर चढून पुढें स्वर्ग लोकांतील आदित्यमंडळाप्रत प्राप्त झालों आहे। ॥ १२३ ॥

### मणि १२४ वा.

प्रजापति-ऋषि, अग्नि-देवता, अनुष्टुप्-छंद

स्वर्यन्तो नापेक्षन्त आ द्या९ रोहन्ति रोदसी । यज्ञं ये विश्वतोधार९ सुविद्वा९सो वितेनिरे ॥ १७-६८ ॥

अर्थः– थोर विद्वान् असे जे पुरुष जगाला धारण करणाऱ्या महेश्वराचें अनुष्ठान करितात ते स्वर्गाप्रत जात असलेमुळें धनपुत्रादि ऐहिक सुखसाधनाची बिलकूल इच्छा करीत नाहींत आणि शेवटीं जरामृत्यशोकादिकांचा नाश करणाऱ्या अशा स्वर्गलोकाप्रत जातात. ॥ १२४ ॥

मणि १२५ वा.

प्रजापति–ऋषि, अग्नि–देवता, त्रिष्टुप्–छंद.

अग्ने प्रेहिं प्रथमो देवयतां चक्षुर्देवानामुत मर्त्यानाम् । इयक्षमाणा भृगुभिः सुजोषाः स्वुयन्तु यजमानाः स्वस्ति ॥ १७–६९ ॥

अर्थः– हे अग्निदेवा ! देवांची उपासना करणाऱ्या यजमानाच्या पुढें तूं जा। कारण तूं देवाच्या व मनुष्याच्या चक्षुस्थानीं आहेस. विद्वान् ब्राह्मणावर प्रेम करणारे व देवांची उपासना करणारे यजमान सुखरूप स्वर्गास जावोत ॥ १२५ ॥

मणि १२६ वा.

कण्व–ऋषि, सविता–देवता, त्रिष्टुप्–छंद.

ताꣳ संवितुर्वरेण्यस्य चित्रामाहं वृंणे सुमतिं विश्वजन्याम् । यामस्य कण्वो अदुहत्प्रपीनाꣳ सहस्रधारां पयंसा महीं गाम् ॥ १७–७४ ॥

अर्थः– कण्व ऋषीनीं सर्वश्रेष्ठ सविता देवाच्या दुग्धपुष्ट, सहस्रधारायुक्त, दुग्धपूर्ण अशा सुमतिरूप धेनूचें दोहन केलें. त्या त्रैलोक्यश्रेष्ठ सविता देवाच्या इष्टफलदायिनी, व सर्वलोकहितकारिणी अशा त्या कण्वदुग्धा सुमतिरूप सुरभीची मी उपासना करितों. ॥ १२६ ॥

मणि १२७ वा.

सप्तर्षि–ऋषि, अग्नि–देवता, त्रिष्टुप्–छंद.

सप्त ते अग्ने सुमिधः सप्त जिह्वाः सप्त ऋषयः सप्त धामं प्रियाणि । सप्त होत्राः सप्तधा त्वां यजन्ति सप्त योनीरापृंणस्वा घृतेन् स्वाहा ॥ १७–७९ ॥

**अर्थः**– हे अग्निदेवा तुला सात प्राण आहेत. कालीकरालीमनोजवा इत्यादि सात ज्वालारूप जिभा आहेत. मरीच्यादि सात ऋषि आहेत. गायत्र्यादि सात प्रिय छंद आहेत. सात ऋत्विज अग्निष्टोमादि सात यज्ञप्रकारांनीं तुझी उपासना करितात. हे अग्निदेवा! तूं आपल्या सात चिती घृतानें पूर्ण करून घे। ॥ १२७ ॥

## मणि १२८ वा

प्रजापति–ऋषि, अग्नि–देवता, त्रिष्टुप्–छंद.

इ॒मꣳ स्तन॒मूर्ज॑स्वन्तं धया॒पां प्रपी॑नमग्ने सरि॒रस्य॒ मध्ये॑। उत्सं॑ जुषस्व॒ मधु॑मन्तमर्वन्त्समु॒द्रिय॒ꣳ सद॑न॒मावि॑शस्व ॥ १७–८७ ॥

**अर्थः**– हे अग्नि देवा। या लोकामध्यें असणारा असा तू या रसयुक्त व घृतपूर्ण स्रुग्रूप स्तनाचें पान कर. हे विश्वव्यापका! घृतानें युक्त अशा या समुद्ररूप व्यापका! घृतानें युक्त अशा या स्रुग्रूप कूपाचे सेवन कर। आणि स्रुचेंतील घृत प्राशन करून तृप्त झालास म्हणजे या यज्ञमंदीरांत प्रवेश कर। ॥ १२८ ॥

## मणि १२९ वा.

गृत्समद–ऋषि, अग्नि–देवता, त्रिष्टुप्–छंद.

घृ॒तं मि॑मिक्षे घृ॒तम॑स्य॒ योनि॑र्घृ॒ते श्रि॒तो घृ॒तम्व॑स्य॒ धाम॑। अ॒नु॒ष्व॒धमाव॑ह मा॒दय॑स्व॒ स्वाहा॑कृतं वृषभ वक्षि ह॒व्यम् ॥ १७–८८ ॥

**अर्थः**– अग्निदेवाच्या मुखांत मी तुपाची धार सोडितों. कारण तूप हेंच त्याचें उत्पत्तिस्थान आहे. तुपाचाच तो आश्रय करून असतो. आणि तूप हेंच त्याचें तेज आहे. हे अध्वर्यो, अगोदर अन्नाची तयारी करून मग अग्निदेवास बोलाव! त्याला अन्न देऊन तृप्त कर! आणि मग त्याची प्रार्थना कर कीं हे भक्तमनोरथपूर्ण करणाऱ्या अग्निदेवा, स्वाहाकारानें अर्पण केलेलें अन्न रूपा करून तूं देवांना नेऊन पोंचव। ॥ १२९ ॥

## मणि १३० वा.

प्रजापति–ऋषि, यज्ञपुरुष–देवता, त्रिष्टुप्–छंद.

च॒त्वारि॒ शृङ्गा॒ त्रयो॑ अस्य॒ पादा॒ द्वे शी॒र्षे स॒प्त हस्ता॑सो अस्य। त्रिधा॑ ब॒द्धो वृ॑ष॒भो रो॑रवीति म॒हो दे॒वो मर्त्याँ२॥ आवि॑वेश ॥ १७–९१ ॥

• अर्थः– ज्याला ब्रह्मा, होता, उद्गाता व अध्वर्यू हे चार ऋत्विज शृंगस्थानीं आहेत, ऋक्, यजु, साम हे तीन पादस्थानीं आहेत, हविर्धान व प्रवर्ग्य हीं दोन शिरस्थानीं आहेत, गायत्र्यादि सातछंद हस्तस्थानीं आहेत व जो प्रातःसवन माध्यंदिनसवन व तृतीयसवन या तीन प्रकारांनीं बद्ध झाला आहे, जो अपेक्षित वस्तूंचा वर्षाव करणारा आहे, व जो गंभीर ध्वनि आहे असा तो सर्वश्रेष्ठ अग्नि-देव मनुष्यमात्रांच्या हृदयमंदिरांत प्रवेश करता झाला ॥ १३० ॥

### मणि १३१ वा

प्रजापति–ऋषि, अग्नि–देवता, विराट्–छंद.

पर्यः पृथिव्यां पय॒ ओष॑धीषु॒ पयो॑ दि॒व्य॑न्तरि॑क्षे॒ पयो॑ धाः । पय॑–स्वतीः प्र॒दिश॑ सन्तु॒ मह्य॑म् ॥ १८–३६ ॥

अर्थः– हे अग्निदेवा ! पृथिवीमध्यें रसाची स्थापना कर ! वृक्षलतादिकांमध्यें रसाची स्थापना कर ! अंतरिक्षामध्यें रसाची स्थापना कर ! आणि हे देवा ! माझ्याकरितां म्हणून सर्व दिशा व उपदिशा या रससंपन्न होवोत ! ॥ १३१ ॥

### मणि १३२ वा

प्रजापति–ऋषि, गंधर्वाप्सरा–देवता, यजुः–छंद.

ऋ॒ता॒षाडृ॒तधा॑मा॒ग्निर्ग॑न्ध॒र्वस्तस्यौष॑धयोऽप्स॒रसो॒ मुदो॒ नाम॑ । स॒ न॑ इ॒दं ब्रह्म॑ क्ष॒त्रं पा॑तु॒ तस्मै॒ स्वाहा॒ वाट् ताभ्यः॒ स्वाहा॑ ॥१८—३८॥

अर्थः–जो सत्याचा अभिमानी आहे, व ज्याचें सत्य हेंच स्थान आहे असा तो अग्नि-गंधर्व आमच्या या ब्राह्मण व क्षत्रिय जातीचें रक्षण करो ! त्याला वषट्कारानें सुहुत असो. त्या अग्नि-गंधर्वाच्या आनंददायक ओषधी नांवाच्या ज्या अप्सरा आहेत त्यांना सुहुत असो ! ॥ १३२ ॥

### मणि १३३ वा

प्रजापति–ऋषि, गंधर्वाप्सरा–देवता, यजुः–छंद.

स॒ꣳहि॒तो वि॒श्वसा॑मा॒ सूर्यो॑ गन्ध॒र्वस्तस्य॒ मरी॑चयोऽप्स॒रस॑ आ॒युवो॒ नाम॑ । स न॑ इ॒दं ब्रह्म॑ क्ष॒त्रं पा॑तु॒ तस्मै॒ स्वाहा॒ वाट् ताभ्यः॒ स्वाहा॑ ॥ १८–३९ ॥

अर्थः– जो अहोरात्र यांना जुळवतो व जो सर्वसाम आहे, असा तो सूर्य-गंधर्व आमच्या या ब्राह्मण व क्षत्रिय जातीचें रक्षण करो ! त्याला वषट्कारानें सुहुत असो ! त्या सूर्य-गंधर्वाच्या सभोंवार प्रकाशणाऱ्या मरीची नांवाच्या ज्या अप्सरा आहेत, त्यांना सुहुत असो ! ॥ १३३ ॥

### मणि १३४ वा

प्रजापति–ऋषि, गंधर्वाप्सरा–देवता, यजुः–छंद.

सुषुम्णः सूर्यरश्मिश्चन्द्रमा गन्धर्वस्तस्य नक्षत्राण्यप्सरसो भेकुरयो नाम । स न इदं ब्रह्म क्षत्रं पातु तस्मै स्वाहा वाट् ताभ्यः स्वाहा ॥ १८–४० ॥

अर्थः–जो सुखप्रद आहे व ज्याचे किरण सूर्यासारखे आहेत असा तो चंद्रमा-गंधर्व आमच्या या ब्राह्मण व क्षत्रिय वर्गाचें रक्षण करो ! त्या चंद्रमा-गंधर्वाच्या लुक्लुकणाऱ्या नक्षत्र नांवाच्या ज्या अप्सरा आहेत त्यांना सुहुत असो ! ॥ १३४ ॥

### मणि १३५ वा

प्रजापति–ऋषि, गंधर्वाप्सरा–देवता, यजुः–छंद.

इषिरो विश्वव्यचा वातो गन्धर्वस्तस्यापो अप्सरस ऊर्जो नाम । स न इदं ब्रह्म क्षत्रं पातु तस्मै स्वाहा वाट् ताभ्यः स्वाहा ॥ १८–४१ ॥

अर्थः–जो शीघ्र गमन करणारा आहे व जो सर्व ठिकाणीं गमन करणारा आहे असा तो वायु-गंधर्व आमच्या ब्राह्मण व क्षत्रिय बांधवांचें रक्षण करो ! त्याला वषट्कारानें सुहुत असो ! त्या वायु-गंधर्वाच्या अन्नस्वरूप आपनांवाच्या ज्या अप्सरा आहेत त्यांना सुहुत असो ! ॥ १३५ ॥

### मणि १३६ वा

प्रजापति–ऋषि, गंधर्वाप्सरा–देवता, यजुः–छंद.

भुज्युः सुपर्णो यज्ञो गन्धर्वस्तस्य दक्षिणा अप्सरसस्तावा नाम । स न इदं ब्रह्म क्षत्रं पातु तस्मै स्वाहा वाट् ताभ्यः स्वाहा ॥ १८–४२ ॥

अर्थः- जो सर्व भूतमात्रांचें रक्षण करितो आणि जो स्वर्गाप्रत जाणारा आहे असा तो यज्ञ-गंधर्व आमच्या या ब्राह्मण व क्षत्रिय जातींचें रक्षण करो। त्याला सुहुत असो! त्या यज्ञ-गंधर्वाच्या स्तोत्रसंपन्न दक्षिणा नांवाच्या ज्या अप्सरा आहेत त्यांना सुहुत असो! ॥ १३६ ॥

## मणि १३७ वा

प्रजापति-ऋषि, गंधर्वाप्सरा-देवता, यजुः-छंद.

प्रजापतिर्विश्वकर्मा मनो गन्धर्वस्तस्य ऋक्सामान्यप्सरस एष्टयो नाम। स नं इदं ब्रह्म क्षत्रं पातु तस्मै स्वाहा वाट् ताभ्यः स्वाहा ॥ १८-४३ ॥

अर्थः- जो प्रजेचा पालनकर्ता आहे व ज्यानें हें विश्व निर्माण केलें आहे असा तो मनो-गंधर्व आमच्या या ब्राह्मण व क्षत्रिय वर्गाचें रक्षण करो। त्याला वषट्कारानें सुहुत असो। ज्यांच्या सहायानें अभीष्ट प्रार्थिलें जातें अशा ऋक्साम नांवाच्या त्या मनो-गंधर्वाच्या ज्या अप्सरा आहेत त्यांना सुहुत असो! ॥१३७॥

## मणि १३८ वा

शुनःशेप-ऋषि, वरुण-देवता, त्रिष्टुप्-छंद.

तत्त्वा यामि ब्रह्मणा वन्दमानस्तदाशास्ते यजमानो हविर्भिः। अहेडमानो वरुणेह बोध्युरुशꣳस मा न आयुः प्रमोषीः॥१८-४९॥

अर्थः- हे वरुण देवा! हा यजमान तुला हविर्भाग देऊन धनपुत्रादिकांची इच्छा करितो, ती त्याची इच्छा सफल करणेबद्दल मोठ वैदिक मंत्रांनीं मी तुझी स्तुति व प्रार्थना करितों. हे महाकीर्तिमान् देवा! न रागावतां तूं ही माझी प्रार्थना ऐक. आणि हे देवा! तूं आमचें आयुष्य कमी करून अकालीं हरण करूं नकोस ॥ १३८ ॥

## मणि १३९ वा

प्रजापति-ऋषि, अग्नि-देवता, पुरोष्णिक्-छंद.

दिवो मूर्धासि पृथिव्या नाभिरूर्गपामोषधीनाम्। विश्वायुः शर्म सप्रथा नमस्पथे ॥ १८-५४ ॥

अर्थः–हे अग्निदेवा! तूं स्वर्लोकाचें सूर्यरूपानें शिरस्थानीं आहेस! पृथिवीचे मध्यस्थानीं आहेस! उदक व वनस्पती यांचें सार आहेस! सर्वप्राणिमात्रांचें जीवन आहेस! सर्वांचा आश्रय आहेस! तूं मोठा प्रभावशाली आहेस! त्या तुझ्या स्वर्गाकडे नेणाऱ्या देवयान मार्गाला नमस्कार असो! ॥ १३९ ॥

### मणि १४० वा

देवश्रवद्देववात–ऋषि, अग्नि–देवता, त्रिष्टुप्–छंद.

अ॒ग्निर॑स्मि॒ जन्म॑ना जा॒तवे॑दा घृ॒तं मे॒ चक्षु॑र॒मृतं॑ म आ॒सन्। अ॒र्कस्त्रि॒धातू॒ रज॑सो वि॒मानोऽज॑स्रो घ॒र्मो ह॒विर॑स्मि॒ नाम॑ ॥ १८–६६ ॥

अर्थः– जन्मानें मी अग्नि आहे. व नांवानें ( पुरोडाशादि ) हवि आहे. जें जें म्हणून उत्पन्न होतें त्या सर्वांचा मी स्वामी आहे. यज्ञही मीच आहे. ऋग्यजुः सामलक्षणान्वित त्रयी विद्या मीच आहे. उदकाचा निर्माणकर्ता व नित्य शाश्वत असा सूर्यदेवही पण मीच आहे। माझे नेत्र घृतरूप आहेत आणि माझ्या मुखांत अमृत आहे। ( अर्थात् जो मला घृताहुति देईल त्याजवर कृपादृष्टि करून मी त्याला अमर करितों हा भावार्थ ) ॥ १४० ॥

### मणि १४१ वा

कुत्स–ऋषि, वैश्वानर–देवता, त्रिष्टुप्–छंद.

पृ॒ष्टो दि॒वि पृ॒ष्टो अ॒ग्निः पृ॑थि॒व्यां पृ॒ष्टो विश्वा॒ ओष॑धी॒रा वि॑वेश। वै॒श्वा॒न॒रः सह॑सा पृ॒ष्टो अ॒ग्निः स नो॒ दिवा॒ स रि॒षस्पा॑तु॒ नक्त॑म् ॥ १८–७३ ॥

अर्थः– स्वर्गामध्यें आदित्यरूपानें प्रकाशणारा असा हा कोण म्हणून जो मुमुक्षूंकडून विचारिला जातो, अंतरिक्षामध्यें विद्युद्रूपानें चमकणारा असा हा कोण म्हणून जो जलार्थीकडून पुसला जातो, सर्व ओषधींमध्यें प्रवेश करून प्राण्यांना जगण्यासाठीं तापपाकप्रकाशादि देऊन प्राणिमात्रांवर उपकार करणारा असा हा कोण म्हणून जो अग्निहोत्र्याकडून विचारला जातो, बलानें अध्वर्यूकडून मंथिला जाणारा असा हा कोण म्हणून जो यज्ञस्थळीं जमलेल्या प्रेक्षकांकडून विचारला जातो असा तो हा सर्वलोकहितकारक अग्निनारायण आमचें हिंसेपासून दिवसा रक्षण करो! आणि तसेंच रात्रींही रक्षण करो! ॥ १४१ ॥

### मणि १४२ वा.

प्रजापति–अश्वी–सरस्वती–ऋषि, पयो–देवता. यजुर्बृहती–छंद.

तेजोऽसि तेजो मयि धेहि वीर्यमसि वीर्यं मयि धेहि बलमसि बलं मयि धेह्योजोऽस्योजो मयि धेहि मन्युरसि मन्युं मयि धेहि सहोऽसि सहो मयि धेहि ॥ १९–९ ॥

अर्थः– हे पयोदेवते ! तूं प्रत्यक्ष तेजोरूप आहेस. माझ्यामध्यें तेजाची स्थापना कर ! हे ग्रहा ! तूं वीर्य आहेस. अतएव माझ्यात वीर्याची स्थापना कर ! हे ग्रहा ! तूं बलवान आहेस ! अतएव माझ्यांत बलाची स्थापना कर ! हे सुरा-देवते ! तूं ओजस्वरूप आहेस, माझ्यामध्यें कांतीची प्रतिष्ठा कर ! तू मनाला प्रज्वलित करणारी कोपस्वरूप आहेस, अतएव माझ्या ठिकाणीं कोपाची प्रतिष्ठा कर ! तूं बलवान् आहेस अतएव माझ्यांत सामर्थ्य सळकेल असें कर ! ॥ १४२ ॥

### मणि १४३ वा.

प्रजापति–अश्वी–सरस्वती–ऋषि, सोम–देवता, अनुष्टुप्–छंद.

व्रतेन दीक्षामाप्नोति दीक्षयाप्नोति दक्षिणाम् । दक्षिणा श्रद्धामाप्नोति श्रद्धया सत्यमाप्यते ॥ १९–३० ॥

अर्थः– व्रतानुष्ठानानें योग्यता प्राप्त होते. योग्यता प्राप्त झाली म्हणजे दक्षिणा मिळते. दक्षिणेमुळें श्रद्धा वाढते आणि श्रद्धेच्या योगानें ब्रह्मसाक्षात्कार होतो. ( १९–३० ) ॥ १४३ ॥

### मणि १४४ वा.

प्रजापति–अश्वी, सरस्वती–ऋषि, पितृ–देवता, यजुः–छंद.

पितृभ्यः स्वधायिभ्यः स्वधा नमः पितामहेभ्यः स्वधायिभ्यः स्वधा नमः प्रपितामहेभ्यः स्वधायिभ्यः स्वधा नमः । अक्षन्पितरोऽमीमदन्त पितरोऽतीतृपन्त पितरः पितरः शुन्धध्वम् ॥ १९–३६ ॥

अर्थः– आम्हाला भोजनाचा लाभ देण्यासाठीं आमच्या घरीं आज येणाऱ्या पितरांप्रीत्यर्थ आम्हीं हें अन्न तयार केलें आहे. त्यांना आम्ही नमस्कार करितों

त्याचप्रमाणें पितामहाकरितां आम्ही हें अन्न तयार केलें आहे. त्याना आम्ही नमस्कार करितों. तसेंच प्रपितामहाकरिताही आम्ही अन्न तयार केलें आहे. त्याना आमचा नमस्कार असो. आमचे पितर भोजन करते झाले. परमान्न जेवून तृप्त झाले आणि हर्षनिर्भर झाले अहो पितरानों! आतां हस्तप्रक्षालन करून शुचिर्भूत व्हा ॥ १४४ ॥

### मणि १४५ वा.

प्रजापति–अश्वी–सरस्वती–ऋषि, पितृ–देवता अनुष्टुप्–छंद.

पुनन्तु मा पितरः सोम्यासः पुनन्तु मा पितामहाः पुनन्तु प्रपितामहाः पवित्रेण शतायुषा । पुनन्तु मा पितामहाः पुनन्तु प्रपितामहाः पवित्रेण शतायुषा विश्वमायुर्व्यश्नवै ॥ १९–३७ ॥

**अर्थः**– सोमसंपादक पितर शंभर वर्षे आयुष्य देणाऱ्या अशा पवित्रानें मला पावन करोत! सोमसंपादक पितर उदंड आयुष्य देणाऱ्या पवित्रानें मला पावन करोत! सोमसंपादक प्रपितामह दीर्घायुष्य देणाऱ्या पवित्रानें मला पावन करोत! याप्रमाणें पितृ-पितामह-प्रपितामह-प्रभृतींनीं पुनीत केलेल्या मला उदंड आयुष्य प्राप्त होवो! ॥ १४५ ॥

### मणि १४६ वा

प्रजापति–ऋषि, अग्नि–देवता, गायत्री–छंद

अग्न आयूꣳषि पवस आसुवोर्जमिषं च नः आरे बाधस्व दुच्छुनाम् ॥ १९–३८ ॥

**अर्थः**– हे अग्निदेवा! तू स्वभावतःच आयुष्य वर्धन करणारा असा आहेस अतएव आम्हास व्रीहियवादि धान्यें व दहि दूध इत्यादि रस हीं वहाल कर! आणि देवा! श्वानतुल्य जे दुष्ट लोक आहेत ते दूर जरी असले तरी त्यांचा पण नाश कर. ॥ १४६ ॥

### मणि १४७ वा.

प्रजापति–अश्वी–सरस्वती–ऋषि, लिंगोक्त–देवता, अनुष्टुप्–छंद.

पुनन्तु मा देवजनाः पुनन्तु मनसा धियः । पुनन्तु विश्वा भूतानि जातवेदः पुनीहि मा ॥ १९–३९ ॥

अर्थः- देवांचे सद्रक्षक मला पुनीत करोत! सद्वासना व सत्कर्मे मला पावन करोत। सर्वभूतजात मला पावन करो। हे जातवेदा! तूंही पण मला पावन कर।॥ १४७ ॥

### मणि १४८ वा.

प्रजापति-अश्वी-सरस्वती-ऋषि, अग्नि-देवता; गायत्री-छंद.

पवित्रेण पुनीहि मा शुक्रेण देव दीद्यत्। अग्ने क्रत्वा क्रतूँ२॥ रनु ॥ १९-४० ॥

अर्थः- हे देदीप्यमान अग्निदेवा! शुद्ध पवित्रानें तूं मला पावन कर! हे देवा! आमच्या यज्ञाकडे लक्ष पुरवून तूं आपल्या कर्तृत्वशक्तीनें मला पावन कर।॥ १४८ ॥

### मणि १४९ वा.

प्रजापति-अश्वी-सरस्वती-ऋषि, अग्नि-देवता, गायत्री-छंद.

यत्ते पवित्रमर्चिष्यग्ने विततमन्तरा। ब्रम्ह तेन पुनातु मा ॥ १९-४१ ॥

अर्थः- हे अग्निदेवा! तुझ्या ज्वालेमध्ये जें परब्रह्मरूप पवित्र पसरलेलें आहे त्या पवित्रानें मला तूं पावन कर।॥ १४९ ॥

### मणि १५० वा.

प्रजापति-अश्वी-सरस्वती-ऋषि, सोम-वायु-देवता, गायत्री-छंद.

पवमानः सो अद्य नः पवित्रेण विचर्षणिः। यः पोता स पुनातु मा ॥ १९-४२ ॥

अर्थः- कृताकृतद्रष्टा व पावनकर्ता असा तो सोमदेव आजरोजी पवित्रानें आम्हास पावन करो। जो जात्याच पावनशील आहे असा तो वायुदेवही मला पावन करो।॥ १५० ॥

### मणि १५१ वा.

प्रजापति-अश्वी-सरस्वती-ऋषि, सविता-देवता, गायत्री-छंद.

उभाभ्यां देव सवितः पवित्रेण सवेन च। मां पुनीहि विश्वतः ॥ १९-४३ ॥

**अर्थ.**- हे सविता देवा! पवित्रानें व यज्ञकार्य आरंभ करण्यास अनुज्ञा देऊन मला तू सर्वप्रकारें पावन कर! ॥ १५१ ॥

## मणि १५२ वा

प्रजापति-अश्वी-सरस्वती-ऋषि, विश्वदेव-देवता, त्रिष्टुप्-छंद.

वैश्वदेवी पुनती देव्यागाद्यस्यामिमा बह्व्यस्तन्वो वीतपृष्ठाः । तया मदन्तः सधमादेषु वयꣳ स्याम पतयो रयीणाम् ॥ १९-४४ ॥

**अर्थ.**- ज्या सुराकुंभामध्यें या प्रत्यक्ष दिसणाऱ्या व अनन्त अशा सुराधारा आहेत अशी ती ही सकलसुरहितकारिणी, पावनकर्त्री, दिव्य सुराकुंभी या यज्ञगृहांत प्रवेश करती झाली त्या सुराकुंभीनें या यज्ञस्थानांत हर्षनिर्भर झालेले आम्ही उत्तम धनाचे मालक होऊं असें घडो ॥ १५२ ॥

## मणि १५३ वा.

प्रजापति-अश्वी-सरस्वती-ऋषि, पितृ-देवता, अनुष्टुप्-छंद.

ये समानाः समनसः पितरो यमराज्ये । तेषां लोकः स्वधा नमो यज्ञो देवेषु कल्पताम् ॥ १९-४५ ॥

**अर्थः**- माझे सजातीय व समनस्क असे जे पितर यमराज्यांत रहात आहेत त्या पितृलोकांत रहाणाऱ्या पितरांना हें स्वधारूपी अन्न असो' व त्या पितरांना आमचा नमस्कारही असो' हा यज्ञ देवांना तृप्त करण्यास समर्थ होवो ॥ १५३ ॥

## मणि १५४ वा

प्रजापति-अश्वी-सरस्वती-ऋषि, श्री-देवता, अनुष्टुप्-छंद

ये समानाः समनसो जीवा जीवेषु मामकाः । तेषां श्रीर्मयि कल्पतामस्मिँल्लोके शतꣳ समाः ॥ १९-४६ ॥

**अर्थ** - या मृत्युलोकामध्यें कुलानें व मनानें जे माझ्या बरोबरीने आहेत अशा माझ्या सपिंड बाधवांची सौभाग्य लक्ष्मी त्यांना सोडून या लोकांत माझा उदंड आश्रय करून राहो! ॥ १५४ ॥

### मणि १५५ वा.

प्रजापति–अश्वी–सरस्वती–ऋषि, देवयानपितृयाणमार्ग–देवता, त्रिष्टुप्–छंद.

द्वे सृती अशृणवं पितॄणामहं देवानामुत मर्त्यानाम् । ताभ्यामिदं विश्वमेजत्समेति यदन्तरा पितरं मातरं च ॥ १९–४७ ॥

अर्थः– मनुष्याचे दोन मार्ग आहेत असें ऐकिलें आहे, एक देवाकडे जाणारा देवयान नावाचा मार्ग. आणि दुसरा पितरांकडे जाणारा पितृयाण नांवाचा मार्ग. स्वर्ग व पृथ्वि यामध्यें जें चर जात आहे तें सर्व या दोन मार्गांवरूनच जात असतें ॥ १५५ ॥

### मणि १५६ वा.

प्रजापति–अश्वी–सरस्वती–ऋषि, यजमानाशीः–देवता, अष्टि–छंद.

इदं हविः प्रजननं मे अस्तु दशवीरꣳ सर्वगणꣳ स्वस्तये । आत्मसनि प्रजासनि पशुसनि लोकसन्यभयसनि । अग्निः प्रजां बहुलां मे करोत्वन्नं पयो रेतो अस्मासु धत्त ॥ १९–४८ ॥

अर्थः– प्रजोत्पादन करणारें, प्राणांना स्वास्थ्य देणारें, सर्व अवयवांना सुख देणारें, मोक्ष देणारें, पुत्रपौत्रादि प्रजा देणारें, अश्वगवादिक पशु देणारें, ऐहिक सुख देणारें, स्वर्गसुख देणारें असें हें दुग्धरूप अन्न माझी अखंड क्षेमवृद्धी करो! अग्निदेव माझी पुत्रपौत्रादि संतति विस्तार करो! हे ऋत्विजांनो! तुम्हीही पण आम्हास अन्न, दुग्ध व वीर्य हीं देऊन आम्हांवर अनुग्रह करा! ॥ १५६ ॥

### मणि १५७ वा.

शंख–ऋषि, अग्निष्वात्तापितर–देवता, त्रिष्टुप्–छंद.

उदीरतामवर उत्परास उन्मध्यमाः पितरः सोम्यासः । असुं य ईयुरवृका ऋतज्ञास्ते नोऽवन्तु पितरो हवेषु ॥ १९–४९ ॥

अर्थः– या लोकामध्यें जे सोमसंपादक पितर आहेत, ते याहून वर असलेल्या अशा श्रेष्ठ लोकाप्रत जावोत! आणि मध्यलोकांत जे आहेत ते त्याहूनही श्रेष्ठ अशा लोकाप्रत जावोत! जे वायुरूप झालेले आहेत. असे ते यज्ञहीन व सत्यज्ञ पितर आमच्या हाकेसरशीं आमचें रक्षण करोत! ॥ १५७ ॥

मणि १५८ वा.

शंख–ऋषि, अग्निष्वात्तापितर–देवता, त्रिष्टुप्–छंद

अङ्गिरसो नः पितरो नवग्वा अथर्वाणो भृगवः सोम्यासः।

तेषां वयंऽसुमतौ यज्ञियानामपि भद्रे सौमनसे स्याम ॥ १९–५० ॥

अर्थः– ज्यांचा मार्ग स्तुत्य आहे, व ज्यांनीं सोम प्राप्त करून घेतला आहे व जे अंगिरा, अथर्व व भृगु ऋषींचे वंशज आहेत अशा त्या आमच्या यज्ञसंपादक पितरांच्या कृपाछत्राखालीं व त्यांच्या सुप्रसन्न मर्जीत आम्ही सदैव रहावें ! ॥ १५८ ॥

मणि १५९ वा.

शंख–ऋषि, अग्निष्वात्तापितर–देवता, त्रिष्टुप्–छंद.

ये नः पूर्वे पितरः सोम्यासोऽनूहिरे सोमपीथं वसिष्ठाः। तेभिर्यमः सꣳरराणो हवीꣳष्युशन्नुशद्भिः प्रतिकाममत्तु ॥ १९–५१ ॥

अर्थ.– आमच्या ज्या प्राचीन सोमसंपादक वसिष्ठ वंशज पितरांनीं देवांना सोमरस प्राप्त करून दिला त्या तेजस्वी पितरांबरोबर स्नेहभावानें वागणारा हविरन्नेच्छु यमराज आमच्या हविरन्नाचें यथेच्छ भक्षण करो ॥ १५९ ॥

मणि १६० वा.

शंख–ऋषि, पितृ–देवता, त्रिष्टुप्–छंद.

त्वꣳ सोम प्रचिकितो मनीषा त्वꣳ रजिष्ठमनुनेषि पन्थाम्। तव प्रणीती पितरो न इन्दो देवेषु रत्नमभजन्त धीराः ॥ १९–५२ ॥

अर्थः– हे चंद्रा ! तूं महाज्ञानी आहेस आणि म्हणूनच तूं आपल्या बुद्धिकौशल्यानें अत्यंत सरळ अशा देवयान मार्गावरून आम्हास घेऊन जातोस. हे इंद्रो आमचे बुद्धिमान पूर्वज तुझ्या कृपाप्रसादानें स्वर्ग लोकामध्यें रमणीय अशा यज्ञफलाचा उपभोग घेते झाले. ॥ १६० ॥

मणि १६१ वा

शंख–ऋषि, पितृ–देवता, त्रिष्टुप्–छंद.

त्वया हि नः पितरः सोम पूर्वे कर्माणि चक्रुः पवमान धीराः। वन्वन्नवातः परिधीꣳरपोर्णु वीरेभिरश्वैर्मघवा भवा नः ॥ १९-५३॥

अर्थः– हे सोमदेवा ! हे मकपावना ! आमच्या शहाण्या पूर्वजांनीं ज्या अर्थी त्वुइया सहायानें यज्ञयागादि पुण्यकर्में केलीं त्याअर्थीं मी तुझी अशी प्रार्थना करितो कीं आमच्या या यज्ञकार्याला तूं पूर्ण मदत कर। आणि हे देवा! एकचित्त होऊन आमच्या यज्ञकार्यांत उपद्रव करणाऱ्यांची सर्वतोपरीनें दाणादाण करून सोड। इतकेंच नव्हे, तर वीर व घोडे बरोबर घेऊन येऊन तूं आमचा पुढारी हो ! ॥ १६१ ॥

## मणि १६२ वा.

शंख–ऋषि, पितृ–देवता, त्रिष्टुप्–छंद.

त्वं सोम पितृभिः संविदानोऽनु द्यावापृथिवी आततन्थ। तस्मै त इन्दो हविषा विधेम वयं स्याम पतयो रयीणाम् ॥१९–५४॥

अर्थः– हे सोमदेवा ! पितरांबरोबर संभाषण करणारा तूं स्वर्ग व पृथ्वि यांचा विस्तार करितोस. हे रजनीनाथा ! तुला आम्ही हविर्भाग अर्पण करितों पण देवा ! प्रार्थना इतकीच कीं हविर्भाग अर्पण करणारे आम्ही–तुझे भक्त–धनाचे मालक होऊं असें घडो ! ॥ १६२ ॥

## मणि १६३ वा.

शंख–ऋषि, पितृ–देवता, त्रिष्टुप्–छंद.

बर्हिषदः पितर ऊत्यर्वागिमा वो हव्या चकृमा जुषध्वम्। त आगतावसा शंतमेनाथा नः शं योररपो दधात ॥ १९–५५ ॥

अर्थः– अहो दर्भासनस्थ पितरांनों ! आम्हावर कृपालोभ करण्याच्या बुद्धीनें तुम्ही इकडे या ! आम्हीं हें परमान्न खास तुम्हाकरितां म्हणून तयार केलें आहे. तें मिष्टान्न सेवन करा; ! तें मधुर अन्न सेवन करून तृप्त व तुष्ट झालां म्हणजे आम्हांलाहि सुखप्रसाद द्या ! अभयदान द्या। तसेंच आमचे सर्व दोष नाहींसे करा ! ॥ १६३ ॥

## मणि १६४ वा.

शंख–ऋषि, पितृ–देवता, त्रिष्टुप्–छंद.

आहं पितॄन्त्सुविदत्राँ२॥ अवित्सि नपातं च विक्रमणं च विष्णोः। बर्हिषदो ये स्वधया सुतस्य भजन्त पित्वस्त इहागमिष्ठाः॥१९–५६॥

अर्थ – मंगलदायक पितरांना मी सर्वांत प्रामुख्यानें ओळखतों विश्वव्यापी असा जो यज्ञस्वरूपी भगवान विष्णुदेव, त्याचे देवयान व पितृयान हे दोन मार्गही पण मी जाणतों. म्हणून म्हणतों कीं, जे बर्हिषद् पितर अन्न व सोमरस यांचें सेवन करितात ते या आमच्या यज्ञमंडपामध्ये प्राप्त होवोत ॥ १६४॥

## मंत्र १६५ वा

शंख–ऋषि, पितृ–देवता, त्रिष्टुप्–छंद

उपहूताः पितरः सोम्यासो बर्हिष्येषु निधिषु प्रियेषु । त आगमन्तु त इह श्रुवन्त्वधिब्रुवन्तु तेवन्त्वस्मान् ॥ १९–५७ ॥

अर्थ.– दर्भावर क्रमवार मांडलेल्या अन्नाचें ग्रहण करण्याकरितां म्हणून निमंत्रिलेले सोमसंपादक पितर या यज्ञामध्यें आगमन करोत । ते आमची प्रार्थना ऐकोत । ऐकून प्रसन्न होत्साते आम्हास शुभ आशीर्वाद देवोत । आणि आमचे सर्वपरीनें संरक्षण करोत । ॥ १६५ ॥

## मंत्र १६६ वा.

शंख–ऋषि, पितृ–देवता, त्रिष्टुप्–छंद

आयन्तु नः पितरः सोम्यासोऽग्निष्वात्ताः पथिभिर्देवयानैः । अस्मिन्यज्ञे स्वधया मदन्तोऽधिब्रुवन्तु तेऽवन्त्वस्मान् ॥ १९–५८ ॥

अर्थ.– आमचे सोमपानार्ह अग्निपूत पितर देवयान मार्गानें येथें प्राप्त होवोत। या यज्ञामध्यें रुचिकर अन्न सेवन करून संतुष्ट झाले म्हणजे ते आम्हास मंगल आशीर्वचन करोत । आणि आमचें सर्व प्रकारें रक्षण करोत । ॥१६६॥

## मंत्र १६७ वा.

शंख–ऋषि, पितृ–देवता, जगती–छंद

अग्निष्वात्ताः पितर एह गच्छत सदः सदः सदत सुप्रणीतयः । अत्ता हवींषि प्रयतानि बर्हिष्यथा रयिꣳ सर्ववीरं दधातन ॥ १९–५९॥

अर्थ – अहो सन्मार्गदर्शक अग्निपूत पितरांनो ! आमच्याकडे येण्याची कृपा करा । येथें आलां म्हणजे तुमच्याकरितां मांडून ठेविलेल्या सुखासनावर विराजमान व्हा. येथें दर्भावर क्रमवार मांडलेल्या मिष्टान्नाचें यथेच्छ सेवन करा ! आणि भोजन करून तृप्त झालां म्हणजे सर्वश्रेष्ठ अशी संपत्ति आमच्या पदरी टाकण्याची कृपा करा । ॥ १६७ ॥

### मणि १६८ वा.

शंख–ऋषि, पितृ–देवता, त्रिष्टुप्–छंद.

ये अ॑ग्निष्वा॒त्ता ये अन॑ग्निष्वात्ता॒ मध्ये॑ दि॒वः स्व॒धया॑ मा॒दय॑न्ते ।
तेभ्यः॑ स्व॒राडसु॑नीतिमे॒तां य॑थाव॒शं त॒न्वं॑ कल्पयाति ॥ १९–६० ॥

**अर्थः–** ज्यांचा विधिपूर्वक स्मशानसंस्कार झाला आहे व ज्यांचा तसा झालेला नाही असे जे आमचे पितर स्वर्गामध्ये आपल्या सुकृतफलाचा उपभोग घेत असतील त्या पितरांना यमराज त्यांच्या त्यांच्या इच्छेप्रमाणें मानवी शरीर देवो ।' ॥ १६८ ॥

### मणि १६९ वा.

शंख–ऋषि, पितृ–देवता, त्रिष्टुप्–छंद.

अ॒ग्नि॒ष्वा॒त्तानृ॑तु॒मतो॑ हवामहे नाराश॒ꣳसे सो॑मपी॒थं य आ॒शुः । ते
नो॑ विप्रा॑सः सु॒हवा॑ भवन्तु व॒यꣳ स्या॑म॒ पत॑यो र॒यीणाम् ॥१९-६१॥

**अर्थः–** जे नाराशंसांतून सोमपान करीत असतात अशा नियमितकाळीं येणाऱ्या अग्निष्वात्त पितरांना आम्ही निमंत्रण करितों. ते सर्व काही जाणणारे असून आमच्या हाकेसरशीं शीघ्र इकडे येणारे असे आहेत. ते इकडे आले म्हणजे आम्ही श्रेष्ठ धनाचे मालक होऊं ।॥ १६९ ॥

### मणि १७० वा.

प्रजापति–अश्वी–सरस्वती–ऋषि, पितृ–देवता, त्रिष्टुप्–छंद.

आच्या॒ जानु॑ दक्षिण॒तो नि॒षद्ये॒मं य॒ज्ञम॒भिगृ॑णीत॒ विश्वे॑ । मा
हिंसिष्ट पितरः॒ केन॑चिन्नो॒ यद्व॒ आगः॑ पुरुष॒ता करा॑म ॥ १९–६२ ॥

**अर्थः–** अहो पितरांनो ! तुम्ही सर्वजण डावी मांडी खाली करून आणि दक्षिणाभिमुख होऊन बसल्या बसल्याच या आमच्या यज्ञाची प्रशंसा करा; आणि आम्हावर एवढी कृपा करा कीं आम्ही कळून अगर नकळून असा कसला जरी तुमचा अपराध केला असला तरी त्याबद्दल आम्हास शिक्षा करूं नका। कारण असें पहा कीं मानवी स्वभाव स्थिर नसल्यामुळें आम्ही कदाचित् चुकूनमाकून तुमचा अपराध केला असला तरी केला नाहीं असें करें म्हणावें ? ॥ १७० ॥'

मणि १७१ वा.

प्रजापति–अश्वी–सरस्वती–ऋषि, पितृ–देवता, त्रिष्टुप्–छंद

आसीनासो अरुणीनामुपस्थे रयिं धत्त दाशुषे मर्त्याय । पुत्रेभ्यः पितरस्तस्य वस्वः प्रयच्छत त इहोर्जं दधात ॥ १९–६३ ॥

अर्थः– अहो आदित्यमंडलस्थ पितरांनो ! तुम्हाला अन्न देणाऱ्या यज-मानाला अपार ऐश्वर्य देण्याची मेहरबानी करा. तुमचे पुत्र जे हे यजमान त्यांना त्यांच्या इच्छेप्रमाणे वरदान करण्यात चुकू नका आणि या यज्ञामध्ये मधु-रसाची रेलचेल करून सोडा ! ॥ १७१ ॥

मणि १७२ वा.

प्रजापति–अश्वी–सरस्वती–ऋषि, पितृ–देवता, अनुष्टुप्–छंद.

यमग्ने कव्यवाहन त्वं चिन्मन्यसे रयिम् । तं नो गीर्भिः श्रवाय्यं देवत्रा पनया युजम् ॥ १९–६४ ॥

अर्थ – हे पितरांना अन्न नेऊन पोचविणाऱ्या कव्यवाहन अग्निदेवा ! हे हवि-रूप धन स्तुतीनें मंडित असून ऐश्वर्यास मोठें मनोहर आहे व जें योग्य आहे असें तुला वाटतें तें आमचें हविर्धन कृपा करून देवांना नेऊन पोचव ॥१७२॥

मणि १७३ वा.

प्रजापति–अश्वी–सरस्वती–ऋषि, पितृ–देवता, अनुष्टुप्–छंद

यो अग्निः कव्यवाहनः पितृन्यक्षदृतावृधः । प्रेदु हव्यानि वोचति देवेभ्यश्च पितृभ्य आ ॥ १९–६५ ॥

अर्थः– जो कव्यवाहन अग्निदेव सद्धर्मसवर्धक पितरांना कव्याला नेऊन पोंचवितो तो देवांचा कोणता हविर्भाग व पितरांचा कोणता कव्यभाग हें उभय-तांनाही तेथें स्पष्ट खुलासा करून सांगो ! ॥ १७३ ॥

मणि १७४ वा.

प्रजापति–अश्वी–सरस्वती–ऋषि, पितृ–देवता, त्रिष्टुप्–छंद

त्वमग्न ईडितः कव्यवाहनावाड्ढव्यानि सुरभीणि कृत्वी । प्रादाः पितृभ्यः स्वधया ते अक्षन्नद्धि त्वं देव प्रयता हवींषि ॥१९–६६॥

अर्थः– हे कव्यवाहना ! हे अग्निदेवा ! देवकार्तिजांकडून स्तविला गेलेला असा तूं पितरांचें अन्न सुस्वादित करून नेता झालास. आणि तें अन्न पितृ-मंत्रानें तूं आमच्या पितरांना पोंचविण्याची रूपाही पण केलीस. आमच्या पितरांनीं तें अन्न मोठ्या आवडीनें भक्षणही केलें. आणि आतां, हे देवा ! या शुद्ध हवीचें तूंही पण सेवन कर ! ॥ १७४ ॥

## मणि १७५ वा.

प्रजापति–अश्वी–सरस्वती–ऋषि, पितृ–देवता, त्रिष्टुप्–छंद.

मे चेह पितरो ये च नेह यांश्च विद्म याँ२॥ उं च न प्रविद्म ।
त्वं वेत्थ यति ते जातवेदः स्वधाभिर्यज्ञ५ सुकृतं जुषस्व ॥१९-६७॥

अर्थः– जे पितर या लोकांत राहतात व जे राहत नाहींत, ज्यांना आम्ही ओळखितों, व ज्यांना ओळखीत नाहीं, अशा त्या आमच्या शुचिर्भूत पितरांना, हे जातवेदा ! तू पण ओळखतोस, कव्यान्नानें सुशोभित केलेल्या या यज्ञाचें, हे देवा ! तू सेवन कर ! ॥ १७५ ॥

## मणि १७६ वा.

प्रजापति–अश्वी–सरस्वती–ऋषि, पितृ–देवता, त्रिष्टुप्–छंद.

इदं पितृभ्यो नमोऽस्त्वद्य ये पूर्वासो य उपरास ईयुः । ये पार्थिवे
रजस्या निषत्ता ये वा नून५ सुवृजनासु विक्षु ॥ १९–६८ ॥

अर्थः– जे पितर स्वर्गाप्रत गेले आहेत, जे कृतकृत्य होवून परमात्मरूप पावलेले आहेत, जे पृथिवीवरील अग्नीमध्येंच निवास करून आहेत व जे सदाचार-संपन्न यजमानांचा आश्रय करून आहेत अशा त्या सर्व पितरांना आजरोजीं आम्हीं हें मिष्टान्न समर्पण करीत आहों ॥ १७६ ॥

## मणि १७७ वा.

प्रजापति–अश्वी–सरस्वती–ऋषि, पितृ–देवता, त्रिष्टुप्–छंद.

अधा यथा नः पितरः परासः प्रत्नासो अग्न ऋतमाशुषाणाः ।
शुचीदयन्दीधितिमुक्थशासः क्षामा भिन्दन्तो अरुणीरपव्रन् ॥१९-६९॥

**अर्थः**— हे अग्निदेवा! आमचे श्रेष्ठ, प्राचीन व यज्ञोपभोक्ते पितर येथील देहयात्रा आटोपल्यावर ज्याप्रमाणें निर्मल अशा रविमंडलाप्रत जाते झाले तद्वत् यज्ञात स्तोत्र गाणारे व वेदि, विहीर, तलाव वगैरे रूपानें जमीन खणणारे आम्हीही अरुणवर्णयुक्त सूर्यकिरणाचें अवलंबन करतों ! ॥ १७७ ॥

### मणि १७८ वा.

प्रजापति—अश्वी, सरस्वती—ऋषि, पितृ—देवता, अनुष्टुप्—छंद.

उशन्तस्त्वा निधीमह्युशन्तः समिधीमहि । उशन्नुशत आवह पितॄन्हविषे अत्तवे ॥ १९—७० ॥

**अर्थः**— हे अग्निदेवा ! तुझ्या कृपाकटाक्षाची इच्छा करणारे आम्ही तुझी येथें स्थापना करितों आणि तसेंच संदीपनहि करितों. भक्तवत्सल असा तूं आमच्यावर प्रेम करणाऱ्या पितराना आम्हीं तयार केलेलें अन्न भक्षण करण्याकरितां इकडे घेऊन ये ! ॥ १७८ ॥

### मणि १७९ वा.

अश्विसरस्वतींद्र—ऋषि, लिंगोक्त—देवता, अतिजगति—छंद.

अन्नात्परिस्रुतो रसं ब्रह्मणा व्यपिबत्क्षत्रं पयः सोमं प्रजापतिः । ऋतेन सत्यमिन्द्रियं विपानꣳ शुक्रमन्धस इन्द्रस्येन्द्रियमिदं पयोऽमृतं मधु ॥ १९—७५ ॥

**अर्थः**— प्रजापति हा गाळलेल्या अन्नापासून तयार झालेला रस गायत्री स्तोत्रानें पान करता झाला. क्षत्रियांना वश करता झाला. दूध आणि सोम यांचेंही त्यानें प्राशन केलें. या सत्यानें मला हें सत्य समजलें कीं सोमपान हें पवित्र असून वीर्यप्रद आहे. त्याचप्रमाणें हें दूध झालें तरी इंद्राला वीर्यप्रद, आजरामरत्वप्रद आणि मधुर असें होवो ! ॥ १७९ ॥

### मणि १८० वा.

अश्विसरस्वतींद्र—ऋषि, लिंगोक्त—देवता, अतिशक्करी—छंद.

रेतो मूत्रं विजहाति योनिं प्रविशदिन्द्रियम् । गर्भो जरायुणावृत उल्बं जहाति जन्मना । ऋतेन सत्यमिन्द्रियं विपानꣳ शुक्रमन्धस इन्द्रस्येन्द्रियमिदं पयोऽमृतं मधु ॥ १९—७६ ॥

अर्थः- पुरुषाचें इन्द्रिय स्त्रीच्या योनींत प्रवेशिलें म्हणजे वीर्याचें विसर्जन करितें आणि अन्यत्र मूत्राचें विसर्जन करितें. जरायूनें वेष्टिलेला गर्भ जन्मल्या-बरोबर जरायूचा त्याग करतो. या सत्यानें मला हें सत्य समजलें की सोमपान हें पवित्र व वीर्यप्रद आहे. त्याचप्रमाणें हें दूध झालें तरी इंद्राला वीर्यप्रद, जरामृत्यु-निवारक व मधुर असें होवो. ॥ १८० ॥

### मणि १८१ वा.

प्रजापति-अश्वि-सरस्वती-ऋषि, लिंगोक्त-देवता, बृहती-गायत्री-छंद.

देवस्यं त्वा सवितुः प्रसुवेऽश्विनोर्बाहुभ्यां पूष्णो हस्तांभ्याम् । अश्विनोर्भैषंज्येन तेजंसे ब्रह्मवर्चसायाभिषिञ्चामि सरस्वत्यै भैषंज्येन वीर्यायान्नाद्यायाभिषिञ्चामीन्द्रंस्येन्द्रियेण बलाय श्रियै यशसेऽभिषिञ्चामि ॥ २०-३ ॥

अर्थः- हे यजमाना ! जगत्प्रेरक सविता देवाच्या अनुज्ञेवरून अश्विनीच्या बाहूंनीं व पुरुषाच्या हस्तांनीं तुला सौंदर्य, व ब्रह्मवर्चस हीं प्राप्त व्हावीत म्हणून मी तुला अश्विनीकुमाराच्या कुशल वैद्यकर्मानें अभिषेक करितों. तुला वीर्य व भोजनसामर्थ्य प्राप्त व्हावें म्हणून सरस्वतीच्या भिषक्कर्मानें अभिषेक करितों. तसेंच तुला शरीरसामर्थ्य, अखंड ऐश्वर्य, दिगंत कीर्ति यांचा लाभ व्हावा एतदर्थ मी तुला इंद्राच्या अमोघ शक्तीनें अभिषेक करितों ! ॥ १८१ ॥

### मणि १८२ वा.

प्रजापति-अश्वि-सरस्वती-ऋषि, इंद्रशरीरावयव-देवता, अनुष्टुप्-छंद.

शिरों मे श्रीर्यशो मुखं त्विषिः केशांश्च श्मश्रूणि । राजां मे प्राणो अमृतꣳ सम्राट् चक्षुर्विराट् श्रोत्रम् ॥ २०-५ ॥

अर्थः- माझें मस्तक शोभासंपन्न असो ! माझें मुख यशोरूप असो ! केश व मिशा कांतियुक्त असोत ! डोळे तेजःपुंज असोत ! कान विविधप्रकारें शोभणारे असे असोत ! ॥ १८२ ॥

### मणि १८३ वा.

प्रजापति–अश्वि–सरस्वती–ऋषि, इंद्रशरीरावयव–देवता, अनुष्टुप्–छंद.

जिव्हा मे भद्रं वाङ्महो मनो मन्युः स्वराड्भार्मः। मोदाः प्रमोदा अङ्गुलीरङ्गानि मित्रं मे सहः ॥ २०–६ ॥

अर्थः– माझी जिव्हा कल्याणरूप असो ! माझी वाणी लोकमान्य असो ! माझें मन क्रोधफलदायी असो ! माझा राग स्वराज्यक्षम असो ! माझीं बोटें आनंदरूप असोत। माझे अवयव हर्षयुक्त असोत ! माझा मित्र रिपुनाशक असो ! ॥ १८३ ॥

### मणि १८४ वा.

प्रजापति–अश्वि–सरस्वती–ऋषि, इंद्रशरीरावयव–देवता, गायत्री–छंद.

बाहू मे बलमिन्द्रियꣳ हस्तौ मे कर्म वीर्यम्। आत्मा क्षत्रमुरो मम ॥ २०–७ ॥

अर्थः– माझे बाहू सामर्थ्यसंपन्न व स्वकार्यक्षम असे असोत। माझे हात कर्मकुशल व शौर्यशाली असोत। माझा आत्मा व माझी छाति हीं संकटातून निभावून नेण्यासारखीं धैर्यशाली असोत ! ॥ १८४ ॥

### मणि १८५ वा.

प्रजापति–अश्वि–सरस्वती–ऋषि, इंद्रशरीरावयव–देवता, अनुष्टुप्–छंद.

पृष्टिर्मे राष्ट्रमुदरमꣳसौ ग्रीवाश्च श्रोणी। ऊरू अरत्नी जानुनी विशो मेऽङ्गानि सर्वतः ॥ २०–८ ॥

अर्थः– माझा पृष्टप्रदेश राष्ट्राप्रमाणें सर्वाधार असो ! माझें पोट, स्कंध, कंठ-प्रदेश, कटिभाग, छाति, मनगट, मांड्या व इतर सर्व अवयव हे प्रजेप्रमाणें पोषणीय असोत ॥ १८५ ॥

### मणि १८६ वा.

प्रजापति–अश्वि–सरस्वती–ऋषि, इंद्रशरीरावयव–देवता, महापंक्ति–छंद.

नाभिर्मे चित्तं विज्ञानं पायुर्मेऽपचितिर्भसत्। आनन्दनन्दावाण्डौ मे भगः सौभाग्यं पसः। जङ्घाभ्यां पद्भ्यां धर्मोऽस्मि विशि राजा प्रतिष्ठितः ॥ २०–९ ॥

अर्थः—माझी नाभि ज्ञानरूप असो ! माझें गुदेंद्रिय विज्ञानरूप असो ! माझ्या पत्नीचें जननेंद्रिय प्रजारूप असो ! माझे वृषण संभोगसुखभागी असो ! माझें शिश्न सौभाग्यसंपन्न असो ! मांड्यांनीं व पायांनीं अर्थात् सर्व इंद्रियादिकांनी मी धर्मरूप बनलों आहें ! आणि अभिषेकप्रयुक्त मी धर्मरूप झालों असल्यामुळें प्रजेंत मी राजा होऊन बसलों आहें ! ! ॥ १८६ ॥

## मणि १८७ वा.

प्रजापति–अश्वि–सरस्वती–ऋषि, विश्वेदेव–देवता, अतिशक्करी–छंद.

प्रति॑ क्ष॒त्रे प्रति॑तिष्ठामि रा॒ष्ट्रे प्र॒त्यश्वे॑षु प्र॒ति॑तिष्ठामि॒ गोषु॑ । प्रत्य-ङ्गे॑षु प्रति॑तिष्ठाम्या॒त्मन्प्रति॑ प्रा॒णेषु॒ प्र॒ति॑तिष्ठामि पु॒ष्टे प्रति॒ द्यावा॑ पृथि॒व्योः प्रति॑तिष्ठामि य॒ज्ञे ॥ २०–१० ॥

अर्थः— मी क्षत्रियामध्यें व राष्ट्रामध्यें प्रतिष्ठावंत होईन ! ( म्हणजे त्यांना वश करून ठेवीन ) घोडे व गाई यांमध्यें प्रतिष्ठावंत होईन ! ( म्हणजे त्यांची प्राप्ति करून घेईन ) चित्त व प्राण यांमध्यें प्रतिष्ठावंत होईन ! ( म्हणजे निरोगी होईन ) आत्म्यामध्यें प्रतिष्ठावंत होईन ! पुष्टीमध्यें प्रतिष्ठावंत होईन ! ( म्हणजे धनसमृद्धि मिळवीन. ) द्यावा पृथ्वीमध्यें प्रतिष्ठावंत होईन ! ( म्हणजे उभयलोकीं कीर्ति संपादन करीन ) आणि यज्ञांत प्रतिष्ठावंत होईन ! ( म्हणजे यज्ञकर्ता होईन ) ॥ १८७ ॥

## मणि १८८ वा.

प्रजापति–अश्वि–सरस्वती–ऋषि, अग्नि–देवता, अनुष्टुप्–छंद.

यद्दे॑वा देव॒हेड॑नं॒ देवा॑सश्चकृ॒मा व॒यम् । अ॒ग्निर्मा॒ तस्मा॒देन॑सो॒ विश्वा॑-न्मुञ्च॒त्वꣳ ह॑सः ॥ २०–१४ ॥

अर्थः— अहो देवास देवानो ! आम्ही जो देवाचा अपराध केला असेल त्या अपराधाच्या दोषापासून व सर्व संकटापासून अग्निदेव आम्हांस मुक्त करो ! ॥ १८८ ॥

## मणि १८९ वा.

प्रजापति–अश्वि–सरस्वती–ऋषि, वायु–देवता, अनुष्टुप्–छंद.

यदि॒ दिवा॒ यदि॒ नक्त॒मेना॑ꣳसि चकृ॒मा व॒यम् । वा॒युर्मा॒ तस्मा॒-देन॑सो॒ विश्वा॑न्मुञ्च॒त्वꣳह॑सः ॥ २०–१५ ॥

अर्थः- सर्व लोकांना हितकारक असा हा सूर्यदेव सुंदर प्रार्थनांनी युक्त अशा आमच्या सुंदर यज्ञमंदिरात प्रवेश करो! अहो तरुण देवानों! येथें आल्यावेळीं आमच्या यज्ञगृहात जसे तुम्ही सात्रीनें तृप्त होता तसेंच तुम्हीही पण आमच्या पुत्रगणादिकांना बुद्धि व अन्न देऊन खूष करा! ॥ २६७॥

### मणि २६८ वा.

श्रुतकक्ष सुकक्ष-ऋषि, सूर्य-देवता, गायत्री-छंद.

यदुद्य कच्चं वृत्रहन्नुदगां अभि सूर्य । सर्वं तदिन्द्र ते वशे ॥ ॥ ३३-३५ ॥

अर्थः- हे वृत्रमर्दना! हे सूर्यनारायणा! हे भगवन्! आज ज्या ज्या ठिकाणीं तूं उदय पावशील तथें तेथें सर्व प्राणिमात्र तुला कसें अगदीं वश होऊन राहतील! ॥ २६८ ॥

### मणि २६९ वा.

प्रस्कण्व-ऋषि, सूर्य-देवता, गायत्री-छंद.

तरणिर्विश्वदर्शतो ज्योतिष्कृदसि सूर्य । विश्वमाभासि रोचनम् ॥ ॥ ३३-३६ ॥

अर्थः-हे सूर्यदेवा! तू आकाशमार्गाचें अतिक्रमण करणारा आहेस! तूं त्रैलोक्यसुंदर आहेस! प्रकाशाचा जनक आहेस! आणि प्रकाशमान अग्नि, विद्युत, नक्षत्र, ग्रह, तारका या सर्वांना प्रकाश देणाराही पण तूच आहेस! ॥ २६९ ॥

### मणि २७० वा

कुत्स-ऋषि, सूर्य-देवता, त्रिष्टुप्-छंद.

तत्सूर्यस्य देवत्वं तन्महित्वं मध्या कर्तोर्विततं सं जभार । यदेद-युक्त हरितः सधस्थादाद्रात्री वासस्तनुते सिमस्मै ॥ ३३-३७ ॥

अर्थः-सूर्यदेवाचें देवपण व मोठेपण तें हेंच कीं, त्रैलोक्यामध्यें दिवसा आपण स्वतः पसरलेले किरणजाल तो स्वतःच आपल्यामध्यें आकर्षून घेतो आणि जेव्हां तो सुवर्णवर्णाचे किरण आकाशमंडळांतून आपल्यामध्यें आकर्षून घेतो तेव्हांच रात्र ही सर्व जगावर आपला अंधकार पसरिते! ॥ २७० ॥

मणि २७१ वा.

कुत्स–ऋषि, सूर्य–देवता, त्रिष्टुप्–छंद.

तन्मित्रस्य वरुणस्याभिचक्षे सूर्यो रूपं कृणुते द्योरुपस्थे । अनन्तमन्यद्रुशदस्य पाजः कृष्णमन्यद्धरितः संभरन्ति ॥ ३३–३८ ॥

**अर्थ.**– सूर्यदेव हा स्वर्गावरून जे पुण्यवान आहेत त्यांजवर मित्रदृष्टि धारण करून अनुग्रह करितो आणि जे पापी आहेत त्याजवर वरुणदृष्टि धारण करून त्याचा निग्रह करितो. या सूर्यदेवाचें अद्वैत असें एक रूप असुन तें देशकालावच्छेदरहित व तेजःपुंज असें आहे. त्याचें दुसरें आणखी एक रूप असून तें सगुण असल्यामुळें इंद्रियें त्यास ग्रहण करू शकतात. ॥ २७१ ॥

मणि २७२ वा

जमदग्नि–ऋषि, सूर्य–देवता, बृहती–छंद

बण्महाँ२॥ असि सूर्य बडादित्य महाँ२॥ असि । महस्ते सतो महिमा पनस्यतेऽद्धा देव महाँ२॥ असि ॥ ३३–३९ ॥

**अर्थ** – हे जगाला प्रेरणा करणाऱ्या सूर्यदेवा ! तू केवढा भाग्यवान् आहेस म्हणून सांगू ! हे प्रकाश देणाऱ्या आदित्यदेवा ! धन्य धन्य आहे तुझ्या मोठेपणाची ! श्रेष्ठ व नित्य असा जो तू त्या तुझ्या महिमेची कीर्ति लोक न गातील तर काय करतील ! हे देवा ! सर्वांत तूंच केवढा या साऱ्या त्रिभुवनांत मोठा भाग्यवान् आहेस । ॥ २७२ ॥

मणि २७३ वा.

जमदग्नि–ऋषि, सूर्य–देवता, सतोबृहती–छंद.

बट्सूर्य श्रवसा महाँ२ ॥ असि सत्रा देव महाँ२॥असि । मन्हा देवानामसुर्यः पुरोहितो विभु ज्योतिरदाभ्यम् ॥ ३३–४० ॥

अर्थः– हे सूर्यनारायणा ! काय तुझें ऐश्वर्य ! आणि केवढा तुझा थोरपणा ! हे देवा ! सकल जीवमात्राला तू अगदीं हितकारक आहेस ! सर्व कार्यांमध्यें अगदीं प्रमुख आहेस ! विश्वामध्यें अणुरेणूतहि तू भरून राहिला आहेस ! सर्वांना अजिंक्य आहेस ! तू विज्ञानघन आहेस ! आनंदस्वरूप आहेस ! एवढेंच नव्हे, तर हे देवा ! योग्यतेनेंही सर्व देवांमध्यें तू खरोखर श्रेष्ठ असाच आहेस ।॥२७३॥

### मणि २७४ वा

नृमेध–ऋषि, सूर्य–देवता, बृहती–छंद.

श्रायन्त इव सूर्यं विश्वेदिन्द्रस्य भक्षत । वसूनि जाते जनमान ओजसा प्रति भागं न दीधिम ॥ ३३–४१ ॥

**अर्थः**– सूर्यदेवाच्या आश्रयानें राहणारे असे किरणदेव इंद्राची सर्व संपत्ति सर्व प्राण्यांना विभागून देतात आम्ही हल्ली जन्मलेल्या व पुढें जन्मणाऱ्या आमच्या पुत्रपौत्रादिकांसाठीं ती तेजस्वी संपत्ति यथाभाग धारण करूं ॥२७४॥

### मणि २७५ वा

कुत्स–ऋषि, सूर्य–देवता, त्रिष्टुप्–छंद.

अद्या देवा उदिता सूर्यस्य निरंहसः पिपृता निरवद्यात् । तन्नो मित्रो वरुणो मामहन्तामदितिः सिन्धुः पृथिवी उत द्यौः ॥३३–४२॥

**अर्थ**.– अहो किरणदेवहो ! आज सूर्योदयकाळीं आम्हांस सर्व पापापासून आणि सव दुर्लौकिकापासून तुम्ही मुक्त करा । मित्र, वरुण, अदिति, समुद्र, पृथ्वि व स्वर्ग आमची ही प्रार्थना मान्य करोत । ॥ २७५ ॥

### मणि २७६ वा

हिरण्यस्तूप–ऋषि, सूर्य–देवता, त्रिष्टुप्–छंद

आ कृष्णेन रजसा वर्तमानो निवेशयन्नमृतं मर्त्यं च । हिरण्ययेन सविता रथेना देवो याति भुवनानि पश्यन् ॥ ३३–४३ ॥

**अर्थ**– अधकारमय रजनीस बरोबर घेऊन पुनः पुन भ्रमण करीत, देव आणि मनुष्य यांना त्याच्या त्याच्या प्रदेशावर स्थिर करीत, कोण पुण्य करितात व कोण पाप करितात याचा छडा घेत भगवान् सूर्यदेव हा सुवर्णाच्या रथात बसून नित्य उदय पावत असतो ॥ २७६ ॥

### मणि २७७ वा

प्रगाथ–ऋषि, विश्वेदेव–देवता, त्रिष्टुप्–छंद

अस्मे रुद्रा मेहना पर्वतासो वृत्रहत्ये भरहूतौ सजोषाः । यः शंसते स्तुवते धायि पज्र इन्द्रज्येष्ठा अस्माँ२॥ अवन्तु देवाः ॥ ३३–५० ॥

**अर्थः**– आम्हावर ऐश्वर्याचा वर्षाव करणारे, शत्रूला रडविणारे, उत्तमनिच, वृत्रासुराचा वध करण्याकरिता पुकारलेल्या लढाईत एकमतानें झुंजणारे, इंद्र हा ज्यांचा पुढारी आहे, असे ते दिव्यविबुध शस्त्रास्त्रांची प्रशंसा करणारे, स्तोत्र गाणारे, पुष्कळ संपत्ति मिळविल्यामुळें देवांना हविर्भाग देणारे असे जे आम्ही त्या आमचें सर्वप्रकारें रक्षण करोत। २७७ ॥

### मणि २७८ वा

सुहोत्र–ऋषि, विश्वेदेव–देवता, त्रिष्टुप्–छंद

विश्वेदेवा: शृणुतेम॰ हवं मे ये अन्तरिक्षे य उप द्यविष्ठ। ये अग्नि-जिव्हा उत वा यजत्रा आसद्यास्मिन्बर्हिषि मादयध्वम् ॥३३–५३॥

**अर्थ** – अहो विश्वेदेवांनों। जे तुम्ही अंतरिक्षामध्यें आहा, तसेच स्वर्गलोकांमध्यें आहा, अग्नि हा ज्यांच्या मुखस्थानीं आहे, आणि जे तुम्ही अत्यंत पूजनीय असे आहा, असे ते सर्व तुम्ही माझी विनंति ऐका कृपा करून या दर्भासनावर बसा आणि आमची सेवा गोड मानून तृप्त व्हा। ॥ २७८ ॥

### मणि २७९ वा

वामदेव–ऋषि, सविता–देवता, जगती–छंद.

देवेभ्यो हि प्रथमं यज्ञियेभ्योऽमृतत्व॰सुवसि भागमुत्तमम्। आदिद्दामानं॰सवितर्व्यूर्णुषेऽनूचीना जीविता मानुषेभ्यः ॥३३–५४॥

**अर्थ**.– हे सूर्यनारायणा। उदयकालीं यज्ञार्ह देवांकरितां तू अमृतपद व उत्तमोत्तम असा अग्निहोमरूप भाग पाठवितोस त्यानंतर देदीप्यमान असे तुझे किरण सर्व जगभर पसरतोस आणि मग मनुष्यासाठीं दिवसा करावयाच्या लौकिकव्यवहाराचा विस्तार करितोस ॥ २७९ ॥

### मणि २८० वा.

विश्वामित्र–ऋषि, वैश्वानर–देवता, त्रिष्टुप्–छंद

नहि स्पशमविदन्नन्यमस्माद्वैश्वानरात्पुरएतारमग्नेः। एमेनमवृधन्नमृता अमर्त्यं वैश्वानरं क्षैत्रजित्याय देवाः ॥ ३३–६० ॥

**अर्थ**–सर्व प्राणिमात्राचा हितकर असा जो अग्निदेव त्या अग्निदेवाशिवाय दुसरा एखादा दूत अथवा पुढारी असा देवांना कोणीही मिळाला नाहीं म्हणून

ऱ्या अमर देवांनीं या अमर वैश्वानर अग्निदेवाला, यजमानाला जमीनजुमलादि वैभव प्राप्त करून देण्यासाठीं संवर्धन केलें. ॥ २८० ॥

### मणि २८१ वा.

शिवसंकल्प–ऋषि, मन–देवता, त्रिष्टुप्–छंद.

यज्जाग्रतो दूरमुदैति दैवं तदु सुप्तस्य तथैवैति । दूरङ्गमं ज्योतिषां ज्योतिरेकं तन्मे मनः शिवसंकल्पमस्तु ॥ ३४–१ ॥

**अर्थः**–जें मन जागृतावस्थेत बाहेर दिशेकडे दूर जाऊं शकतें, जें आत्मस्वरूप ओळखण्यास समर्थ आहे, जें दूर गेलेलें मन पुरुष निद्रावश झाला म्हणजे जसें गेलें तसें पुन: परत येतें, जें भूतभविष्यवर्तमान काळांतील दूर व गूढ पदार्थांस जाणू शकतें, जें चक्षुरादि इंद्रियांचें प्रेरक असें एकच एक आहे, असें तें माझें मन मंगल विचारांत मग्न असो ॥ २८१ ॥

### मणि २८२ वा

शिवसंकल्प–ऋषि, मन–देवता, त्रिष्टुप्–छंद

येन कर्माण्यपसो मनीषिणो यज्ञे कृण्वन्ति विदथेषु धीराः । यदपूर्वं यक्षमन्तः प्रजानां तन्मे मनः शिवसंकल्पमस्तु ॥३४–२॥

**अर्थ**–कर्मनिष्ठ, बुद्धिमान्, ज्ञानी असे जे लोक आहेत ते ज्याच्या सहायानें यज्ञामध्यें यथाविधि कर्म करितात, जें सर्व इंद्रियांच्या अगोदर उत्पन्न झालें, जें कर्म करण्यास समर्थ आहे, जें प्राणिमात्राच्या अन्तर्यामी असतें; असें तें माझें मन मंगल विचारांत सदैव मग्न असो ! ॥ २८२ ॥

### मणि २८३ वा

शिवसंकल्प–ऋषि मन–देवता, त्रिष्टुप्–छंद

यत्प्रज्ञानमुत चेतो धृतिश्च यज्ज्योतिरन्तरमृतं प्रजासु । यस्मान्न ऋते किंचन कर्म क्रियते तन्मे मनः शिवसंकल्पमस्तु ॥ ३४–३ ॥

**अर्थ** – जें परमार्थज्ञानजनक आहे, जें व्यवहारज्ञानजनक आहे, जें धैर्यरूप आहे, जें शरीरांत राहून सर्व इंद्रियांस प्रकाश देत असतें, जें अमर, व ज्याच्या मदतीवांचून कोणतीही क्रिया केली जात नाहीं असें तें माझें मन मंगल विचारांत सतत मग्न असो ! ॥ २८३ ॥

### माणि २८४ वा

शिवसंकल्प–ऋषि, मन–देवता, त्रिष्टुप्–छंद.

येनेदं भूतं भुवनं भविष्यत्परिगृहीतममृतेन सर्वम् । येन यज्ञस्तायते सप्त होता तन्मे मनः शिवसंकल्पमस्तु ॥ ३४–४ ॥

अर्थः– ज्या अविनाशी मनानें भूतभविष्यवर्तमान कालीन सर्व वस्तुजाताला ओळखिलें आहे, व ज्याच्या सहायानें मैत्रावरुणादि सात होत्यानीं–युक्त असा अग्निष्टोमासारखा यज्ञ अनुष्ठिला जातो, असें तें माझें मन मंगल विचारात सदैव मग्न असो ! ॥ २८४ ॥

### माणि २८५ वा

शिवसंकल्प–ऋषि, मन–देवता, त्रिष्टुप्–छंद.

यस्मिन्नृचः साम यजूंषि यस्मिन्प्रतिष्ठिता रथनाभाविवाराः । यस्मिंश्चित्तं सर्वमोतं प्रजानां तन्मे मनः शिवसंकल्पमस्तु ॥ ३४–५ ॥

अर्थः– रथचक्राच्या तुब्यामध्यें ज्याप्रमाणें आरा बसविलेल्या असतात, त्याप्रमाणें ज्या मनामध्यें ऋचा, साम व यजु हीं बसविलेलीं आहेत व ज्या मनामध्यें प्राणिमात्राचें सर्व ज्ञान ओतप्रोत भरलेलें आहे असें तें माझें मन सतत शांतव्यापारयुक्त असो ! ॥ २८५ ॥

### माणि २८६ वा

शिवसंकल्प–ऋषि, मन–देवता, त्रिष्टुप्–छंद.

सुषारथिरश्वानिव यन्मनुष्यान्नेनीयतेऽभीशुभिर्वाजिन इव । हृत्प्रतिष्ठं यदजिरं जविष्ठं तन्मे मनः शिवसंकल्पमस्तु ॥ ३४–६ ॥

अर्थः– शहाणा सारथी ज्याप्रमाणें घोड्यास वाट दाखवितो अथवा लगामानें त्याचें नियमन करितो त्याप्रमाणें जें मन मनुष्य मात्रांना सन्मार्ग दाखवितें, जें प्राणिमात्राच्या हृदयांत राहतें, जें जरारहित आहे आणि जें अत्यंत वेगवान् आहे असें तें माझें मन शांतव्यापारयुक्त असो ! ॥ २८६ ॥

### मणि २८७ वा.

अगस्त्यऋषि, अन्न–देवता, उष्णिक्–छंद.

पितुं नु स्तोषं महो धर्माणं तविषीम् । यस्य त्रितो व्योजसा वृत्रं विपर्वमर्दयत् ॥ ३४–७ ॥

अर्थः– ज्या अन्नाच्या प्रभावानें इंद्र हा वृत्रासुरासारख्या प्रबल शत्रूला तीन ठिकाणी छिन्न विच्छिन्न करून ठार मारता झाला अशा त्या महाप्रभावशाली अन्नाचें मी स्तवन करितों. ॥ २८७ ॥

### मणि २८८ वा.

गृत्समद–ऋषि, सरस्वती नदी–देवता, अनुष्टुप्–छंद.

पञ्च नद्यः सरस्वतीमपि यन्ति सस्रोतसः । सरस्वती तु पञ्चधा सो देशेऽभवत्सरित् ॥ ३४–११ ॥

अर्थः–सारख्याच प्रवाहाच्या दृषद्वती शतद्रू चंद्रभागादि पाच नद्या सरस्वती नदीस जाऊन मिळतात, म्हणजे ती सरस्वतीच पाच प्रकारानीं देशावर नदी होऊन वाहती झाली। अर्थात् या पाचही नद्या आपापलें नाव सोडून पुढें सरस्वतीच झाल्या. ॥ २८८ ॥

### मणि २८९ वा

हिरण्यस्तूप–ऋषि, अग्नि–देवता, जगती–छंद.

त्वं नो अग्ने तव देव पायुभिर्मघोनो रक्ष तन्वश्च वन्द्य । त्राता तोकस्य तनये गवामस्यनिमेषं रक्षमाणस्तव व्रते ॥ ३४–१२ ॥

अर्थः– हे अग्निदेवा, तुझ्या अनुष्ठानांत मग्न असणाऱ्या आमच्या धनिक यजमानांचें तूं आपल्या सरक्षणशक्तींनीं रक्षण कर। आमच्या शरीराचें रक्षण कर। हे वद्या, तूं सावधान राहून भक्तांचें रक्षण करणारा आहेस, तर हे देवा, तूं आमच्या मुलाचें, नातवाचें आणि गवादि पशूंचें रक्षण कर। ॥ २८९ ॥

### मणि २९० वा.

भारद्वाजदुहिता कशिपा–ऋषि, रात्रि–देवता, पथ्याबृहती–छंद.

आ रात्रि पार्थिवꣳ रजः पितुरप्रायि धामभिः । दिवः सदाꣳसि बृहती वितिष्ठस आ त्वेषं वर्तते तमः ॥ ३४–३२ ॥

अर्थः– हे रात्रिदेवते ! हा पृथ्वीलोक व मध्यलोक या दोनही लोकांस तूं व्यापून सोडतेस, तशीच तूं फार विशाल असल्यामुळें द्युलोकांतील प्रदेशही तूं आक्रमून सोडतेस. तुझा घनदाट अंधःकार पुनः पुनः पृथिवीवर परत येतो. अशा प्रकारची जी तू त्या तुझी आम्ही स्तुति करितों. ॥ २९० ॥

### मणि २९१ वा.

गोतम–ऋषि, उषा–देवता, पुरोष्णिक्–छंद.

उपस्तच्चित्रमाभरास्मभ्यं वाजिनीवति । येन तोकं च तनयं च धामहे ॥ ३४–३३ ॥

अर्थः– हे उषादेवते ! हे अन्नवते ! एवढी कृपा करकीं आम्हांस लोकविश्रुत असें महनीय धन आणून दे ! म्हणजे त्या धनाच्या सहायानें आम्ही पुत्रपौत्रादि आमच्या सर्व संतानवर्गाचें संरक्षण करूं. ॥ २९१ ॥

### मणि २९२ वा.

वसिष्ठ–ऋषि, बहु–देवता, जगती–छंद.

प्रातरग्निं प्रातरिन्द्रꣳ हवामहे प्रातर्मित्रावरुणा प्रातरश्विना । प्रातर्भगं पूषणं ब्रह्मणस्पतिं प्रातः सोममुत रुद्रꣳ हुवेम ॥ ३४–३४ ॥

अर्थः– देवाचे स्तुतिपाठक असे आम्ही नित्य प्रातःकाळीं अग्निदेवाची प्रार्थना करितों. त्याचप्रमाणें इंद्र, इंद्रावरुण, अश्विनौ, भग, पूषा, सोम व रुद्र या देवांचेंही स्तुतिस्तोत्र गात असतों. ॥ २९२ ॥

### मणि २९३ वा.

वसिष्ठ–ऋषि, भग–देवता, त्रिष्टुप्–छंद.

प्रातर्जितं भगमुग्रꣳहुवेम वयं पुत्रमदितेर्यो विधर्ता । आध्रश्चिद्यं मन्यमानस्तुरश्चिद्राजा चिद्यं भगं भक्षीत्याह ॥ ३४–३५ ॥

**अर्थः**– जो जगाचें धारण करणारा आहे, जो नित्य प्रातःकाळी त्रैलोक्यावर विजय मिळवितो, जो सर्वोत्तम अशा त्या अदितिपुत्र भग देवाची आम्ही नित्य उपासना करितों. दरिद्री त्याची उपासना करून त्यास 'हे देवा! उदय हो!' अशी प्रार्थना करितो. रोगी आपणास आराम वाटावा म्हणून त्याची उपासना करून त्यास 'हे देवा! लवकर उदय हो!' अशी प्रार्थना करितो. राजाही आपल्या इष्टप्राप्तीसाठी त्याचें पूजन करून त्यास लवकर उदय होण्यासाठीं विनंति करितो. ॥ २९३ ॥

## मणि २९४ वा.

वसिष्ठ–ऋषि, भग–देवता, त्रिष्टुप्–छंद.

भग॒ प्रणे॑तर्भग॒ सत्य॑राधो॒ भगे॒मां धिय॒मुद॑वा॒दद॑न्नः । भग॒ प्र णो॑ जनय॒ गोभि॒रश्वै॒र्भग॒ प्र नृभि॑र्नृ॒वन्तः॑ स्याम ॥ ३३–३६ ॥

**अर्थः**– हे भगदेवा! हे उदार पुरुषा! हे अखंड ऐश्वर्यवता! तूं ज्ञानदाता आहेस. अतएव आमच्या या बुद्धीला तूं वृद्धिंगत कर! देवा! आम्हास पुष्कळ गाईघोडे देऊन आमची भरभराट कर! आणि तुझ्या कृपाप्रसादानें आम्ही पुत्रपौत्रादिकांनीं सुप्रजावंत होऊं! ॥ २९४ ॥

## मणि २९५ वा.

वसिष्ठ–ऋषि, भग–देवता, त्रिष्टुप्–छंद

उ॒तेदानीं॒ भग॑वन्तः स्यामो॒त प्र॑पि॒त्व उ॒त मध्ये॒ अह्ना॑म् । उ॒तोदि॑ता मघव॒न्सूर्य॑स्य व॒यं दे॒वाना॑ᳯ सुम॒तौ स्या॑म ॥ ३४–३७ ॥

**अर्थः**– हे ऐश्वर्यसंपन्न सूर्यदेवा! तुझ्या अनुग्रहानें आज रोजीं आम्ही मोठे भाग्यवान् होऊं! त्याचप्रमाणें अस्तसमयीं, मध्यान्हसमयीं आणि उदयसमयीं, अर्थात् सदासर्वकाळ आम्ही धनसंपन्न होऊन असूं! आणि हे देवा, तुझ्या कृपेमुळें आम्ही सर्व देवांच्या मर्जीत राहूं असेंही पण घडो! ॥ २९५ ॥

## मणि २९६ वा.

वसिष्ठ–ऋषि, भग–देवता, त्रिष्टुप्–छंद.

भग॑ ए॒व भग॑वाँ२॥ अस्तु देवा॒स्तेन॑ व॒यं भग॑वन्तः स्याम । तं त्वा॑ भग॒ सर्व॒ इज्जो॑हवीति॒ स नो॑ भग पुर॒एता भ॑वे॒ह ॥ ३४–३८ ॥

अर्थः- अहो इंद्रादि देवांनो ! सूर्य देव तेवढाच भाग्यवान् असो ! त्या देवानें दिलेल्या ऐश्वर्यानें आम्ही मोठे भाग्यवान् होऊं ! हे सूर्यनारायणा ! सर्व लोक-आपआपल्या इष्टप्राप्तीसाठीं त्रैलोक्यप्रसिद्ध अशा तुझी भक्तिपूर्वक प्रार्थना करि-तात. हे अदितिपुत्रा ! तूं या यज्ञकार्यांत आमचा पुढारी हो. ॥ २९६ ॥

### मणि २९७ वा.

वसिष्ठ–ऋषि, भग–देवता, त्रिष्टुप्–छंद.

सम॑ध्वरायो॒षसो॑ऽनमन्त दधि॒क्रावे॑व॒ शुच॑ये प॒दाय॑ । अ॒र्वा॒ची॒नं व॑सु॒विदं॒ भगं॑ नो॒ रथ॑मि॒वाश्वा॑ वा॒जिन॒ आ व॑हन्तु ॥ ३४–३९ ॥

अर्थः- ज्याप्रमाणें दधिक्रावा घोडा शुद्ध स्थानाकडे जातो तद्वत् उषा देवता आमच्या यज्ञमंडपाकडे येण्यास सिद्ध होवोत. ज्याप्रमाणें वेगवान् घोडे रथाला दौडत घेऊन येतात त्याप्रमाणें त्या उषादेवता ऐश्वर्यसंपन्न अशा सूर्यदेवाला आम्हाकडे अभिमुख घेवून येवोत ! ॥ २९७ ॥

### मणि २९८ वा.

वसिष्ठ–ऋषि, उषा–देवता, त्रिष्टुप्–छंद.

अश्वा॑वती॒र्गोम॑तीर्न उ॒षासो॑ वी॒रव॑तीः॒ सद॑मुच्छन्तु भ॒द्राः । घृ॒तं दुहा॑ना वि॒श्वतः॒ प्रपी॑ता यू॒यं पा॑त स्व॒स्तिभिः॒ सदा॑ नः ॥३४–४०॥

अर्थः-ज्या अश्वसंपन्न, गोसंपन्न, वीरसंपन्न आहेत, ज्या मंगलस्वरूप आहेत, ज्या जलवर्षाव करणाऱ्या आहेत, ज्या धर्म-अर्थ-काम यांनी सर्वथैव सुसंपन्न आहेत अशा त्या उषादेवता सदैव आम्हास अज्ञानपाशातून मुक्त करोत ! हे उषादेवतांनो ! शुभआशिर्वचनांनीं तुम्ही सदैव आमचें रक्षण करा ! ॥ २९८ ॥

### मणि २९९ वा.

मेधातिथि–ऋषि, विष्णु–देवता, गायत्री–छंद.

त्रीणि॑ प॒दा वि च॑क्रमे॒ विष्णु॑र्गो॒पा अदा॑भ्यः । अतो॒ धर्मा॑णि धा॒रय॑न् ॥ ३४–४३ ॥

अर्थः- सर्व जगाचें रक्षण करणारा, व दुर्दम्य असलेले विष्णुदेव त्या विष्णु-देवानें अग्नि, वायु व आदित्य हीं तीन स्थानें व्यापून टाकलीं. या तीन पदा-पासून तो सर्व पुण्यकर्मांचें धारण करितो. ॥ २९९ ॥

### माणि ३०० वा.

मेधातिथि–ऋषि, विष्णु–देवता, गायत्री–छंद.

तद्विप्रासो विपन्यवो जागृवांसः समिन्धते । विष्णोर्यत्परमं पदम् ॥ ३४–४४ ॥

अर्थः– लोकविश्रुत अशा त्या यज्ञपुरुषाचें जें श्रेष्ठ स्थान, त्याचें शाहणे व कर्तव्यतत्पर असे ब्राह्मण उपासनेच्या योगानें संदीपन करीत असतात. ॥ ३०० ॥

### मणि ३०१ ला.

प्रजापति–ऋषि, यज्ञ–देवता, त्रिष्टुप्–छंद.

सहस्तोमाः सहच्छन्दस आवृतः सहप्रमा ऋषयः सप्त दैव्याः । पूर्वेषां पन्थामनुदृश्य धीरा अन्वालेभिरे रथ्यो न रश्मीन् ॥३४–४९॥

अर्थः– यज्ञसहित, छंदसहित, कर्मनिष्ठ शब्दादिप्रमाणपरीक्षणतत्पर, बुद्धिमान, प्रजापतिदेवाचे अभिमानी असे भारद्वाज–व, कश्यपप्रभृति सात ऋषि, पूर्वकल्पांतील ऋषींनीं ज्या क्रमानें सृष्टि उत्पन्न केली त्या क्रमाचें अनुकरण करून, शाहणा सारथी इष्ट स्थळीं जाण्यासाठीं प्रथम जसा घोड्याच्या लगामावर हात ठेवितो, तद्वत् पूर्वकल्पसृष्टिक्रमानुसार हा सृष्टियज्ञ निर्माण करते झाले. ॥ ३०१ ॥

### मणि ३०२ रा

दक्ष–ऋषि, हिरण्य–देवता, उष्णिक्–छंद.

आयुष्यं वर्चस्यꣳ रायस्पोषमौद्भिदम् । इदꣳ हिरण्यं वर्चस्व जैत्रायाविशतादु माम् ॥ ३४–५० ॥

अर्थः– आयुष्यवर्धक, तेजस्कर, धनवर्धक, स्वर्गनकाशक, अन्नसंयुक्त असें हें सुवर्ण जयप्राप्तिसाठीं माझ्याजवळ अलंकाररूपानें वास करो। ॥ ३०२ ॥

### मणि ३०३ रा.

दक्ष–ऋषि, हिरण्य–देवता, शक्वरी–छंद.

न तद्रक्षाꣳसि न पिशाचास्तरन्ति देवानामोजः प्रथमजꣳ ह्येतत् । यो बिभर्ति दाक्षायणꣳ हिरण्यꣳ स देवेषु कृणुते दीर्घमायुः स मनुष्येषु कृणुते दीर्घमायुः ॥ ३४–५१ ॥

अर्थः– राक्षस व पिशाच्च त्या सुवर्णाचा नाश करूं शकत नाहीत. याचें कारण असें की तें देवाचें सर्वात प्रथम उत्पन्न झालेलें तेज होय. म्हणून जो हें सुवर्ण अलंकाररूपानें धारण करितो तो देवलोकामध्यें दीर्घकाळ वास करितो. आणि तसेंच तो या मनुष्यलोकांतही दीर्घकाळ जगतो. ॥ ३०३ ॥

### मणि ३०४ था.

दक्ष–ऋषि, हिरण्य–देवता, त्रिष्टुप्–छंद.

यदाबध्नन्दाक्षायणा हिरण्यꣳ शतानीकाय सुमनस्यमानाः ।
तन्म आबध्नामि शतशारदायायुष्मान्जरदष्टिर्यथासम् ॥३४–५२॥

अर्थः– मनामध्यें सदैव मंगल चिंतणारे असे जे दक्षप्रजापतीचे पुत्र म्हणजे ब्राह्मण, त्यांनीं जें सुवर्ण अलंकाररूपानें राजाला बांधिलें तें सुवर्ण शंभर वर्षे जगण्याकरिता मी अलंकाररूपानें माझ्या शरीरावर धारण करितों. असें झालें म्हणजे मी आयुष्मान् व वृद्ध होईन ! ॥ ३०४ ॥

### मणि ३०५ वा.

कण्व–ऋषि, अध्यात्मवादिनी–देवता, जगती–छंद.

सप्त ऋषयः प्रतिहिताः शरीरे सप्त रक्षन्ति सदमप्रमादम् । सप्तापः
स्वपतो लोकमीयुस्तत्र जागृतो अस्वप्नजौ सत्रसदौ च देवौ॥३४-५५॥

अर्थः– देहाला सर्वत्र व्यापून असणारे असे सात प्राण शरीरामध्यें वास करून असतात. हेच सात प्राण सदैव सावध राहून शरीराचें रक्षण करीत असतात. मनुष्य झोपी गेला म्हणजे ते हृदयस्थ आत्म्यामध्यें लीन होतात. हे सात प्राण आत्म्यामध्यें जेव्हां लीन होतात तेव्हां प्राण व अपान–कीं ज्यांना झोप नाहीं व जे जीवनप्रद व तेजस्वी असे आहेत–असे हे प्राणापान शरीरामध्यें जागरण करीत असतात. ॥ ३०५ ॥

### मणि ३०६ वा.

कण्व–ऋषि, बृहस्पति–देवता, बृहती–छंद

उत्तिष्ठ ब्रह्मणस्पते देवयन्तस्त्वेमहे । उप प्रयन्तु मरुतः सुदानव
इन्द्र प्राशूर्भवा सचा ॥ ३४–५६ ॥

अर्थः– हे देवपालक बृहस्पति देवा! आमच्या इकडे येण्याला सिद्ध हो! कारण देवांवर प्रेम करणारे आम्ही तुझी इकडे येण्याविषयीं प्रार्थना करितों. कल्याणदायक मरुतदेवही तुझ्याबरोबरच येवोत. हे इंद्रदेवा! तूं देखील बरोबर निघण्यास अति त्वरा कर ॥ ३०६ ॥

मणि ३०७ वा.

आदित्य–ऋषि, पितृ–देवता, गायत्री–छंद

अपेतो यन्तु पणयोऽसुम्ना देवपीयवः । अस्य लोकः सुतावतः । द्युभिरहोभिरक्तुभिर्व्यक्तं यमो ददात्ववसानमस्मै ॥ ३५–१ ॥

अर्थः– असुखकारक व देवद्वेष्टे असे असुर या स्थानापासून निघून जावोत! सोमयाग केलेल्या या मृत यजमानाचें हें स्थान आहे. यमदेव याला ऋतु, दिवस व रात्र यांनीं अभिव्यक्त असलेलें असें स्थान देवो! ॥ ३०७ ॥

मणि ३०८ वा.

आदित्य–ऋषि, पितृ–देवता, गायत्री–छंद.

सविता ते शरीरेभ्यः पृथिव्यां लोकमिच्छतु । तस्मै युज्यन्तामुस्रियाः ॥ ३५–२ ॥

अर्थः– हे यजमाना! सूर्यदेव तुझ्या अस्थीकरता पृथ्वीमध्यें योग्य स्थान पसंत करो! त्या सूर्यदत्त स्थानाला संस्कारार्थ बैल जुंपण्यात येवोत. ॥ ३०८ ॥

मणि ३०९ वा.

आदित्य–ऋषि, लिंगोक्त–देवता, यजुः–छंद.

वायुः पुनातु सविता पुनात्वग्नेर्भ्राजसा सूर्यस्य वर्चसा । विमुच्यन्तामुस्रियाः ॥ ३५–३ ॥

अर्थः– हे पृथिवी! वायु तुला विदारण करो! सवितादेव तुला अग्नीच्या प्रकाशानें व सूर्याच्या तेजानें विदारण करो! भूमि संस्कारार्थ नांगरास जोडलेले बैल आतां सोडून देण्यांत येवोत. ॥ ३०९ ॥

### मणि ३१० वा.

अथर्वपुत्रभिषगृषि–ओषधि–देवता, अनुष्टुप्–छंद.

अश्वत्थे वो निषदनं पर्णे वो वसतिष्कृता । गोभाज इत्किलासथ यत्सनवथ पूरुषम् ॥ ३५–४ ॥

अर्थः– हे ओषधींनो, तुमची वसती अश्वत्थावर असते. आणि तुम्ही पळसावरही राहता. तुम्ही गाईचे व मनुष्याचे पोषणकर्ते आहात. ॥ ३१० ॥

### मणि ३११ वा.

आदित्य–ऋषि, सविता–देवता, गायत्री–छंद.

सविता ते शरीराणि मातुरुपस्थ आवपतु । तस्मै पृथिवि शं भव ॥ ३५–५ ॥

अर्थः– हे यजमाना! सूर्यदेव तुझ्या अस्थि पृथ्विमातेच्या उदरांत स्थापना करो! हे पृथिवीमाते! तूं त्या अस्थिरूप यजमानास सुखकर हो! ॥ ३११ ॥

### मणि ३१२ वा.

आदित्य–ऋषि, प्रजापति–देवता, उष्णिक्–छंद.

प्रजापतौ त्वा देवतायामुपोदके लोके निदधाम्यसौ । अप नः शोशुचदघम् ॥ ३५–६ ॥

अर्थः– हे देवदत्त यजमाना! जलासंनिध असलेल्या जागेमध्यें प्रजापति देवाजवळ मी तुझी स्थापना करितों. तो प्रजापति देव आमचें पातक जाळून भस्म करो! ॥ ३१२ ॥

### मणि ३१३ वा.

संकसुक–ऋषि, मृत्यु–देवता, त्रिष्टुप्–छंद.

परं मृत्यो अनु परेहि पन्थां यस्ते अन्य इतरो देवयानात् । चक्षुष्मते शृण्वते ते ब्रवीमि मा नः प्रजा रीरिषो मोत वीरान् ॥ ३५–७ ॥

**अर्थ** – हे मृत्युदेवा ! आम्हांपासून पराङ्मुख होऊन देवयानाहून निराळा *असा जो तुझा पितृयान मार्ग आहे त्या पितृयान मार्गानें परत जा.* तू शाहणा व प्रार्थना ऐकणारा असा आहेस म्हणून मी तुझी अशी प्रार्थना करितों कीं, आमच्या पुत्रपौत्रादि संततीला व तसेंच आमच्या वीर पुरुषांना मारू नकोस ! ॥ ३१३ ॥

### मणि ३१४ वा

आदित्य–ऋषि, विश्वदेव–देवता, अनुष्टुप्–छंद

शं वातः श९ हि ते घृणिः श ते भवन्त्विष्टकाः श ते भवन्त्व-ग्नयः पार्थिवासो मा त्वाभिशूशुचन् ॥ ३५–८ ॥

**अर्थ** – हे अस्थिरूप यजमाना ! वायु तुला सुखकर होवो ! सूर्यकिरण तुला सुखकर होवोत ! इष्टका तुला सुखकर होवोत ! अग्नि तुला सुखकर होवो ! पृथ्वीच्या पोटात राहणारे अग्नि तुला ताप न देवोत ! ॥ ३१४ ॥

### मणि ३१५ वा

आदित्य–ऋषि, विश्वदेव–देवता, बृहती–छंद

कल्पन्ता ते दिशस्तुभ्यमापः शिवतमास्तुभ्यं भवन्तु सिन्धवः । अन्तरिक्ष९ शिवं तुभ्यं कल्पन्तां ते दिशः सर्वाः ॥ ३५–९ ॥

**अर्थ** – दिशा तुला अनुकूल होवोत ! उदक तुला हितप्रद होवो ! समुद्र तुला कल्याणप्रद होवो ! आकाश तुला क्षेमकर होवो ! सर्व दिशा तुला अनु-कूल होऊन राहोत ! ॥ ३१५ ॥

### मणि ३१६ वा

सुचीक–ऋषि, विश्वदेव–देवता, त्रिष्टुप्–छंद

अश्मन्वती रीयते स९रभध्वमुत्तिष्ठत प्रतरता सखायः । अत्रा जहीमोऽशिवा ये असञ्छिवान्वयमुत्तरेमाभि वाजान् ॥३५–१०॥

**अर्थ** – अहो मित्रहो ! ही पाषाणवती नदी वाहत आहे ती तरून जाण्याचा प्रयत्न करा उठा ! सुरक्षितपणें ती नदी ओलांडून चला ! कारण या प्रदेशांत राक्षस–भूत–पिशाचादि दुष्ट लोक राहत असतात, त्यांना आम्ही येथेंच सोडून शक्य तितके त्वकर परत निघून गेलेलें बरं येथून आम्ही त्वकर निघून गेलों म्हणजे आम्हांस सुखकर असें मिष्टान्न खावयास मिळेल. ॥ ३१६ ॥

### मणि ३१७ वा.

शुनःशेप–ऋषि, लिंगोक–देवता, अनुष्टुप्–छंद.

अपाघमप किल्बिषमप कृत्यामपो रपः । अपामार्ग त्वमस्मदप दुःष्वप्न्यं सुव ॥ ३५–११ ॥

अर्थः– हे आघाडदेवते ! तूं आमचें मानसिक पाप नाहींसें कर । कीर्तीला कलंक लावणारें असें कायिक पाप नाहींसें कर । चेटूकादि पाप नाहींसें कर । वाचिक पाप नाहींसें कर । आणि दुःस्वप्नार्थे जें अशुभ फल आहे तेंही पण नाहींसें कर ! ॥ ३१७ ॥

### मणि ३१८ वा.

आदित्य–ऋषि, वरुण–देवता, गायत्री–छंद.

सुमित्रिया न आप ओषधयः सन्तु दुर्मित्रियास्तस्मै सन्तु योऽस्मान्द्वेष्टि यं च वयं द्विष्मः ॥ ३५–१२ ॥

अर्थः– उदक व औषधी आमचे सन्मित्र होऊन असोत । जो आमचा द्वेष करितो व ज्याचा आम्ही द्वेष करितों त्याला तीं शत्रू होऊन राहोत । ॥ ३१८ ॥

### मणि ३१९ वा.

आदित्य–ऋषि, अनुडुह्–देवता, अनुष्टुप्–छंद.

अनड्वाहमन्वारभामहे सौरभेयꣳस्वस्तये । स न इन्द्र इव देवेभ्यो वन्हिः संतारणो भव ॥ ३५–१३ ॥

अर्थः– आमचें कल्याण व्हावें एतदर्थ गाईचें अपत्य जो हा खोंड त्या खोंडाप्रत स्पर्श करितो. हे सुरभिपुत्रा ! तूं आमचा तारक हो ! आणि इंद्र हा जसा देवाचा पुढारी आहे तसा तू आमचा अग्रेसर हो ! ॥ ३१९ ॥

### मणि ० वा.

उद्वयं तमसस्परि स्वः पश्यन्त उत्तरम् । देवं देवत्रा सूर्यमगन्म ज्योतिरुत्तमम् ॥ ३५–१४ ॥

( अर्थाकरितां मणि १६३ वा पहा. )

### मणि ३२०.वा.

संकसुक–ऋषि, मृत्यु–देवता, त्रिष्टुप्–छंद.

इमं जीवेभ्यः परिधिं दधाभि मैषां नु गादपरो अर्थमेतम् । शतं जीवन्तु शरदः पुरूचीरन्तर्मृत्युं दधतां पर्वतेन ॥ ३५–१५ ॥

**अर्थः**– जिवंत माणसांकरितां म्हणून मी गांव व स्मशान या दोहोंमध्यें लाकडानें ही मर्यादा आखून ठेवितों. या जिवंत माणसांमध्यें दुसरें कोणीही माणूस वेदोक्त आयुष्यापूर्वी पितृलोकाकडे जाण्याच्या उद्देशानें ही मर्यादा ओलांडून न जावो! हे सर्व लोक दानाध्ययनयागादिकांना अनुकूल अशीं शंभर वर्षे जिवंत असोत! आणि मातीच्या राशीनें मृत्यूला अंतर्हित करून ठेवोत! ॥ ३२० ॥

### मणि ० वा.

अग्न आयूंषि पवस आसुवोर्जमिषं चनः । आरे बाधस्व दुच्छुनाम् ॥ ६५–१६ ॥

(अर्थाकरितां मणि १४६ वा पहा.)

### मणि ३२१ वा.

वैखानस–ऋषि, अग्नि–देवता, त्रिष्टुप्–छंद.

आयुष्मानग्ने हविषा वृधानो घृतप्रतीको घृतयोनिरेधि घृतं पीत्वा मधु चारु गव्यं पितेव पुत्रमभिरक्षतादिमान्स्वाहा ॥ ३५–१७ ॥

**अर्थः**–हे अग्निदेवा! तूं चिरंजीव हो! हवीनें वाढणारा असा हो! घृत हेंच ज्याचें मुख आहे असा म्हणजे घृतमुखी हो! घृत हेंच ज्याचें उत्पत्तिस्थान आहे असा म्हणजे घृतयोनि हो! सुमधुर व सुगंध असें गाईचें साजूक तूप पिऊन, बाप जसा मुलाचें संरक्षण करितो, त्याप्रमाणें तू या लोकांचें रक्षण कर। तुला सुहुत असो। ॥ ३२१ ॥

### मणि ३२२ वा.

शिरिंबिठ–ऋषि, इन्द्र–देवता, अनुष्टुप्–छंद.

परीमे गामनेषत पर्यग्निमहृषत । देवेष्वक्रत श्रवः क इमाँ२॥ आदधर्षति ॥ ३५–१८ ॥

अर्थः—या लोकांनीं सोंडाचा आश्रय करून ज्या अग्निमध्यें प्रेतकर्म केलें गेलें त्या अग्नीचा त्याग केला. ऋत्विजांना दक्षिणाही दिली. अशा रुत्यांनीं कृतकृत्य झालेल्या लोकांचा पराभव करण्यास मग कोण बरें समर्थ होईल ! ॥ ३२२ ॥

मणि ३२३ वा.

दमन—ऋषि, अग्नि—देवता, त्रिष्टुप् छंद.

क्रव्यादमग्निं प्रहिणोमि दूरं यमराज्यं गच्छतु रिप्रवाहः । इहैवायमितरो जातवेदा देवेभ्यो हव्यं वहतु प्रजानन् ॥ ३५–१९ ॥

अर्थः—हा जो प्रेतदाहक अग्नि, त्या क्रव्याद अग्नीला मी दूर पाठवून देतों. प्रेताला भस्मरूप करणारा हा क्रव्याद अग्नि आतां यमराजाकडे प्रयाण करो । या क्रव्याद अग्नीहून निराळा पण सर्वज्ञ असा जो दुसरा जातवेद अग्नि आहे तो आपला अधिकार जाणून याच घरांतून आतां देवासाठीं हविरन्न घेऊन जावो ! ॥ ३२३ ॥

मणि ३२४ वा.

आदित्य—ऋषि, जातवेद—देवता, त्रिष्टुप्—छंद

वह वपां जातवेदः पितृभ्यो यत्रैनान्वेत्थ निहितान्पराके । मेदसः कुल्या उप तान्स्रवन्तु सत्या एषामाशिषः सन्नमन्ताᳶ स्वाहा ॥ ३५–२० ॥

अर्थः— हे सर्वज्ञ देवा, पितरांना जेथें ठेविलें आहे ती जागा कितीही जरी दूर असली तरी त्या पितरांना तूं जाणतोसच. तेथें तूं त्यांना हें गाईचें कातडें नेऊन पोंचव. मेदाच्या नद्या त्या पितराकडे वाहून जावोत. आणि हे सर्व पदार्थ अर्पण करणाऱ्या यजमानांचे मनोरथ जसाचे तसे रुतीत उतरोत ! सुहुत असो. ॥ ३२४ ॥

मणि ३२५ वा.

मेधातिथि—ऋषि, पृथिवी—देवता, गायत्री—छंद.

स्योना पृथिवि नो भवानृक्षरा निवेशिनी । यच्छा नः शर्म सप्रथाः । अप नः शोशुचदघम् ॥ ३५–२१ ॥

अर्थः– हे माते पृथिवी ! तू कण्टकरहित, लोकांना राहण्यास योग्य व अति विशाल अशी आहेस अतएव तू आम्हास सुखरूप हो ! आम्हास आश्रय दे ! उदक आमच्या पातकाचें क्षालन करो ॥ ३२५ ॥

## मणि ३२६ वा

आदित्य–ऋषि, अग्नि–देवता, गायत्री–छंद

अस्मात्त्वमधि जातोऽसि त्वदयं जायतां पुनः । असौ स्वर्गाय लोकाय स्वाहा ॥ ३५–२२ ॥

अर्थ – हे अग्निदेवा ! तू या यजमानापासून उत्पन्न झालास याचप्रमाणें हा यजमानही पुन. तुजपासूनच उत्पन्न होवो ! हा देवदत्त नावाचा यजमान स्वर्गलोकप्राप्त्यर्थ पुनः तुझ्यापासूनच उत्पन्न होवो ! सुहुत असो ! ॥ ३२६ ॥

## मणि ३२७ वा

दध्यङ्ङाथर्वण–ऋषि, लिंगोक्त देवता, यजु –छंद

ऋचं वाचं प्रपद्ये मनो यजुः प्रपद्ये साम प्राणं प्रपद्ये चक्षुः श्रोत्रं प्रपद्ये । वागोजः सहौजो मयि प्राणापानौ ॥ ३६–१ ॥

अर्थ –ऋचारूप वाणीला मी शरण जातों यजुरूप मनाला मी शरण जातों. सामरूप प्राणाला मी शरण जातों चक्षुला व श्रोत्राला मी शरण जातों वाणी, धैर्य, सामर्थ्य, प्राण व अपान हीं सव माझ्या ठिकाणी एकत्र वास करोत ! ॥ ३२७ ॥

## मणि ३२८ वा

दध्यङ्ङाथर्वण–ऋषि, बृहस्पति–देवता, पंक्ति–छंद

यन्मे छिद्रं चक्षुषो हृदयस्य मनसो वातितृण्णं बृहस्पतिर्मे तद्दधातु । शं नो भवतु भुवनस्य यस्पतिः ॥ ३६–२ ॥

अर्थ – माझ्या दृष्टीमध्यें जें मांद्य आलें आहे, हृदयामध्यें जें व्याकुलत्व आलें आहे मनाला जें दु ख झालें आहे तें सर्व मांद्य व व्याकुलत्व देवगुरु बृहस्पति देव मार्से निवारण करो ! जगाचा जो अधिपति तो आम्हांस क्षेमकर होवो ! ॥ ३२८ ॥

माणि ० वा.

भूर्भुवः स्वः तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि । धियो यो नः प्रचोदयात् ॥ २१–३ ॥

( अर्थाकरिता माणि २५ वा पहा. )

माणि ३२९ वा.

वामदेव–ऋषि, इंद्र–देवता, गायत्री–छंद.

कया नश्चित्र आभुवदूती सदावृधः सखा । कया शचिष्ठया वृता ॥ ३६–४ ॥

अर्थः– पूज्य व नित्य वृद्धिंगत होणारा असा तो इंद्रदेव कोणत्या तर्पणानें आमचा सखा होईल ? आणि अशा कोणत्या श्रेष्ठ यागक्रियेनें तो आमचा मित्र होईल ? ॥ ३२९ ॥

माणि ३३० वा.

वामदेव–ऋषि, इंद्र–देवता, गायत्री–छंद.

कस्त्वा सत्यो मदानां मंहिष्ठो मत्सदन्धसः । दृढा चिदारुजे वसु ॥ ३६–५ ॥

अर्थः–हे इंद्रदेवा ! सोमरसाचा असा कोणता अत्यंत मदजनक भाग तुला सात्रीनें मत्त करू शकेल ? कीं ज्यानें तूं मत्त होऊन आम्हांस बहाल करण्याकरितां कठिण अशा सुवर्णादि धनाचे तू कणशः तुकडे तुकडे करशील ॥ ३३० ॥

माणि ३३१ वा.

वामदेव–ऋषि, इंद्र–देवता, गायत्री–छंद.

अभी षु णः सखीनामविता जरितॄणाम् । शतं भवास्यूतिभिः ॥ ३६–६ ॥

अर्थः–हे इंद्रदेवा ! तू मित्रांचा व स्तोत्र गाणाऱ्या भक्तजनांचा कैवारी आहेस आमचें रक्षण करण्याकरितां, हे देवा ! तूं सुंदर सुंदर अशी बहुविध रूपें धारण करितोस. ॥ ३३१ ॥

## मणि ३३२ वा

दध्यङ्डाथवण–ऋषि, इद्र–देवता, गायत्री–छद

कया त्व न ऊत्याभि प्रमन्दसे वृषन् । कया स्तोतृभ्य आभर ॥ ३६–७ ॥

अर्थ – हे भक्तकामकल्पद्रमा ! तुला कोणत्या अन्नानें तर्पण केलें म्हणजे तू आम्हांस अगदी आनदी आनद करून सोडशील ! आणि कोणत्या अन्नतर्पणानें तू स्तोत्र गाणाऱ्या आम्हा भक्तजनाना देण्याकरितां सपत्ति घेऊन येशील ! ॥ ३३२ ॥

## मणि ३३३ वा

दध्यङ्डाथर्वण–ऋषि, इद्र–देवता द्विपदा विराट–छद

इन्द्रो विश्वस्य राजति । श नों अस्तु द्विपदे श चतुंष्पदे ॥ ३६–८॥

अर्थ –तेज पुज असा तो विश्वाचा ईश्वर आम्हां भक्तजनांस शुभप्रद होवो! तसेंच आमच्या मुलाबाळाना व अश्वगवादि पशूना शुभकर होवो ! ॥ ३३३ ॥

## मणि ३३४ वा

दध्यङ्डाथवण–ऋषि, मित्रावरुणादि–देवता, अनुष्टुप–छद

श नों मित्र श वरुण श नों भवत्वर्यमा । श न इन्द्रो बृहस्पति श नो विष्णुरुरुक्रमः ॥ ३६–९ ॥

अर्थ – भगवान् मित्रदेव आम्हांस क्षेमकर होवो ! वरुणदेव आम्हांस क्षेमकर होवो ! अर्यमादेव आम्हास क्षेमकर होवो ! इद्रदेव आम्हास क्षेमकर होवो ! बृहस्पति देव आम्हास क्षेमकर होवो ! विशालपादाचा विष्णुदेव आम्हांस क्षेमकर होवो ! । ३३४ ॥

## मणि ३३५ वा

दध्यङ्डाथर्वण –ऋषि वायु सूर्य पर्जन्य–देवता, अनुष्टुप्–छद

श नो वार्त पवता ऽ श नस्तपतु सूर्यै. श न कनिक्रदद्देवः पर्जन्यों अभिवर्षतु ॥ ३६–१० ॥

अर्थः– वायु आम्हास सुखकर वाहो ! सूर्य आम्हाकरितां मंगल किरण प्रसार करो ! कडकडाट करणारा पर्जन्यदेव आम्हांस हितकर होईल अशा प्रकारें जलवृष्टि करो ! ॥ ३३५ ॥

मणि ३३६ वा.

दध्यङ्ङाथर्वण–ऋषि, अहोरात्र्यादि–देवता, द्विपद गायत्री–छंद.

अहा॑नि॒ शं भव॑न्तु नः॒ शꣳ रात्रीः॒ प्रति॑धीयताम् । शं न॑ इन्द्राग्नी भ॑वता॒मवो॑भिः॒ शं न॒ इन्द्रा॒वरु॑णा रा॒तह॑व्या । शं न॑ इन्द्रापू॒षणा॒ वाजे॑सातौ॒ शमिन्द्रा॒सोमा॑ सुवि॒ताय॒ शं योः ॥ ३६–११ ॥

अर्थः– अहर्देवता आम्हांस सुखरूप होवोत ! महावीर आम्हांस रात्रदेवता सुखरूप होतलि असें करो ! आपल्या रक्षणासहित इंद्राग्नी आम्हांस सुखरूप होवोत । हविरन्नानें परम संतुष्ट झालेले इंद्रावरुण आम्हांमत सुखरूप होवोत । अन्न–दान करणारे इंद्रापूषादिव हे आम्हांमत सुखरूप होवोत ! आमची सत्कार्यांकडे प्रवृत्ति व्हावी एतदर्थ, आणि आमच्या रोगाचें शमन व्हावें व भयाचें निवारण व्हावें म्हणून, इंद्र व सोमदेव आम्हांमत मंगलप्रद होवोत ! ॥ ३३६ ॥

मणि ३३७ वा.

दध्यङ्ङाथर्वण–ऋषि, अब्देवता, गायत्री–छंद.

शं नो॑ दे॒वीर॒भिष्ट॑य॒ आपो॑ भवन्तु पी॒तये॑ । शं योर॒भिस्र॑वन्तु नः ॥ ३६–१२ ॥

अर्थः– तेजस्वी असें उदक आमच्या स्नानार्थ व पानार्थ सुखकर होवो ! आणि तें आम्हांस निरोगी व निर्भय असें करो ! ॥ ३३७ ॥

मणि ० वा.

स्यो॒ना पृ॑थिवि नो भवानृक्ष॒रा नि॒वेश॑नी । यच्छा॑ नः॒ शर्म॑ स॒प्रथाः॑ ॥ ३६–१३ ॥

(अर्थाकरितां मणि ३२५ वा पहा.)

मणि ० वा.

आपो हि ष्ठा मयोभुवस्ता नं ऊर्जे दधातन । महे रणाय चक्षसे ॥ ३६–१४ ॥

( अर्थाकरिता मणि ७७ वा पहा. )

मणि ० वा.

यो वः शिवतमो रसस्तस्य भाजयतेह नः । उशतीरिव मातरः ॥ ३६–१५ ॥

( अर्थाकरिता मणि ७८ वा पहा. )

मणि ० वा.

तस्मा अरं गमाम वो यस्य क्षयाय जिन्वथ । आपो जनयथा च नः ॥ ३६–१६ ॥

( अर्थाकरिता मणि ७९ वा पहा. )

मणि ३३८ वा.

दध्यङ्ङाथर्वण–ऋषि, वैश्वदेव–देवता, यजुः–छंद.

द्यौः शान्तिरन्तरिक्षꣳ शान्तिः पृथिवी शान्तिरापः शान्तिरोषधयः शान्तिः । वनस्पतयः शान्तिर्विश्वे देवाः शान्तिर्ब्रह्म शान्तिः सर्वꣳ शान्तिः शान्तिरेव शान्तिः सा मा शान्तिरेधि ॥ ३६–१७ ॥

अर्थः– द्युलोकांत जी शांति आहे, अंतरिक्षांत जी शांति आहे, पृथिवींत जी शांति आहे, उदकांत जी आहे, ओषधींमध्ये जी आहे, सर्व देवांमध्ये जी शांति आहे, ब्रह्मामध्ये जी आहे, सर्व जगामध्ये जी आहे, प्रत्यक्ष शांतीमध्ये जी शांति आहे ती शांति माझ्या ठिकाणीं वास करो। ॥ ३३८ ॥

मणि ३३९ वा.

दध्यङ्ङाथर्वणः–ऋषि, वैश्वदेव–देवता, यजुः–छंद.

दृते दृꣳह मा मित्रस्य मा चक्षुषा सर्वाणि भूतानि समीक्षन्ताम् । मित्रस्याहं चक्षुषा सर्वाणि भूतानि समीक्षे । मित्रस्य चक्षुषा समीक्षामहे ॥ ३६–१८ ॥

अर्थः- हे परमेश्वरा ! वार्धक्यानें माझें शरीर जर्जर झालें असलें तरी तूं मला सुदृढ कर ! आणि हे देवा ! सर्व प्राणिमात्र मजकडे स्नेहदृष्टीनें पाहोत ! मीही सर्व जगावर प्रेमदृष्टीनेंच पाहीन. आम्हीं सर्व प्राणिमात्रांवर प्रेमदृष्टीनेंच पाहावें. ॥ ३३९ ॥

मणि ३४० वा.

दध्यङ्ङाथर्वण-ऋषि, वैश्वदेव-देवता, यजुः-छंद.

दृते॒ दृंह॑ मा०॥ ज्योक्ते॑ सं॒दृशि॑ जीव्यास॒ ज्योक्ते॑ सं॒दृशि॑ जीव्यासम् ॥ ३६-१९ ॥

अर्थः- हे महावीरा ! तुझें दर्शन घेत आम्ही दीर्घ काल जीवंत राहूं असें घडो ! ॥ ३४० ॥

मणि ० वा.

नम॑स्ते॒ हर॑से शो॒चिषे॒ नम॑स्ते अस्त्व॒र्चिषे॑ । अ॒न्याँस्ते॑ अ॒स्मत्त॑पन्तु हे॒तयः॑ पाव॒को अ॒स्मभ्य॑ꣳ शि॒वो भ॑व ॥ ३६-२० ॥

( अर्थाकरितां मणि ११६ वा पहा. )

मणि ३४१ वा.

दध्यङ्ङाथर्वण-ऋषि, विद्युत्स्तनयित्नुरूपभगवान्-देवता.

नम॑स्ते अस्तु वि॒द्युते॒ नम॑स्ते स्तनयि॒त्नवे॑ । नम॑स्ते भगवन्नस्तु य॒तः स्वः॑ स॒मीह॑से ॥ ३६-२१ ॥

अर्थः-हे भगवान् ! विद्युत्स्वरूप जो तूं त्या तुला नमस्कार असो ! गंभीर गर्जना करणारा जो तूं त्या तुला नमस्कार असो ! ज्या अर्थी तूं स्वर्गास जाण्यास सिद्ध झाला आहेस त्या अर्थी, देवा ! तुला आमचा नमस्कार असो ! ॥३४१॥

मणि ३४२ वा.

दध्यङ्ङाथर्वण-ऋषि, भगवान्-देवता, अनुष्टुप्-छंद.

यतो॑ यतः स॒मीह॑से॒ ततो॑ नो॒ अभ॑यं कुरु । शं नः॑ कुरु प्र॒जाभ्यो॑ऽभ॑यं नः प॒शुभ्यः॑ ॥ ३६-२२ ॥

अर्थः- हे देवा ! ज्या ज्या दुश्चरितापासून तूं आम्हास दूर ठेवूं इच्छितोस त्या त्या दुश्चरितापासून तूं आम्हास निर्भय कर। आमच्या पुत्रपौत्रादिकांना हे देवा! तूं सुखप्रद हो! आणि तसेंच आमच्या गवाश्वादिक पशूंनाही भयरहित कर ! ॥ ३४२ ॥

माणि ० वा.

सुमित्रिया न आप ओषधयः सन्तु दुर्मित्रियास्तस्मैं सन्तु योऽस्मान्द्वेष्टि यं च वयं द्विष्मः ॥ ३६-२३ ॥

(अर्थाकरितां मणि ३१८ वा पहा.)

माणि ३४३ वा.

दध्यङ्ङाथर्वण-ऋषि, सूर्य-देवता, त्रिष्टुप्-छंद.

तच्चक्षुर्देवहितं पुरस्ताच्छुक्रमुच्चरत् । पश्येम शरदः शतं जीवेम शरदः शतꣳ शृणुयाम शरदः शतं प्रब्रवाम शरदः शतमदीनाः स्याम शरदः शतं भूयश्च शरदः शतात् ॥ ३६-२४ ॥

अर्थः-देवांना प्रिय, व तेजाचा अखंड पुंज, आणि विश्वाचा सर्वसाक्षी असा तो भगवान् सूर्यनारायण पूर्वेस उदयगिरीवर उदय पावता झाला। त्या देवाच्या प्रसादानें आम्हीं शंभर वर्षे डोळ्यानीं धड पहात असावें ! शंभर वर्षे आम्हीं धड जिवंत असावें। शंभर वर्षे कानांनीं धड ऐकत असावें। शंभर वर्षे वाचेनें धड बोलत असावें ! शंभर वर्षे आम्हीं दैन्यरहित असावें। इतकेंच नव्हे तर शंभर वर्षांहूनही अधिक दिवस आम्ही जिवंत राहूं असें होवो! ॥३४३॥

माणि ३४४ वा.

दीर्घतमा-ऋषि, वाग्देवता, त्रिष्टुप्-छंद.

यस्ते स्तनः शशयो यो मयोभूर्यो रत्नधा वसुविद्यः सुदत्रः । येन विश्वा पुष्यसि वार्याणि सरस्वति तमिह धातवेऽकः । उर्वन्तरिक्षमन्वेमि ॥ ३८-५ ॥

अर्थः–हे माते सरस्वती ! अनुपभुक्त, सुखदायक, रत्नधारक, धनवेत्तक, अत्यंत उदार असा जो तुझा स्तन आहे व ज्या स्तनानें तूं सर्व वस्तूंचें पोषण करितेस असा तो तुझा स्तन या लोकी मला प्यावयास मिळेल असें कर. ॥३४४॥

### मणि ३४५ वा.

दध्यङ्ङाथर्वण–ऋषि, श्री–देवता, अनुष्टुप्–छंद.

मनसः काममाकूतिं वाचः सत्यमशीय । पशूनाᳪ रूपमन्नस्य रसो यशः श्रीः श्रयतां मयि स्वाहा ॥ ३९–४ ॥

अर्थः–माझे मनोरथ व माझे प्रयत्न हे सफल होवोत ! माझी वाणी सत्य भाषण करणारी अशी असावी. पशूंची शोभा, अन्नस्वाद, यश, कीर्ति व लक्ष्मी हीं सर्व माझा आश्रय करून राहोत ! सुहुत असो ! ॥ ३४५ ॥

### मणि ३४६ वा.

दध्यङ्ङाथर्वण–ऋषि, आत्म–देवता, अनुष्टुप्–छंद.

ईशा वास्यमिदᳪ सर्वं यत्किंच जगत्यां जगत् । तेन त्यक्तेन भुञ्जीथा मा गृधः कस्यस्विद्धनम् ॥ ४०–१ ॥

अर्थः– हें प्रत्यक्ष दिसणारें जें सर्व विश्वजात, तें सकलभूतांच्या अंतर्यामीं असणारा जो परमेश्वर, त्या परमेश्वरानें व्याप्त आहे अशी भावना करावी आणि हे शिष्या ! या त्रैलोक्यांत जी काय जंगमादिक संपत्ति तुझ्या मालकीची आहे, त्या संपत्तीवरील स्वामित्वभाव सोडून तिचा तूं उपभोग घ्यावास. 'हें माझें' 'हें माझें' अशी जी तुझ्या ठायीं ममत्वबुद्धि आहे ती पार सोडून दे कसा ! अरे, ही सर्व संपत्ति कोणाची ? ( अर्थात् तुझी नव्हे, ती परमेश्वराची ) ॥ ३४६ ॥

### मणि ३४७ वा.

दध्यङ्ङाथर्वण–ऋषि, आत्म–देवता, अनुष्टुप्–छंद.

कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतᳪ समाः । एवं त्वयि नान्यथेतोऽस्ति न कर्म लिप्यते नरे ॥ ४०–२ ॥

अर्थः– निष्काम कर्म करीत या लोकामध्यें शंभर वर्षे जिवंत राहण्याची तूं हांव धर यांतच तुझें शाश्वत कल्याण आहे. कर्मं केल्याशिवाय इतर मार्गानें मनुष्याला मोक्ष मिळूं शकत नाहीं. निष्काम कर्म हें मनुष्याला बंधनात्मक होत नाहीं. ॥ ३४७ ॥

### मणि ३४८ वा.

दृध्यङ्ङाथर्वण-ऋषि, आत्म-देवता, अनुष्टुप्-छंद.

असुर्या नाम ते लोका अन्धेन तमसावृताः । तांस्ते प्रेत्यापि-
गच्छन्ति ये के चात्महनो जनाः ॥ ४०-३ ॥

अर्थः-जे कोणी लोक केवळ काम्य कर्मांमध्येंच गढून गेलेले असतात, ते मेल्यावर अज्ञानरूपी अंधकारानें गुरफटलेले असे जे असुराचे नाशवंत लोक आहेत त्या लोकांमत जातात. ॥ ३४८ ॥

### मणि ३४९ वा.

दृध्यङ्ङाथर्वण-ऋषि, आत्म-देवता, त्रिष्टुप्-छंद.

अनेजदेकं मनसो जवीयो नैनद्देवा आप्नुवन्पूर्वमर्शत् । तद्धाव-
तोऽन्यानत्येति तिष्ठत्तस्मिन्नपो मातरिश्वा दधाति ॥ ४०-४ ॥

अर्थः-मुमुक्षूंनीं मिळवावयाचें जें ब्रह्म आहे तें आत्मरूपापासून कधीही चळत नाहीं. ( म्हणजे तें नित्य एकरूप आहे ) तें सर्व प्राण्यामध्यें विज्ञानघनरूपानें एकमेवाद्वितीय असें आहे. तें अत्यंत वेगवान् अशा मनापेक्षाही वेगवान् आहे. या आत्मतत्त्वास चक्षुरादि इंद्रियें जाणूं शकत नाहींत याचें कारण असें कीं मनापेक्षांही तें पुढें पुढें धांवतें. तें स्वतः क्रियारहित असूनही जलद धांवणाऱ्या मनोवागादि इंद्रियाहून पुढें पुढें जात असतें. त्या ब्रह्मरूपामध्येंच वायु हा प्राणिमात्रांच्या चेष्टा व अग्निसूर्यादिकांच्या दाहज्वलनप्रकाशनादि क्रिया धारण करितो. ॥ ३४९ ॥

### मणि ३५० वा.

दृध्यङ्ङाथर्वण-ऋषि, आत्म-देवता, अनुष्टुप्-छंद.

तदेजति तन्नैजति तद्दूरे तद्वन्तिके । तदन्तरस्य सर्वस्य तदु
सर्वस्यास्य बाह्यतः ॥ ४०-५ ॥

अर्थः-प्राणिरूपानें तें म्हणजे ब्रह्म चर आहे. स्थावररूपानें तेंच अचर आहे. सूर्यनक्षत्रादिरूपानें तें दूर आहे. पृथिव्यादि रूपानें तेंच जवळ आहे. विज्ञानघनरूपानें तें सकल प्राणिमात्राच्या हृदयांत आहे. आणि जडरूपानें तेंच सर्वांच्या बाहेरही आहे. ॥ ३५० ॥

मणि ३५१ वा.

दध्यङ्ङाथर्वण–ऋषि, आत्म–देवता, अनुष्टुप्–छंद.

यस्तु सर्वाणि भूतान्यात्मन्नेवानुपश्यति । सर्व–भूतेषु चात्मानं ततो न विचिकित्सति ॥ ४०–६ ॥

अर्थः– जो मुमुक्षु हें सर्व भूतजात आपल्यामध्यें स्थित आहे असें अनुभव-पूर्वक पाहतो व सर्व भूतजातामध्यें आपणच स्थित आहों असें जाणतो त्याला मीच परब्रह्म आहे याबद्दल मुळींच संदेह राहत नाहीं. ॥ ३५१ ॥

मणि ३५२ वा.

दध्यङ्ङाथर्वण–ऋषि, आत्म–देवता, अनुष्टुप्–छंद.

यस्मिन्सर्वाणि भूतान्यात्मैवाभूद्विजानतः । तत्र को मोहः कः शोक एकत्वमनुपश्यतः ॥ ४०–७ ॥

अर्थः– ज्या अवस्थेंत ज्ञानी मनुष्याला सर्व प्राणिजात केवळ आत्मरूप वाटतात त्या अवस्थेंत सर्वात्मरूप पाहाणाऱ्या त्या ब्रह्मज्ञान्याला कसला मोह नि कसला शोक ? ॥ ३५२ ॥

मणि ३५३ वा.

दध्यङ्ङाथर्वण–ऋषि, आत्म–देवता, जगती–छंद.

स पर्यगाच्छुक्रमकायमव्रणमस्नाविरꣳ शुद्धमपापविद्धम् । कविर्मनीषी परिभूः स्वयम्भूर्याथातथ्यतोऽर्थान्व्यदधाच्छाश्वतीभ्यः समाभ्यः ॥ ४०–८ ॥

अर्थः–सर्वज्ञानी, बुद्धिमान्, सर्वरूप, ब्रह्मरूप असा तो ब्रह्मोपासक शुद्ध शरीररहित, व्रणरहित, स्नायुरहित, कलंकरहित, पापरहित, अशा ब्रह्मात जातो आणि दुसरी गोष्ट अशी कीं, अशा आत्मोपासकानें अनंत काल-प्राप्तीसाठी मम-त्वभाव सोडून स्थावरजंगम पदार्थांचा यथार्थ उपभोग घेतला म्हणजे यथायोग्य कर्म केलें असें होतें. ॥ ३५३ ॥

मणि ३५४ वा.

दध्यङ्ङाथर्वण–ऋषि, आत्म–देवता, अनुष्टुप्–छंद.

अन्धं तमः प्रविशन्ति येऽसंभूतिमुपासते । ततो भूय इव ते तमो य उ संभूत्याꣳ रताः ॥ ४०–९ ॥

**अर्थः**– जे लोक मेल्यावर पुनः जन्म नाहीं अतएव मरण म्हणजेच मोक्ष असें प्रतिपादन करितात, ते अज्ञानरूपी गाढ अंधःकारांत जाऊन पडतात. आणि जे कर्मपराङ्मुख होऊन केवळ आत्मज्ञानांतच रमून जातात ते त्याहूनही दुस्तर अशा निबिड अज्ञानतिमिरांत गुरफटून जातात ! ॥ ३५४ ॥

## मणि ३५५ वा.

दध्यङ्ङाथर्वण–ऋषि, आत्म–देवता, अनुष्टुप्–छंद.

अन्यदेवाहुः संभवादन्यदाहुरसंभवात् । इति शुश्रुम धीराणां ये नस्तद्विचचक्षिरे ॥ ४०–१० ॥

**अर्थः**– कार्य ब्रह्मोपासनेपासून अणिमादि ऐश्वर्य हें पृथक् फल आहे असें विद्वान् म्हणतात आणि अव्यक्त ब्रह्मोपासनेपासून पौराणिकोक्त असें दुसरें एक फल आहे असें तेच विद्वान् सांगतात. या दोन व्याकृत व अव्याकृत–अर्थात् सगुण व निर्गुण–ब्रह्मोपासनेचें फल ज्यांनीं आम्हास तें ब्रह्म उलगडून सांगितलें त्या ज्ञानसंपन्न लोकाकडूनच आम्ही ऐकून घेतलें आहे. ॥ ३५५ ॥

## मणि ३५६ वा.

दध्यङ्ङाथर्वण–ऋषि, आत्म–देवता, अनुष्टुप्–छंद.

संभूतिं च विनाशं च यस्तद्वेदोभयꣳ सह । विनाशेन मृत्युं तीर्त्वा संभूत्यामृतमश्नुते ॥ ४०–११ ॥

**अर्थः**–परब्रह्म व हें नाशवंत शरीर हीं दोनहीं तत्त्वें जो योगी एकत्वभावानें जाणतो तो शरीरानें ज्ञानोत्पादक निष्काम कर्म करून मृत्यूचें अतिक्रमण करितो व आत्मज्ञानानें अविनाशी अशा मोक्षाचा अधिकारी होतो. ॥ ३५६ ॥

## मणि ३५७ वा.

दध्यङ्ङाथर्वण–ऋषि, आत्म–देवता, अनुष्टुप्–छंद.

अन्धं तमः प्रविशन्ति येऽविद्यामुपासते । ततो भूय इव ते तमो य उ विद्यायाꣳ रताः ॥ ४०–१२ ॥

**अर्थः**–जे केवळ कर्मांचेंच अनुष्ठान करितात ते जन्ममृत्यूच्या भोंवऱ्यांत शिरतात ! आणि जे कर्म सोडून केवळ आत्मज्ञानांतच गर्क असतात, ते त्याहूनही खडतर अशा संसारचक्रांत भ्रमण करितात ! ॥ ३५७ ॥

### मणि ३५८ वा.

दध्यङ्ङाथर्वण-ऋषि, आत्म-देवता, अनुष्टुप्-छंद

अन्यदेवाहुर्विद्याया अन्यदाहुरविद्यायाः । इति शुश्रुम धीराणां ये नस्तद्विचचक्षिरे ॥ ४० १३ ॥

अर्थ-आत्मज्ञानाचें देवलोक एक निराळें फल आहे आणि कर्माचें पितृलोक एक निराळें फल आहे असें सांगतात ज्यांनीं आम्हांस ज्ञान व कर्म यांचें व्याख्यान सांगितलें त्याच आचार्यांपासून आम्हीं हें ऐकिलें आहे ॥ ३५८ ॥

### मणि ३५९ वा.

दध्यङ्ङाथर्वण-ऋषि, आत्म-देवता, अनुष्टुप्-छंद.

विद्यां चाविद्यां च यस्तद्वेदोभयꣳ सह । अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्ययामृतमश्नुते ॥ ४०-१४ ॥

अर्थः-ज्ञान व कर्म हीं दोन्ही मिळून जो एकत्र जाणतो तो कर्मोपासनेनें कृतकृत्य होऊन देवाताज्ञानानें मोक्षास जातो ॥ ३५९ ॥

### मणि ३६० वा

दध्यङ्ङाथर्वण-ऋषि, आत्म-देवता, यजुः-छंद

वायुरनिलममृतमथेदं भस्मान्तꣳ शरीरम् । ओ३म् क्रतो स्मर क्लिबे स्मर कृतꣳ स्मर ॥ ४०-१५ ॥

अर्थ-माझा प्राण हें स्थूल शरीर सोडून देऊन सूत्रात्मा जो वायु त्या सर्वात्मक वायुदेवाशीं जाऊन मिळो ! हें पचमहाभूतात्मक स्थूल शरीर अग्निमध्यें जळल्यावर भस्मरूप होवो। हे संकल्पविकल्पात्मक प्राण्या ! ब्रह्मचर्येपासून उपासना करीत आलेल्या अग्निस्वरूपी ब्रह्माचें चिंतन कर ! तुला भोगावयाचा जो लोक आहे, त्या लोकाचें स्मरण कर ! बाल्यमभृति जें काम कर्म तू केलेलें असशील त्या कर्माचेंही पण स्मरण कर ! ॥ ३६० ॥

### मणि ० वा

अग्ने नय सुपथा राये अस्मान्विश्वानि देव वयुनानि विद्वान् । युयोध्यस्मज्जुहुराणमेनो भूयिष्ठां ते नमउक्तिं विधेम ॥४०-१६ ॥

अर्थः—हे अग्निनारायणा ! आम्हास देवमार्गानें मोक्षरूप धनाकडे घेऊन जा ! हे भगवन् ! सर्व कार्याकार्य जाणणारा जो तूं तो मोक्षास प्रतिबंधक असें जें पाप तें आम्हापासून दूर कर ! आम्ही तुला पुष्कळ नमस्कार करितों. !

मणि ३६१ वा.

दध्यङ्ङाथर्वण–ऋषि, आदित्य–देवता, उष्णिक्–छंद

हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम् । योऽसावादित्ये पुरुषः सोऽसावहम् । ओ३म् खं ब्रह्म ॥ ४०—१७ ॥

अर्थः—तेजोरूप मंडलानें अविनाशी पुरुषाचें शरीर आच्छादिलेलें आहे, जो प्रत्यक्ष आदित्यमंडलस्थ पुरुष आहे तो साक्षात् मी आहें. आकाशाप्रमाणें व्यापक असें हें ब्रह्म असून त्याचें ॐ या मंत्रानें ध्यान करावें ॥ ३६१ ॥

॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

॥ ॐ तत्सत् ॥




मुद्रकः–(१) पृ. १ ते ११८–रा. अनंत विनायक पटवर्धन, आर्यभूषण प्रेस, ९३६।३ भांबुर्डा पेठ, पुणें ४.

(२) बाकीचा सर्व भाग–रा. रा. सदाशिव रामचंद्र सरदेसाई, समर्थ भारत छापखाना, सदाशिव पेठ, पुणें २.

प्रकाशकः–रा. रा. रामचंद्र गोविंद कोलंगडे, वकील किल्ला, हुबळी.

# शुद्धिपत्र

## शुक्ल-यजुर्मणि-माला

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १२ | १० | सुख | सुरा |
| १४ | १४ | सुशेर्वाः | सुशेर्वाः |
| १९ | १७ | कर्पिरसि | कार्पिरसि |
| २६ | २६ | वहत् | बृहत् |
| २९ | १८ | सुरवत् | खुरवत् |
| ३२ | १७ | खानाम्यहम् | रानाम्यहम् |
| ३६ | ९ | स्वयमाण्णे | स्वयमातृण्णे |
| ३७ | १७ | अनोध्यामिः | अवोध्यग्निः |
| ४३ | ८ | स्वयन्तु | स्वयन्तु |
| ४३ | १४ | चित्रामाह | चित्रामह |
| ४४ | ११–१२ | घृताने . व्यापकाः | (चुकून दोन वेळां पहलें आहे.) |
| ४७ | १६ | हविर्भीः | हविर्भिः |
| ५८ | १२ | दवत्रा | देवत्रा |
| ५९ | ८ | मे | ये |
| ६१ | १३ | पुरुपाच्या | पूपाष्या |
| ६६ | १२ | त्व | त्व |
| ९० | १७ | मर्त्यैं | मर्त्यैं |
| ११० | २४ | मितस्यं | मित्रस्यं |
| १११ | १२ | अरमर्तपन्तु | अस्मर्तपन्तु |
| ११२ | १२ | शारदैः | शारदैः |